# प्रस्तावना

विमलेची ग्रहदशा प्रथम श्रीयुत गणेश रावजी पांगारकर बी. ए. एलएल्. बी. यांनीं सन १९११ मध्यें मकरन्दांत सुरू केली. कादंबरीची २४ पृष्ठें छापून झाल्यावर कांहीं अपरिहार्य अडचणीमुळें त्यांना ती पुढें लिहितां आली नाहीं. त्यामुळें ती बंद होऊन बिचाऱ्या 'विमलेची ग्रहदशा' अपूर्ण राहिली. पुढें ती अपूर्ण राहिलेली कादंबरी मी पूर्ण करावी म्हणून माझे मित्र श्रीयुत पटवर्धन संपादक 'मकरन्द' यांनीं ती कामगिरी माझ्याकडे सोंपविली. परंतु श्रीयुत पांगारकर यांनीं प्रस्तुत कादंबरीचे आंखलेले कथानक मला कळण्याला मार्ग नसल्यामुळें 'विमलेची ग्रहदशा' या नांवाचा पूर्ण बोध होईल असें एखादें कथानक जुळविणें मला भाग पडलें. त्याच संधीला माझे मित्र श्रीयुत धोंडोपंत रघुनाथ तेंडुलकर यांनीं लिहिलेलें सामाजिक नाटक 'स्वार्थत्याग' याची हस्तलिखित प्रत मला वाचावयास दिली. त्या नाटकाचें कथानक मला अत्यंत आवडलें आणि तेंच कथानक प्रस्तुत कादंबरीकरितां थोडा फेरफार करून घ्यावें असें वाटून मी श्री. तेंडुलकर यांस विचारलें. आणि त्यांनीं मोठ्या आनंदानें मला तसें करण्याची परवानगी दिली. अशा रीतीनें कथानकाची जुळणी झाली तथापि इतर कामामुळें मला ही कादंबरी लिहिण्यास सवड झाली नाहीं. पुढें मी अहमदनगरास गेल्यावर तेथें मला एक हृदयद्रावक समाजचित्र पहावयास मिळालें. त्या दृश्य चित्रानें माझ्या मनाला अतिशय चटका लाविला. परंतु तें समाजचित्र जसेंच्या तसें वाचकांच्या पुढें मांडणें मला बरें न वाटून मीं योजलेल्या पहिल्या कथानकाशीं तें जुळवून घेतलें आणि तसें करतांना नामदेव शिपी समाजांत घडलेल्या एका बाप्तिस्माच्या गोष्टीचा मला सहजीं उल्लेख करतां आला. प्रस्तुत कादंबरींत रेखाटलेलें विमलेचें चित्र अहमदनगरास पाहिलेल्या चित्राचें प्रतिबिंब आहे. फरक इतकाच कीं, अहमदनगर येथील ती दुर्दैवी स्त्री आपली ग्रहदशा अद्यापि भोगीत आहे आणि मी माझ्या प्रस्तुतच्या कादंबरींत विमलेच्या ग्रहदशेचा अंत केला आहे.

ही कादंबरी माझे विद्वान् मित्र श्री. पांगारकर यांच्याकडूनच पूर्ण झाली असती तर ती विशेष हृदयंगम झाली असती. कारण प्रथम कथानक योजून त्यांनीं त्या कथानकास ‘ विमलेची ग्रहदशा ’ असें नांव दिलें यावरून त्यांचें कथानक मुळांतच चित्तवेधक असलें पाहिजे. आणि मजकडे ही कादंबरी लिहावयास आल्यावर ‘ विमलेची ग्रहदशा ’ हें नांव मला कायम ठेवावयाचें असल्यामुळें या नांवाची सार्थकता करणारें नवीन कथानक जुळवावें लागलें. तेव्हां तें ओढून-ताणून जुळविलेलें आहे असें वाटण्याचा संभव आहे. कांहींही असो, आज इतकीं वर्षें अपूर्ण राहिलेली ही कादंबरी श्री. पटवर्धन यांच्या सांगण्यावरून आज संपूर्ण करून मी वाचकांच्या हातीं देत आहे. ह्या कादंबरींत कांहींतरी बोध घेण्याचा भाग वाचकांना मिळून त्यांचें मनोरंजन होईल अशी मला आशा आहे.

पितळे यांचा बंगला<br>कावसजी पटेल तलाव<br>मुंबई १ मार्च १९१७

**नाथमाधव.**

# १ ग्रहदशेचा प्रारंभ

अर्रर्र—पडला !! पडला !!!

कोष्ट्याच्या पोरानें वरील उद्गार काढावयाला आणि सायकलला अपघात व्हावयाला एकच गांठ पडली ! नदीच्या उतरणीला लागतांच तिचा वेग वाढला. सायकलची गति वाढूं लागतांच सायकलवर बसलेल्या तरुणाला मौज वाटून त्यानें गतीचा अवरोध न करितां तिला आणखी वेग यावा म्हणून वांकून थोडा वेळ जोरानें पाय हालविले. नदीच्या कातळाजवळ येईपर्यंत ती उतरण सरळ होती. परंतु कातळाजवळ मात्र उतरणीला वळण होतें. आपण त्या वळणावर सायकल वळवून सहज पलीकडे जाऊं अशी त्या तरुणाला खात्री होती. परंतु दुर्दैवाचीच ती वेळ ! सायकल वळवतांना कलती होऊन घसरली व त्याच संधीला त्या तरुणाचें धोतर मागल्या चाकांत गुरफटलें आणि अपघात झाला. सायकलच्या वेगाच्या मानानें तो तरुण दूर अंतरावर जाऊन कातळांत आपटला.

ती संध्याकाळची वेळ होती. त्यावेळीं एकटाच कोष्ट्याचा पोर शहराकडे चालला होता. त्यानें ती समोरून वेगानें येत असलेली बायसिकल पाहिली आणि कौतुकानें तो रस्त्याच्या बाजूला उभा राहून सायकलच्या गतीकडे पहात राहिला. हां हां म्हणतां बायसिकल त्याच्याजवळ येऊन वळणाजवळ गेली आणि तिला अपघात झाला. त्या तरुणाचें डोकें दगडावर आपटतांच पहिल्या तडाख्यालाच तो बेशुद्ध झाला. त्याच्या कपाळाला लागलें, गुढघे फुटले आणि खांद्याला घसटलें. धोतर सर्व फाटून गेलें होतें. अपघात होतांच तो पोर धांवत पुढें आला आणि त्या तरुणाला उठविण्याचा प्रयत्न करूं लागला. परंतु तो शुद्धीवरच नसल्यामुळें उठून बसणार कोठून ! त्यानें मदत मिळावी म्हणून

मोठमोठ्यानें दहापांच हांका मारिल्या परंतु दुर्दैवानें त्यावेळीं जवळपास कोणीही नव्हतें. शेवटीं तो पोर उठला आणि पलीकडे असलेल्या गांवांत धांवत गेला. तेथें बहुतेक सर्व वस्ती कोष्ट्यांचीच होती. ती संध्याकाळची वेळ असल्यामुळें त्यावेळीं पुरुषमंडळी सहसा घरांत नसावयाची. कारण सर्व दिवसांत विणलेले खण आणि लुगडीं घेऊन मंडळी शहरांत जात आणि त्याची विक्री करून परत येतांना वाटेंत दिसणाऱ्या प्रत्येक कलालाच्या दुकानांतून थोडी थोडी दारू घेत घेत ती मंडळी रात्रीं घरीं येत असत. हें जरी त्या पोराला पूर्ण माहीत होतें तरी कोणी एखादा मनुष्य चुकून आपणास भेटेल व आपण त्याला मदतीला घेऊन जाऊ या आशेनें तो इकडे तिकडे पहात गांवांतून धांवत चालला होता. तेव्हां एका बाजूच्या घरांतून ' जिवा—जिवा ' म्हणून त्याला एका मनुष्यानें हांक मारिली.

" पोरा, बरा आलास ! तुझीच वाट पहात होतों. " एक मनुष्य घरांतून बाहेर येऊन म्हणाला, " हें घे आणि पळत एक बाटली घेऊन ये—जा—"

" मला आतां वेळ नाहीं. तो तिकडे कातळावर एक माणूस पडला आहे त्याला—"

" पडूं दे—मरूं दे ! तुला काय त्याची उठाठेव ! तूं एक बाटली —"

" मीं नाहीं आणायचा ! "

" असं काय ? " असें म्हणून त्या मनुष्यानें जिवा पोराला एक शिवी हांसडली. " बरं आहे पोरा, येशील कधीं तरी मग पाहून घेईन."

परंतु त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून तो पोर तसाच पळत आणखी दोन चार घरें पुढें गेला. तेथें एका घराच्या दरवाजांत सत्रा अठरा वर्षांची एक तरुणी हातांत पुस्तक घेऊन उभी होती. तिनें त्या पोराला पळतांना पाहून विचारलें, " काय रे जिवा, कुणीकडे इतका पळत चालला आहेस ? "

" तुमचे संतोबा आहेत का घरांत ? " तो पोर उभा राहून धापा टाकीत म्हणाला.

" बाबा आतां कुठले घरांत ! ते मघाच खण घेऊन गेले शहरांत. पण कायरे, काय एवढी गडबड आहे ? "

" गडबड काय सांगूं ? तिकडे कातळावर एक माणूस बायसिकलवरून पडला आहे. त्याचं कपाळ फुटून सर्व रक्त निघालं आहे. बिचारा मेला आहे कीं काय देव जाणे ! "

"अरेरे ! पण जिवा तिकडे दुसरं कोणी नाहीं कायरे ?"

"कोणी नाहीं म्हणून तर मी धांवत आलों."

"मग मी येतें चल. पण गड्या, आतां बाई येण्याची वेळ झाली आहे. ती एकदां येऊन गेली असती—पण थांब, मी आईला विचारतें—असें म्हणून ती लगबगीनें आंत गेली. आणि लगेंच बाहेर येऊन म्हणाली, "चल जिवा आपण लवकर जाऊन येऊं."

"पण विमलाताई, तुमच्या बाई येणार आहेत ना ?"

"आल्या तर थांबतील थोडा वेळ. आपण इतक्यांत येऊं."

तीं दोघेंजणं बाहेर पडलीं. जिवा भराभर चालत होता. विमल त्याच्या मागेंच होती. नदीच्या उतरणीजवळ येतांच तेथें कांहीं मंडळी जमा झालेली दिसत होती. परंतु ती सर्व शेतकरी वर्गापैकीं होती. जिवाबरोबर विमलेला घाई-घाईनें येतांना पाहून ती सायकलवरून पडलेल्या मनुष्याची कोणीतरी आप्तसंबंधी असावी असें वाटून ती मंडळी दूर झाली आणि त्यांस पुढें येण्यास मार्ग मोकळा करून दिला. बिचारा तो तरुण ज्या स्थितींत कातळावर पडला होता, त्याच स्थितींत अद्यापि पडला होता. त्याला शुद्धीवर आणण्याचा कोणीच प्रयत्न केला नव्हता. आणि प्रयत्न तरी काय करणार ? कारण जवळ असलेली नदी केवळ नामधारीच होती. ओंजळभर पाणी पाहिजे असल्यास तें गांवांत गेल्याशिवाय मिळणें शक्य नव्हतें. विमला त्या तरुणाच्या अगदीं जवळ जाऊन क्षणभर उभी राहिली. त्याचें कपाळ फुटलें असून तोंड, मान आणि कपडे रक्तानें लाल झाले होते. त्याचा श्वासोच्छ्वास फार जोरानें होत होता. आतां विमलाबाई पुढें काय करते तें मोठ्या उत्सुकतेनें पहात जिवा जवळच उभा होता. परंतु विमला तरी काय करणार ? तिनें खालीं वाकून त्या तरुणाचा अंगाखालीं गेलेला हात सारखा करण्यासाठीं त्याच्या अंगाला हात लाविला. परंतु तो स्पर्श होतांच तिला एक प्रकारची चमत्कारिक भावना झाली. त्याच संधीला सडकेवरून एक बैलाची गाडी गवत घेऊन गांवांत जात होती. गाडीवाला जिवाच्या ओळखीचा होता तें पाहून विमलेच्या मनांत एक विचार आला. आपण ज्या बाईची घरीं वाट पहात होतों, ती बाई इतक्यांत घरीं आली असेल; करितां या तरुणास आपण घरीं न्यावें म्हणजे तिच्याकडून सर्व व्यवस्था होईल, असा विचार तिच्या मनांत येऊन तिनें जिवाकडून त्या गाडीवानास सांगून गाडी जवळ आणविली. नंतर चौघे चौघेजण लागून

त्यांनीं त्या शुद्धिरहित तरुणास त्या गाडींत व्यवस्थित रीतीनें निजविलें आणि हळूहळू गाडी गांवांत आणिली. जिवा ती मोडलेली सायकल घेऊन विमले-बरोबर मागून येत होता, ती गाडी गांवांत येतांच मंडळीची गर्दी होऊं लागली.

विमला ज्या बाईची वाट पहात होती ती बाई किंवा तिचे बाबा—संतोबा अद्यापि घरीं आले नव्हते; तें पाहून तिला मोठा विचार पडला. आपण स्वतःच्या जबाबदारीवर या तरुणास घरीं आणिलें परन्तु लोक आपणास नांवें ठेवितील आणि आई देखील आपणास बोलेल, असें आतां तिला वाटूं लागलें. परंतु एखाद्या असहाय्य मनुष्याला मदत करणें हें आपलें कर्तव्य आहे अशी तिनें आपल्या मनाची समजूत केली. तथापि बिचारीला पुढलें भविष्य काय ठाऊक ? आज आपण ज्याच्यावर उपकार करीत आहोंत तो तरुण पुढें सर्वस्वी आपल्या दुःखाला कारण होणार आहे, हें कळण्याचें जरी तिच्याजवळ कांहीं साधन नव्हतें, तरी तिनें त्या तरुणाला तशा असहाय्य स्थितींत टाकलें असतें काय ?—नाहीं. विमला फारच कोंवळ्या मनाची सुशील मुलगी होती. विशेषतः परोपकार करणें हेंच प्रत्येकाचें कर्तव्य आहे, ह्या कर्तव्याचें तिला योग्य शिक्षण मिशनस्कूलमध्यें मिळालें होतें. आणि तें शिक्षण कृतींत उतर-विण्याचा आज तिला सुसमय प्राप्त झाला होता. तिनें उपकार म्हणून आज ही कृति केली, हें योग्यच होतें परन्तु आज त्या तरुणाचा तिच्या घरांत प्रवेश झाला म्हणजे तिच्या ग्रहदशेला आजपासून प्रारंभच झाला, असो.

त्या तरुणाला गाडींतून उतरविण्याची व्यवस्था होत असतां एक टांगा येऊन तेथें जवळच उभा राहिला. आणि एक मिशनरी युरोपियन बाई खालीं उतरली. तिला पाहतांच विमलेला आनंद झाल्यासारखा दिसला. ती चटकन् पुढें होऊन म्हणाली, “ बाई, तुम्हीं अगदीं वेळेवर आलांत. ही पहा एक सीरिअस केस आहे. ह्या मनुष्याला सायकल ॲक्सिडेन्ट झाला आहे. ”

“ मग अशी गर्दी काय केली आहे ? ” ती बाई पुढें होऊन म्हणाली, “ अरे !—हा तर बेशुद्ध आहे ?—जा हरि, पळ आणि डॉक्टर साहेबांना ही चिठी दे—” असें म्हणून तिनें आपली हँड बॅग उघडून एक कागद बाहेर काढला आणि त्यावर चार ओळी लिहून ती चिठी आपल्या टांगेवाल्या-जवळ दिली.

खालच्या मजल्यावर जिकडे तिकडे विणण्याचे माग असल्यामुळें त्या तरुणाला वरच्या मजल्यावर न्यावें लागलें. तेथें एका खोलींत पलंगवजा लहानशा खाटेवर त्या तरुणाला निजविण्याची व्यवस्था केली. नंतर त्या मिशनरी बाईनें त्याचे कपडे सैल करून थोडेंसें थंड पाणी त्याच्या तोंडावर शिंपडलें. तथापि तो शुद्धीवर येण्याचें कांहींच चिन्ह दिसेना. तेव्हां तिनें भिजलेला रुमाल त्याच्या छातीवर ठेवून ओल्या फडक्यानें त्याच्या तोंडावरील सर्व रक्त पुसून काढलें. तेव्हां त्याच्या कपाळावर झालेल्या दोन मोठ्या जखमा स्पष्ट दिसू लागल्या. थोड्या वेळानें त्या बाईनें चिठी पाठविल्याप्रमाणें मिशनचा गोरा डॉक्टर आला. त्यानें आपल्याबरोबरच सर्व साहित्यानें भरलेली बॅग आणिली होती. त्यानें कांहीं वेळ उपचार करतांच तो तरुण शुद्धीवर येण्याचें चिन्ह दाखवूं लागला. डॉक्टरानें त्याचें सर्व शरीर तपासल्यावर त्याला बऱ्याच गोष्टी कळल्या. त्या अपघातामुळें त्या तरुणाचा उजवा पाय गुडघ्यांत सुटला असून उजव्या हाताचा खांदा जबरदस्त सुजला होता. डॉक्टरानें प्रथम त्याच्या पायाला हिसका देऊन सुटलेलें हाड एका क्षणांत जागेवर बसविलें. परंतु त्याबरोबर त्या तरुणानें एक अस्फुट किंकाळी फोडून डोळे उघडले. प्रथम त्याच्या दृष्टीस जो देखावा पडला तो पाहून त्याचें मन गोंधळलें. आपणाजवळ एक युरोपियन उभा असून त्याच्याजवळ एक युरोपियन मिशनरी बाई आहे हें पाहून आपण ह्या मिशनऱ्यांच्या हातीं कसें सांपडलों हें त्याच्या लक्षांत येईना. त्यानें बाजूला मान फिरविली तेव्हां विमला त्याच्या दृष्टीला पडली. तिला पाहतांच ती मुलगी मिशनरी लोकांच्या शाळेंतील एक मुलगी असावी असें त्याला वाटलें. क्षणभर तो विचार करीत राहिला. नंतर त्यानें कपाळावर नेण्याकरितां आपला उजवा हात उचलला; तोंच त्याला कळ लागली आणि ती कळ लागतांच आपण सायकलवरून फार वेगानें जात असतां आपलें धोतर चाकांत अडकून आपणास अपघात झाला, याची त्याला आठवण झाली. आपणास अपघात झाला या गोष्टीची त्याच्या मनाला जाणीव होतांच त्याच्या शरिरांतून वेदना सुरू झाल्या.

" आतां कसं वाटतं ? " औषध पुढें करून डॉक्टरानें इंग्रजींत विचारलें.

" भयंकर वेदना होतात ! "

हें उत्तर त्या तरुणानें ज्या आवाजांत दिलें, त्या आवाजावरूनच त्याच्या सर्वांगाला होत असलेल्या वेदनांचें यथातथ्य दिग्दर्शन होत होतें. नंतर

डॉक्टरानें त्याचा दुखावलेला हात आणि पाय नीट पट्टयांनीं बांधून त्याच्या कपाळावर झालेल्या जखमांवर मलमपट्ट्या बसविल्या आणि त्यावरून पट्टा बांधून घेतला. नंतर तो मिशनरी बाईकडे वळून म्हणाला, " ह्या तरुणाला संकटमुक्त होण्यासाठीं आपणास आपल्या दयाळु आकाशांतील बापाची प्रार्थना केली पाहिजे. त्याचें आपणास सहाय्य घेतलें पाहिजे. "

लगेच त्या मिशनरी बाईनें आपल्या बॅगमधून प्रार्थना करण्याचें पुस्तक बाहेर काढलें. आणि तरुणाच्या खाटेजवळ गुडघे टेंकून ती बसली. तें पाहून डॉक्टरानें आणि विमलेनेंही तिच्या बाजूला गुडघे टेंकले. नंतर थोडा वेळ डोळे मिटून त्यांनीं मनांत परमेश्वराची प्रार्थना केल्यावर हातांत पुस्तक घेऊन डॉक्टर वाचूं लागला,

" हे परमेश्वरा* आपल्या क्रोधानें मला भडकावूं नकोस. आपल्या संतापानें मला शिक्षा करूं नकोस. हे परमेश्वरा ! मी म्लान आहे म्हणून मजवर दया कर. हे परमेश्वरा ! माझीं हाडें ठणकत आहेत, म्हणून मला बरें कर. माझा जीवहि फार पिडलेला आहे, तर हे परमेश्वरा ! किती उशीर करशील ? हे परमेश्वरा ! परत ये, माझा जीव मुक्त कर; तूं आपल्या कृपेमुळें मला तार. मी कण्हून थकलों; सारी रात्र मी आपली गादी पोहवितों. मी आपल्या आंसवांनीं पलंगाचें पाणी करतों शोकामुळें माझा डोळा आवळला आहे—सर्व दुष्कर्मांनों, मजपासून दूर जा: कां कीं माझ्या रडण्याचा शब्द परमेश्वरानें ऐकला आहे. परमेश्वरानें माझी काकळूत ऐकली आहे. परमेश्वर माझी प्रार्थना ऐकील—"

गुडघे टेंकून त्या मंडळीची ही प्रार्थना चालू असतां त्या खोलीला एक प्रकारचें गंभीर स्वरूप प्राप्त झालें. डॉक्टरच्या मुखांतून बाहेर पडणारा एक एक शब्द तो तरुण लक्ष देऊन ऐकत होता. त्या प्रार्थनेंतील प्रत्येक वाक्याचा त्याच्या दुःखी मनावर आशाजनक परिणाम होत होता. शेवटीं प्रार्थना आटोपल्यावर ' आमेन ' म्हणून ती मंडळी उठतांच आपण आतां लवकरच दुःखमुक्त होऊं असें त्याला वाटलें. तो कृतज्ञदृष्टीनें डॉक्टराकडे पहात असतां डॉक्टर म्हणाला, " तुमचे हात आणि पाय ' फ्रॅक्चर ' झाले आहेत. मीं

---

* गीत ६–१; ६–८.

त्यावरून पट्टा बांधून घेतला आहे. आतां बरोबर पंधरा दिवसांनीं हे पट्टे सोडायचे. तोपर्यंत तुम्ही उठण्याचा किंवा बसण्याचा बिलकुल प्रयत्न करूं नका. मी रोज येऊन तुम्हाला पाहून जाईन. ही विमला तुमची योग्य काळजी घेईल अशी माझी खात्री आहे. आमच्या मिशनमध्यें असतांना रोग्याची शुश्रूषा कशी करावी याचा तिनें सहा महिने चांगला अभ्यास केला आहे. तुम्ही कांहीं काळजी करूं नका. आमचा नोकर तुम्हाला रोज औषध आणून देईल. तुम्ही लवकर बरे व्हाल.—बरं पण ही तुमच्या ऍक्सिडेन्टची खबर कोणाला सांगावयाची आहे काय ?"

"होय. येथें बागडपट्टींत प्रार्थनासमाज जवळ माझे मामा—रामदेवराव काकडे राहतात, त्यांना ही माझी हकीकत कळली तर फार बरें होईल."

"ठीक आहे. मी त्यांना कळविण्याची व्यवस्था करतों." असें म्हणून डॉक्टरानें आपल्या खिशांतून नोटबूक काढिलें आणि त्यावर पत्ता लिहून घेऊन 'तुमचें नांव काय ?' असा त्या तरुणास प्रश्न केला.

"माझें नांव नरसिंगराव."

नंतर विमलेला औषधाची योजना कशी करावयाची तें सांगून डॉक्टर आणि मिशनरीबाई जाण्याकरितां निघाले. विमला त्यांना पोंचविण्याकरितां जिना उतरून खालीं गेली. थोड्या वेळानें डॉक्टर आणि मिशनरी बाई निघून गेल्यावर एक उतार वयाची स्त्री आंतून दरवाजाजवळ येऊन म्हणाली, "विमले, ही तुला उठाठेव सांगितली होती कुणीं ? तो कोणाचा कोण, आणि तूं त्याला वेलाशक घरांत घेऊन आलीस ती तुला कांहीं लाजलज्जा तरी ! तूं आतां घरीं आली आहेस, आतां तूं काय काय धुडगूस घालशील तें खरं ! आतां घरीं तर येणें होऊं दे म्हणजे तुझी चांगलीच बत्तिशी रंगवितें."

'पण आई—"

"गप्प !—एक शब्दही बोलूं नकोस ! तुझे हे चाळे मला नाहीं खपायचे सांगतें. तूं आपली उद्यां त्या शाळेंत जाऊन रहा कशी आणि घाल तेथें वाटेल तसा धिंगाणा ! माझ्या घरांत नकोत हे तुझे चाळे. लोक थुंकतात माझ्या तोंडावर ! इतकीं वर्षें पडलीं होतीं लोकांच्या तोंडाला कुलुपं पण झालं परवांपासून पुनः गाडं सुरूं !"

"पण आई, लोक काय बोलतात ? त्यांना बोलायला काय—"

"विमले, आतां तुला साफ सांगतें, तूं मला 'आई-आई' म्हणून

म्हणत जाऊं नकोस. इतकीं वर्षें भीडभिकेनें केलं सहन पण आतां साफ सांगतें तुला. '

" आई, तूं असं काय बोलतेस ? तूं माझी आई ना ? "

" नाहीं—नाहीं. मी तुझी आई नाहीं. आणि तूं माझी कोणीं नाहींस "

" म्हणजे ?—असं कसं बोलतेस आई ? "

" कसं बोलतें तें विचार बाहेरून आल्यावर—"

इतक्यांत स्वयंपाकघरांतून चुलीवर ठेवलेला जिन्नस करपल्याचा वास आला. त्याबरोबर ती स्त्री तशाच रागांत फणफणत आंत निघून गेली. विमला दरवाजांतच विचार करीत उभी राहिली. तिनें आज एक नवीन गोष्ट ऐकिली. आपली आई ' मी तुझी आई नाहीं ' असें म्हणते, याचा अर्थ काय, हेंच तिला कळेना. किती वेळपर्यंत तरी ती तेथें विचारमग्न स्थितींत उभी होती. हळूहळू काळोख पडूं लागला तरी तें तिच्या लक्षांत आलें नाहीं. शेवटीं आंतून ती जिला आई म्हणत होती तिची—भवानीबाईची आरोळी ऐकूं आली. विमले, दिवे नाहीं का तुला लावायचे ?' ही रागाची सूचना मिळताच ती भानावर आली. तोंच वर नरसिंगराव एकटेच काळोखांत आहेत याची तिला आठवण झाली. तिनें बाजूच्या खोलींत जाऊन दिवा लाविला आणि तो ती वर घेऊन गेली. हातांतील दिव्याचा प्रकाश तिच्या तोंडावर पडला होता. ती जिना चढून आंत त्या तरुणाच्या अगदीं जवळ येईपर्यंत तो तिच्या तोंडाकडे पहात होता. इतका वेळ त्याच्या मनांत अनेक कल्पना येऊन गेल्या होत्या. आपण कोणाच्या घरीं आहोंत, हें घर शहराच्या कोणत्या भागाला आहे, ह्या घराचा मालक कोण आहे; तो जातीनें कोण आहे, घरांत माणसें किती आहेत, हे सर्व प्रश्न त्यानें आपल्या मनाला विचारले. परतु माहितीच्या अभावीं त्याच्या मनानें एकाहि प्रश्नाचें त्याला उत्तर दिलें नाहीं. तेव्हां तो स्वतःविषयीं विचार करूं लागला. वरच्या छताकडे पहात त्याचे विचार चालू होते. आपणास अपघात होण्यापूर्वीं आपण किती आनदांत होतों आणि आतां आपली किती कष्टमय स्थिती झाली आहे, हा विचार त्याच्या मनाला अस्वस्थ करूं लागला. बराच वेळ झाला. परंतु वर कोणीं येईना. हळू हळू काळोख पडूं लागला. आणि सर्वत्र अगदीं सामसूम भासूं लागलें. इतक्यांत ' विमले, तुला दिवे नाहीं का लावायचे ! ' हे भवानीबाईनें रागानें उच्चारिलेले शब्द त्याला ऐकूं आले. तेव्हां आतां विमला दिवा घेऊन

वर येईल असा तर्क करून तो जिन्याकडे पहात राहिला. थोड्या वेळानें वर वर्णन केल्याप्रमाणें विमला दिवा घेऊन वर आली. तिनें कोनाड्यांत दिवा ठेविला आणि विचारलें, " आतां तुम्हांला कसं वाटतं ? "

" थोडं बरं वाटतं. पण मी येथें कसा आलों; मला येथें कोणीं आणलं हें मला कळेल काय ? "

" मी खालीं दरवाजांत उभी होतें. इतक्यांत आमच्या शेजारच्या आळींतला जिवा धांवत आला आणि आपण बायसिकलवरून कातळावर पडलां आहांत असें त्यानें सांगितलें. तेव्हां मी त्याच्याबरोबर तेथें गेलें आणि तुम्हाला येथें आणलं. इतक्यांत आमच्या मिशनच्या बाई आल्या. त्यांनीं डॉक्टरसाहेबांना बोलावून आणविलें. "

" आपले मजवर अगणित उपकार झाले आहेत हें मी केव्हांही विसरणार नाहीं. आपण मला आज जीवदान दिलं आहे. पण विमलाबाई, मला तुम्हीं येथें आणलं म्हणून तुमच्या आईचा तुमच्यावर राग झाला काय ?—होय. तुम्ही बोलत नाहीं, तुमच्यावर मंडळी रागावली आहेत असंच दिसतं. शिवाय आतां दिवा लावण्याकरितां खालीं कोणीं बोललं, तेहि रागांतलेच शब्द होते खरं ना ?—आतां खालीं बोलल्या त्या कोण तुमच्या आई वाटतं ? "

" हो—य—नाहीं. "



## २ पूर्ववृत्तांत

कांहीं शतकांपूर्वी आमच्या पूज्य पूर्वजांनीं अनुभविलेल्या सुखदुःखाच्या प्रसंगांची आठवण आज आम्हांला ऐतिहासिक स्थळेंच करून देत आहेत. अशीं स्थळें आमच्या हिंदुस्तान देशांत अनेक आहेत. तथापि ह्या स्थळांना महत्त्व येण्यास मानवी कृतीच सर्वस्वी कारण झाली आहे. आमच्या प्रस्तुत कथानकाचें स्थल अहमदनगर आहे. ह्या स्थलाची आठवण होतांच आपल्या नांवाचा महाल बांधून स्वतःचें नांव अजरामर केलेल्या एका यवनी स्त्रीचें चित्र आपल्यापुढें उभें राहतें. तसेंच आपल्या बादशाही वैभवाच्या मिरवणुकीनें मराठ्यास घाबरवून सोडण्याच्या इराद्यानें सव्वादोनशें वर्षांपूर्वी दिल्लीपति औरंगजेब अहमदनगरास येऊन राहिला होता. त्याची आठवण

आतां आम्ही विसरलों आहोंत. परंतु त्यापूर्वी शंभर वर्षे त्याच किल्ल्याचें* स्वतः लढून चांदबिबीनें मोठ्या धारिष्ट्यानें रक्षण केलें. ती तिची कृति इतिहासांत चिरस्मरणीय झाली आहे. हें अहमदनगर शहर वसविलेलें असल्यामुळें आंतील पेठांची रचना व्यवस्थित झाली आहे. शहराभोंवतीं मोठा तट असून प्रत्येक दिशेला भव्य दरवाजा आहे. लुगडीं आणि खण याबद्दल ह्या शहराची प्रसिद्धी आहे. आणि दुष्काळाच्या बातमींत तर हा संबंध जिल्हा मशहूरच आहे. शहरांतील वस्तीच्या मानानें येथें मिशनरी लोकांची संख्या फार आहे. ह्या मिशनरी लोकांनीं येथें एक हॉस्पिटल व चर्च बांधून कांहीं शाळाहि काढिल्या आहेत. त्यापैकीं एक 'पवित्र मॉनिकाची शाळा' नुकतीच सुटली होती. त्या शाळेंत शहरांतील कांहीं मुली येत असत. गेल्या प्रकरणांत उल्लेख केलेले रामदेवराव यांची मुलगी कमला त्याच शाळेंत जात असे. शाळा सुटल्यावर कमला बाहेर आली आणि दरवाजाजवळ उभ्या असलेल्या आपल्या गाडींत बसूं लागली. त्यावेळीं कांहीं मुलींनीं तिच्याकडे पाहून उपहासपूर्वक हास्य केलें. तेव्हां तिला राग येऊन तिनें आपलें तोंड फिरविलें.

रामदेवराव हे शहरांत सावकार म्हणून प्रसिद्ध होते. त्यांच्या वडिलांनीं पांचपन्नास कोष्टी नोकरीला ठेवून त्या धंद्यांत पैसा मिळविला होता रामदेवराव तीस वर्षांच्या वयाचे होईपर्यंत छंदीफंदी होते अशी अजून बोलवा ऐकूं येते. आपल्या एकुलत्या एक मुलानें लग्न करावें आणि आपला वंश वाढवावा म्हणून रामदेवरावांच्या वडिलांनीं सतत दहा वर्षे त्याची पाठ पुरविली. शेवटीं म्हातारा आजारी पडला. तेव्हां डोळ्यांत पाणी आणून 'तूं लग्न करावेंस एवढीच माझी शेवटची इच्छा आहे. ही इच्छा तूं पूर्ण कर म्हणजे मी सुखानें मरेन.' असें सांगितलें. त्यावेळीं मात्र रामदेवरावांचें मन वळलें आणि त्यांनीं 'लग्न करतों' असें आपल्या वडिलांस सांगितलें. मग काय उशीर ? तात्काळ वधूशोधन होऊन एका महिन्यांत ते संसारी बनले. आपल्या मनाप्रमाणें झालेलें पाहून चार महिन्यांनीं म्हाताऱ्यानें मोठ्या

* हल्लीं हिंदुस्थानांत सुस्थितींत असलेल्या हाताच्या बोटावर मोजाव्या इतक्या भुईकोट किल्ल्यांत ह्या अहमदनगरच्या किल्ल्याचा पहिला नंबर आहे. ह्या किल्ल्यावर युनिअन जॅकचा बावटा फडकत होता. आमच्या दयाळु इंग्रज बहाद्दर सरकाराचें जर्मनीबरोबर युद्ध सुरू होतांच जर्मन राजकीय कैदी त्यांनीं ह्याच किल्ल्यांत आणून ठेविले होते.

आनंदानें आपला देह ठेवला. पुढें वडिलांच्या मागें रामदेवराव साफ सुधारले. त्याचे सर्व छंद सुटले. आणि ते व्यवस्थित रीतीनें संसाराला लागले. त्यांचीं दोन वर्षें मोठ्या सुखांत गेली. तितक्या अवधींत त्यांना एक मुलगी झाली. परंतु दुसऱ्या बाळंतपणांत त्यांच्या पत्नीनें दगा दिला. बिचारी कमला पोरकी झाली. नंतर रामदेवरावांच्या मित्रमंडळींनीं त्यांना पुनः लग्न करण्याचा पुष्कळ आग्रह केला. परंतु ते लग्नाच्या भानगडींत पडले नाहींत. आपल्या मुलीचें लाडांत संगोपन करण्यांतच त्यांनीं वर्षें लोटलीं. रामदेवरावांना भालेराव नांवाचे एक मित्र होते. ह्या मित्राच्या संगतीनें रामदेवरावांना म्हणा अगर रामदेवरावांच्या संगतीनें ह्या मित्राला म्हणा, परस्परांना पुण्याच्या रेसिसचा—घोड्यांच्या शर्यतीचा नाद लागला. रामदेवरावांना दैव अनुकूल होतें. त्यांनीं ह्या शर्यतींत गमावण्यापेक्षां दोन पैसे कमाविले. परंतु भालेरावानें मात्र आपलें होतें नव्हतें तेवढें गमावून शेवटीं अब्रूकरितां आत्महत्या केली, असें लोक बोलतात. ह्या भालेरावांस नरसिंगराव हा एकच मुलगा होता. आपल्या मित्राच्या मागें ह्या मुलाचा रामदेवरावांनीं चांगला परामर्श घेतला. तो चौदा वर्षांचा झाला तेव्हां त्याला त्यांनीं अलाहाबाद सेंट्रल हिंदु कॉलेजांत शिक्षणाकरितां ठेविलें. तेथें तो नुकताच बी. ए. झाला होता. तो रामदेवरावांना 'मामा' ह्या नांवानें संबोधीत असे. त्याचा अलाहाबादचा अभ्यास पूर्ण झाला असें पाहून रामदेवरावांनीं त्याला परत अहमदनगरास बोलाविलें. आणि त्याप्रमाणें तो आला.

आम्ही ज्या दिवसाची आज हकीगत लिहीत आहोंत, तो नरसिंगरावाला अहमदनगरास येऊन तिसरा दिवस होता. पहिले दोन दिवस विश्रांति घेण्यात घालवून आज तो आजुबाजूला असलेलीं ऐतिहासिक रम्य व प्रेक्षणीय स्थळें पाहण्याकरितां सायकल घेऊन बाहेर पडला होता. अलीकडे रामदेवरावांची प्रकृति वरचेवर नादुरुस्त होत असल्यामुळें ते सहसा कोठेंहि बाहेर जात नसत. त्यांच्या पिकलेल्या केसाकडे आणि सुरकुत्या पडलेल्या चेहऱ्याकडे लक्षपूर्वक पहाणाराला त्यांना कांहीं तरी मानसिक रोग असावा असें सहज लक्षांत येत असे. अलीकडे वर्ष सहा महिने त्यांच्या या मानसिक रोगाचें प्रमाण बरेंच वाढलें असावें, असें त्यांच्या नित्याच्या वागणुकीवरून दिसून येत होतें. शिवाय नरसिंगराव आल्यापासून ते कोणत्या तरी गहन विचारांत असावेत असेहि सर्वांच्या लक्षांत येऊन चुकलें होतें.

संध्याकाळचा सुमार झाला होता. रामदेवराव दिवाणखान्यांत एकटेच बसले होते. इतक्यांत त्यांच्याच वयाचा एक मनुष्य आंत आला. त्याच्याकडे पहात रामदेवराव म्हणाले, “ काय संतोबा, काय खबर आहे ? मी सांगितलं होतं त्या गोष्टीचं काय केलं ? आणिली का तिला घरीं ? ”

“ होय, परवांच—तुम्ही सांगितलं त्याच दिवशीं मीं विमलेला घरीं आणलीं. पण बापुसाहेब, आतां लोकांत चर्चा सुरू होईल—होईल का ? कालपासून चर्चा सुरू झालीच ! ती कोण ? काय ? म्हणून कालपासून लोकांनीं विचारपूस करण्यास सुरुवात केलीच आहे. शिवाय तिला घरीं आणलं ही गोष्ट आमच्या कुटुंबाला बिलकूल खपली नाहीं. ”

“ तिची आतां कांहीं तरी व्यवस्था करणें जरूर आहे. ही पोर लहान होती, तेव्हांचा प्रश्न निराळा होता. पण आतां ती मोठी झाली आहे, तशी तिच्याबद्दल काळजीहि वाढली आहे. तो नरसिंगरावही परवां [illegible] आला आहे. त्याच्याविषयीं पुढें काय करावयाचें तें मी ठरवून ठेविलें आहे. पण ह्या पोरीविषयीं मात्र कोणता एकहि विचार अद्यापि कायम होत नाहीं. ”

“ मग तुम्हीं तिला मिशनस्कूलमधून आणण्याची एवढी घाई कां केली ? ”

“ घाई कां केली ? ” इतकें बोलून रामदेवराव क्षणभर थांबले. नंतर ते म्हणाले, “ याचें कारण. मी त्या दिवशीं सहज तिची चौकशी करण्याकरितां तिच्या मिशनमध्यें गेलों होतों. तेव्हां तिच्याबरोबर त्या मिशनच्याचें वर्तन पाहून मला मोठी काळजी उत्पन्न झाली. आणि अशी शंका वाटू लागली कीं, जर तिला आणखी कांहीं दिवस मिशनमध्यें ठेविलें तर तिच्याकडून धर्मांतर देखील होईल. म्हणून मी तुम्हाला तिला घरीं आणण्यास सांगितलं. आतां ती घरीं आली आहे, तेव्हां तिचा खर्च वाढला हें मी जाणतों. आणि त्याबद्दल मीं व्यवस्थाही केली आहे, मी ह्या महिन्यापासून तुम्हाला दहाच्या ऐवजीं वीस रुपये देत जाईन; मग तुम्हास कुरकुर करण्यास कांहीं जागा नाहीं असं मला वाटतं. ”

“ छे छे ! बापुसाहेब, त्यांत कुरकुर कसली ? पण ह्या आमच्या कुटुम्बापुढें कांहीं इलाज चालत नाहीं. ती मुलगी कोण ? तिचे आईबाप कुठें आहेत ? तिला तुम्हीच का घरीं आणली ? इत्यादि अनेक प्रश्न एकसारखे विचारून गेले दोन दिवस तिनें मला अगदीं भंडावून सोडलं आहे. ”

“ मग तुम्हीं काय सांगितलं ? ”

" सांगायचं काय ? मला खरोखरीच जर कांहीं माहिती नाहीं तर मी तिला सांगणार काय ? विमलेला मिशनच्या शाळेंत घालून तेरा चौदा वर्षे झालीं त्यावेळीं ती चार वर्षांची होती. आणि आमच्या कुटुंबाचेहि ते उमेदीचे दिवस होते. तेव्हां विमला ही एक पोरकी पोर आहे असें म्हणून तिनें तिचे लाड केले. परंतु आतां ती परवां परत आली, तेव्हां तिला आमच्या कुटुंबानें ओळखलें देखील नाहीं. कारण ती आतां चांगली अठरा वर्षांची झाली आहे. आणि—"

" पण संतोबा, मुलगी बांध्यानें आणि स्वरूपानें कशी काय आहे ? "

" तें काय विचारतां बापूसाहेब ? आपल्या ह्या नगरांत तिच्या तोडीची तिच्या शेजारी उभी करायला एकहि मुलगी मिळावयाची नाहीं. तिचें नाक, डोळे जिथल्या तिथें अगदीं रेखलेले आहेत. न्यून म्हणून नाहींच तिच्या अवयवांत ! पण बापुसाहेब, आतां तरी कळूं द्या मला तिचे आईबाप कोण ते ? "

" संतोबा, तेवढें मात्र विचारूं नका. तिच्या बापाला तो मरतांना मी वचन दिलं आहे म्हणून माझा नाइलाज आहे. आतां विमलेचे आईबाप तुम्हीच. "

" असं कसं होईल बापुसाहेब ? ती आमची मुलगी नाहीं हें पुष्कळांना माहिती आहे. बाकीं अद्यापि विमलेला स्वतःबद्दल कांहींच माहिती नाहीं म्हणा ! ती तर आम्हांलाच आईबाप समजते. पण असं हें आतां किती दिवस चालावयाचं ? आणि पुढं काय करावयाचं तें तरी कळूं द्या. इतकीं वर्षे ती दृष्टीआड असल्यामुळें तिच्याविषयीं विशेष असे विचार मनांत आले नाहीं. पण आतां ती रात्रंदिवस डोळ्यापुढें रहाणार तेव्हां कसें ? तिच्याविषयीं कांहीं तरी निर्वाणीचा विचार होणें अवश्य नाहीं काय ? तसंच तिच्या लग्नाचें तरीं कसं व कुठें जुळवायचें ?—मोठा प्रश्नच आहे हा बापुसाहेब ! "

हा शेवटचा प्रश्न ऐकतांच रामदेवरावांची चर्या गंभीर दिसूं लागली. ते डोकें खाजवीत म्हणाले, " संतोबा, मीं अद्यापि ह्या गोष्टीचा विचार केला नाहीं. बाकी प्रश्न मोठा बिकट आहे खरा ! "

इतक्यांत धाडकन् दरवाजा उघडून कमला आंत आली. तिच्या कपाळाला आठ्या पडल्या होत्या. आईच्या माग बापानें तिचें संगोपन लाडांत केल्यामुळें तिच्या आश्रयाला बरेच दुर्गुण आले होते, ती सुंदर होती तरी अभिमानानें आणि हट्टीपणामुळें तिची चर्या सदासर्वदा दुर्मुखलेली असे. आपणांपेक्षां दुसऱ्याजवळ कांहीं जास्त आहे असें तिच्या लक्षांत आलें कीं तिच्या द्वेषाला

सुरुवात होत असे. मग एखाद्या मुलीनें तिच्यापेक्षां चांगले कपडे घातलेले असोत, किंवा ती जरा सुंदर असो, कमला त्या मुलीचा मनांत द्वेष करूं लागे. एकंदरीनें तिला दुसऱ्याचें चांगलें असें कांहीं सुद्धां खपत नसे. शिवाय स्वतः चांगले फॅशनेबल कपडे, सुंदर बूट आणि उंची सुवासिक तेलें वापरण्याचा तिला फार शोक होता. रामदेवरावही तिची प्रत्येक इच्छा पूर्ण करीत असत. आणि यदाकदाचित् तिच्या इच्छेआड ते आले तर ती हट्टानें दोन दिवस उपाशीं राहून आपल्या मनासारखें करून घेत असे. आतां ती जोरानें दरवाजा उघडून आंत आली तेव्हांच 'आज कांहीं तरी बिघडलं आहे!' अशी रामदेवरावांना शंका आली. आणि ते तिच्याकडे पहात राहिले. कमला दण् दण् पाय आपटीत पुढें आली आणि म्हणाली, "बापुसाहेब, ह्या सखूला आपल्या घरांतून काढून टाका, तर मी उद्यां शाळेंत जाईन सांगतें! तिनें आज कांहींच्या कांहींच मुलींना सांगितलं. आणि सर्व मुली मला चिडवूं लागल्या. मी नाहीं जा—मला नाहीं हें असलं खपायचं!"

"पण झालं काय? तिनें असं काय सांगितलं?"

"काय सांगितलं! 'आमच्या कमलाबाईचा नवरा घरीं आला आहे' असं तिनं सांगितलं आणि सर्व मुली 'नरसिंगराव' 'नरसिंगराव' म्हणून मला एकसारख्या चिडवूं लागल्या."

"इतकंच ना? मग त्यांत काय झालं चिडायला?

"काय झालं चिडायला!" असें तोऱ्यांत म्हणून कमला तशीच फणकाऱ्यानें पाय आपटीत निघून गेली. तेव्हां तिच्याकडे पहात 'काय वेडी पोर आहे!' असें रामदेवराव म्हणाले. संतोबा जवळच हा सर्व संवाद ऐकत होते. ते म्हणाले, "काय बापूसाहेब, कमलाबाईच्या लग्नाचा विचार चालविला आहे वाटतं?"

"होय. असा कांहीं विचार करतों आहे खरा! नरसिंगराव आतां आला आहे. तेव्हां हळूहळू मी त्याच्याजवळ ही गोष्ट काढणार आहे. काय—तुमचं काय मत आहे?"

"मी काय यांत मत देणार? तुम्ही योग्य तेंच करणार! मी आज दहा बारा वर्षें त्याला पाहिलं आहे कुठें? पण काय हो, त्यानें कोठलीशी एक मोठी परिक्षा दिली आहे ना?"

"होय. त्याची बी. ए. ची परीक्षा झाली. आणि मला स्वतःला तो फार

रसंत आहे. शिवाय त्याच्या इस्टेटीचा सर्व घोंटाळा आहे ना ? तेव्हां त्याला जांवई करूनच तो सर्व इस्टेटीचा घोटाळा मिटवावा अशी माझी इच्छा आहे."

"आतां कसला आला आहे घोंटाळा ? सर्व तर तुमच्याच ताब्यांत आहे. तुम्ही कराल तेंच आतां प्रमाण होणार आहे."

"असं कसं म्हणतां ? माझ्या ताब्यांत ती असली तरी न्यायानंच सर्व कांहीं झालं पाहिजे. नरसिंगरावाच्या वडिलांचा—भालेरावाचा आणि माझा स्नेह-संबंध होता. परन्तु त्या शर्यतीच्या व्यसनामुळें त्यानें सर्व इस्टेट गहाण टाकून एक कर्जाचा मोठा बोजा करून ठेविला. शेवटीं शेवटीं त्याची स्थिति इतकी वाईट झाली कीं, त्याला कोणी पैसा देखील उसनवार देईना. तेव्हां त्यानें मला फार गळ घातली. मग मी केवळ स्नेहसंबंध म्हणून त्याची दोन चार सावकारां-कडे विभागलेली सर्व इस्टेट एकट्याकडे घेतली. त्यांत मला दोन पैसे मिळवा-यचे होते अशांतला भाग नाहीं. केवळ भालेरावाकरितांच मी त्याच्या इस्टेटीच्या किंमतीच्या बाहेर त्याची गरज केली. परन्तु त्यानें पुढली कांहीं एक व्यवस्था न करितां एके दिवशीं आत्महत्त्या करून घेतली आणि मला मात्र संकटांत पाडलें."

"मग भालेरावांची सर्व इस्टेट तुमच्याच ताब्यांत आहे म्हणावयाची !"

"हीय ती सर्व इस्टेट आणि त्याचा मुलगा नरसिंगरावसुद्धां माझ्या ताब्यांत आहे. गेलीं सत्रा अठरा वर्षें मला माझ्या रकमेचें व्याजसुद्धां नाहीं. उलट ह्या नरसिंगरावाच्या शिक्षणाप्रीत्यर्थ आणि इस्टेटीची डागडुजी करण्यांत वर्षाकाठीं मला हजार पांचशेंचा खर्चच आहे."

"असं जर आहे तर मग तुम्ही हा योजलेला विचारच चांगला आहे. आज इतकीं वर्षें बापाच्या मागें तुम्हीं त्याचें पालन पोषण केलं आणि त्याला इतका विद्याभ्यास करविला तेव्हां तो कांहीं तुम्हाला परका नाहीं. बरं पण तो आतां आहे कुठें इकडे दिसला नाहीं तो ?"

"तो सायकलवरून चांदबिबीचा महाल पहाण्याकरितां गेला आहे. त्याला ऐतिहासिक स्थळें पाहण्याची आवड आहे असं दिसतं. कारण दुपारीं त्यानें मजजवळ बरीच चौकशी केली."

"बरं मग मी आतां घेऊं रजा ?" असें म्हणून संतोबा उठला. तेव्हां त्याच्यापुढें दोन नोटा करून रामदेवराव म्हणाले, "हे घ्या रुपये. आणि संतोबा, हें लक्षांत असूं द्या कीं, कांहीं झालें तरी माझें नांव विमलेला बिलकूल

कळतां उपयोगी नाहीं. आणि तिला सांभाळून घे असें तुमच्या कुटुंबाला नीट समजावून सांगा."

संतोबानें त्या नोटा घेऊन खिशांत टाकल्यावर रामदेवराव पुढें म्हणाले, "हें पहा संतोबा, ह्या विमलेच्याविषयीं जेव्हां जेव्हां माझ्या मनांत विचार येतात तेव्हां तेव्हां मी अगदीं गोंधळून जातों. मला कांहीं एक सुचत नाहीं अशी माझी अगदीं चमत्कारिक स्थिति होऊन जाते. त्यावेळीं मित्रकार्य म्हणून ही विमलेची जबाबदारी शिरावर घेतांना मला कांहीं वाटलं नाहीं. परन्तु आतां मात्र मला मोठा पेंच पडला आहे. आतां तुम्हांला खरंच सांगतों संतोबा, ह्या गेल्या दोन वर्षांत अशी एकहि रात्र गेली नाहीं कीं, माझ्या मनांत ह्या विमलचा विचार आला नाहीं. आतां ती कांहीं लहान नाहीं. वास्तविक एव्हांना तिचें लग्न व्हावयास पाहिजे होतं. पण 'आपलं नांव कुणाला कळवायचें नाहीं' अशी तिच्या बापानें मजकडून शपथ वाहून घेतली आहे. ती शपथ आतां ह्या पोरीला नडणार !"

"खरंच ! कोणाची मुलगी हें कळल्याशिवाय कोण तिच्याबरोबर लग्न करण्यास तयार होणार ? अर्थात् बापाचं नांव माहित नाहीं तेव्हां तिची जात, कुळ तरी कसं कळावं ?"

"मोठं गूढ आहे तें येथेंच आहे." कपाळावरून हात फिरवीत रामदेवराव म्हणाले, "आतां पुढें काय होईल तें खरं ! परंतु आतां असं स्वस्थ बसून चालायचं नाहीं. तिच्या संबंधानें कांहींतरी निश्चयात्मक विचार केलाच पाहिजे इतकी गोष्ट मात्र खरी."

"पण बापूसाहेब, अशी विलक्षण परिस्थिति प्राप्त झाली असतां शपथ मोडली तर त्यांत कांहींएक पाप नाहीं. कारण ह्या एका गोष्टीवर विमलेचें सर्व सुखदुःख अवलंबून आहे."

"ह्या सर्व गोष्टी मला मान्य आहेत. प—ण—!"

"हा 'पण' च जिकडे तिकडे नडतो. म्हणून म्हणतों. बापुसाहेब, तुम्ही पुनः एकदां ह्या सर्व गोष्टींचा नीट विचार करा. आणि मग पुढें आपण एकदां बसून काय तो शेवटचा निकाल करूं." असें म्हणून संतोबा उठले.

संतोबा निघून गेल्यावर बऱ्याच वेळानें रामदेवरावांच्या तोंडांतून 'अरेरे ! विमले ! काय हें तुझें खडतर नशीब ! किती दुर्दैवी आणि अभागी तूं !' इतके उद्गार बाहेर पडले. त्यांच्या मनांत पुष्कळ बरे वाईट विचार येत होते.

एक मोठा बिकट प्रश्न त्यांना आतां सोडवायचा होता. परंतु तो सुटण्यासारखा नव्हता, इतकी गोष्ट मात्र खरी ! इतक्यांत ' बापुसाहेब ' ' बापुसाहेब ' म्हणून हाका मारीत कमला आंत आली. तिच्या हातांत एक पत्र होतें. तें पुढें करून ती म्हणाली, " बापुसाहेब, मिशन हॉस्पिटलचा शिपाई हें पत्र घेऊन आला आहे. "

" का बरं ? कांहीं मदतीची भिक्षा मागायला आला आहे कीं काय ? " असें म्हणून त्यानीं पत्र उघडलें आणि वाचलें. पत्रांत चारच ओळी होत्या परंतु त्या चार ओळींनीं त्यांची गडबड उडविली. ते एकदम उठले आणि म्हणाले, " अर्रर्र ! हा काय गोंधळ झाला ? कुठें आहे—कुठें आहे तो शिपाई ? "

" पण काय झालं बापुसाहेब ? "

" अग, नरसिंगरावाला सायकलचा ॲक्सिडेन्ट झाला ! "



## ३ मित्रवृत्तांत

" विमला —विमला—! "

संतोबानें घरांत पाय ठेविल्यावर सर्वत्र काळोख पाहून त्याला फार आश्चर्य वाटलें. विमला घरीं आल्यापासून त्यांच्या घराचा सर्वच नूर बदलला होता. विमलेला मिशनस्कूलची शिस्त लागली असल्यामुळें ती घरीं येतांच तिनें दोन दिवस खपून प्रथम सर्व घर स्वच्छ केलें. तिची टापटीप व स्वच्छता पाहून संतोबाला आणि भवानीबाईला फार समाधान झालें. विमलेनें जरी शाळा सोडिली होती तरी मोठ्या मिशनरीबाईनें तिला ' मी रोज संध्याकाळीं एक तास तुला घरीं शिकविण्याकरितां येत जाईन ' असें कबूल केलें होतें. त्यांच्या मिशनमध्यें सर्वांत जुनी मुलगी विमलाच होती. त्यामुळें तिच्यावर सर्वांचा लोभ जडला होता. आणि ती देखील सर्वांच्या लोभाला आणि प्रेमाला पात्रच होती. ती मिशनमध्यें असतांना संतोबानें तिच्या जेवणाची व्यवस्था एका बाईकडे केली होती. ती तिला सकाळ संध्याकाळ जेवण नेऊन पोंचवीत असे. त्याबद्दल संतोबा त्या बाईला बापुसाहेबांकडून मिळणाऱ्या दहा रुपयांतून पांच रुपये देत असत. विमला मिशनमध्यें रहात असे. ती सर्वांत जुनी मुलगी असल्यामुळें मिशनमध्यें तिला एक स्वतंत्र खोली मिळाली होती. असो. आतां ती संतोबाच्या घरीं आली

होती. ती आतां येथेंच रहाणार असें कळतांच शेजारपाजारच्या घरांत तिच्याविषयीं कुरकुर सुरू झाली. आणि दुसऱ्याच दिवशीं एका बाईनें ' ही येसू खिस्तीच्या कळपांतली बाटलेली पोर तुम्हीं घरीं आणिली; आतां तुमचा आमचा व्यवहार तुटला ! ' असें भवानीबाईला स्पष्ट सांगितलें. त्यामुळें तीहि उसळली. आणि त्याबाबतींत पतीला बोलण्याची ती संधि पहात होती. परंतु विमलेनें दोन दिवस खपून घरांत स्वच्छता करण्यांत जी मेहनत केली, ती पाहून व तिचें प्रेमळ व मनमिळाऊ भाषण ऐकून तिच्याविरुद्ध पतीजवळ तक्रार करण्याचा तिला धीर झाला नाहीं. तथापि आज मात्र तिला अनायासें संधि मिळाली आणि त्या संधीचा तिनें कसा फायदा घेतला, त्याचा उल्लेख पहिल्या प्रकरणांत केलाच आहे. तिनें विमलेला दिवा लावण्यास सांगितलें. परंतु ती स्वतः मात्र बाहेर आली नाहीं, कारण तिच्या तोंडावर आपणास इतक्या जोरानें व रागानें बोलावणार नाहीं अशी तिची खात्री होती. विमलेनें एक दिवा लावून तो वर नेला आणि पुनः ती दुसरा दिवा लावण्याकरितां खालीं येणार होती. परंतु नरसिंगरावानें तिला बोलण्यांत गुंतविल्यामुळें तिचा नाईलाज झाला. इतक्यांत संतोबाची हांक तिला ऐकूं आली. ती जिना उतरून खालीं येण्यापूर्वीच भवानीबाई पुढें आली. तिला पाहून संतोबा म्हणाले, " कां अद्यापि काळोख पडला नाहीं वाटतं !—विमला कुठें आहे ? "

" ही मी आलें बा—बा ! "

" कां अशी अडखळलीस कां ? "

" कां नाहीं अडखळणार ? " रागानें भवानीबाई म्हणाली, " मिशनमध्यें ढंगसंग केलेले चालतात ! तो वाटेंतला चोर घरीं आणण्याची हिला काय एवढी पंचाईत पडली होती ? मरे ना का तो—मेला असता तिथें तर हिला का मला येणार होतं सुतक ? "

" अग पण असं काय झालं तुला कातवायला !—आणि ही बायसिकल कुणाची इथं ? "

" विचारा—विचारा आतां आपल्या ह्या विमलाबाईला !—हें पहा, मी आतां लख्ख सांगतें, मला हें कांहीं खपावयाचें नाहीं. कालच त्या शेजारच्या तुकाबाई म्हणाल्या, ' आतां तुमच्या घरांत बाडगा कारभार सुरू झाला, आतां तुमचा आमचा व्यवहार बंद ! ' हें असं शेजारपाजाऱ्याशीं फटकून वागून

कसं चालेल ? गेल्या दोन दिवसांत शेजाऱ्यापकीं कोणी एकीनेंहि आपल्या घराच्या उंबऱ्याची पायरी ओलांडली नाहीं."

"बरं बरं पण प्रथम दिवा तर लावा."

भवानीबाईनें रागारागानेंच दिवा लाविला. अद्यापि तिच्या तोंडाची बडबड चालूच होती. 'तो कोणी सडकेवर दारू पिऊन पायगाडीवरून पडला. त्याला ह्या तुमच्या विमलाबाईनें घरांत आणून वरच्या माडीवर निजविलें आहे. सर्व संध्याकाळ हाच गोंधळ चालला आहे. सगळ्या गांवच्या बाडग्यांची आतां येथें हजिरी होणार आहे. ती मडम आली, तो साहेब आला. आणि जे मेले बाडगे येतात, ते थेट बुटासुद्धां वर जातात—' अशी तिची बडबड चालली असतां संतोबांनीं विमलेला विचारलें, "विमले, तो कोण मनुष्य ?—तुझ्या ओळखीचा आहे काय ?"

"नाहीं. पण त्यांचें नांव नरसिंगराव असून ते—"

"काय ?—नरसिंगराव ? आणि त्याला अपघात झाला ? असें आश्चर्यानें म्हणून संतोबा एकदम जिना चढूं लागले. आपल्या पतीची आणि त्या तरुणाची ओळख असेल अशी भवानीबाईला कल्पना देखील नव्हती. ती मुकाट्यानें पतीच्या मागून वर जाऊं लागली विमलेला मात्र आतां थोडा धीर आला. ती सर्वांच्या मागून वर गेली. संतोबा वर जातांच नरसिंगराव खोल स्वरांत म्हणाला, "आपण ह्या घराचे मालक आहांत असें मला वाटतें. आतां खालीं तुमचें झालेलें सर्व भाषण मीं ऐकलें. आपल्या मुलीनें मला माझ्या असहाय्य स्थितींत मदत केली—नव्हे मला तिनें जीवदान दिलें ह्या तिच्या उपकाराची फेड माझ्या हातून केव्हांही होणें शक्य नाहीं. तिनें मला येथें आणिलें त्यामुळें आपल्या घरांतील माणसांना त्रास झाला आहे, हें मला दिसतं. पण माझा अगदीं नाइलाज आहे. ह्या अपघातानें माझे हातपाय मोडले आहेत. मला भयंकर वेदना होत आहेत. मला आणखी कांहीं दिवस येथून हालतां येणार नाहीं म्हणून अत्यंत वाईट वाटत आहे. पण मी तुमच्या मंडळींची मेहनत फुकट घेऊं इच्छित नाहीं." असें म्हणून त्यानें पूर्वीच खिशांतून काढून ठेविलेली नोट पुढें केली.

"नरसिंगराव, तुम्ही मला ओळखलं नाहीं पण मी तुम्हांला ओळखतों." इतका वेळ काय बोलावें हें न सुचल्यामुळें गोंधळून गेलेले संतोबा अडखळत म्हणाले, "तुम्ही आमच्या मंडळींचें बोलणें कांहीं एक मनावर घेऊं

नका. तुम्ही कोण, हें त्यांना माहित नसल्यामुळें हा सर्व प्रकार घडला. आणि त्यामुळेंच मी अगदीं गोंधळून गेलों होतों. पण आतां तुम्ही कांहींएक संकोच बाळगूं नका. हें घर तुमचंच आहे असं समजा. आतां मी हा घरीं आलों तो बापुसाहेबांकडूनच—रामदेवरावाकडूनच आलों. इतका वेळ तुमच्याच विषयीं आमच्या गोष्टी चालल्या होत्या."

"मग बापुसाहेबांना मीं येथें अशा स्थितींत पडलों आहे असं कळविण्याची कांहीं तरी व्यवस्था कराना?" हें वाक्य नरसिंगरावाच्या मुखांतून बाहेर पडावयाला आणि रस्त्यांत त्यांच्या घराच्या दरवाजापुढें टांगा येऊन उभा रहावयाला एकच गांठ पडली. कोणाची गाडी आली, हें पहाण्याकरितां विमला खिडकीजवळ जाऊं लागली, तोंच 'संतोबा!' अशी रस्त्यांतून बापूसाहेबांनीं हांक मारलेली ऐकूं आली. ती हांक ऐकतांच संतोबा खालीं उतरून गेले.

"काय संतोबा, नरसिंगराव तुमच्याच घरीं आहे?--काय योगायोग आहे पहा! तुम्ही घरून गेला आणि लगेंच मला हें मिशनच्या डॉक्टराचें पत्र आलें; तसाच मी हा निघालों. बरं पण त्याला कांहीं जास्त दुखापत झाली आहे कीं काय?"

"तें कांहीं अद्याप मला कळलं नाहीं. मी हा आतां तुमच्याकडून आलों, तेव्हां मला ही भानगड कळली. मी इतक्यांत त्याची चौकशीच करीत होतों; तों तुम्हीं आलांत. बरं चला तर आतां वर—"

दोघेहि वर आले. नरसिंगरावाचा हात, पाय आणि कपाळ पट्ट्यांनीं बांधलेलें पाहून रामदेवराव पुढें होऊन एकदम म्हणाले, "अरेरे! पोरा, हें तूं काय करून घेतलंस?" बापूसाहेबांच्या ह्या प्रेमाच्या—सहानुभूतीच्या शब्दाबरोबर नरसिंगरावाच्या डोळ्यांतून एकदम खळकन् पाणी आलें. इतका वेळ हातापायाला आणि डोक्याला होत असलेल्या वेदना तो मोठ्या धीरानें सहन करीत होता. परन्तु आतां प्रेमाचा शब्द ऐकतांच त्याला दुःखाचा उमाळा आला. त्यानें हळूहळू आपल्या अपघाताची सर्व हकीगत सांगितली. त्यांत विमलेचें नांव निघतांच बापुसाहेबांनीं बाजूला वळून पाहिलें. विमला मागेंच उभी होती. तिच्या समोरच्या कोनाड्यांत ठेविलेल्या दिव्याचा प्रकाश तिच्या तोंडावर स्वच्छ पडला होता. त्यामुळें तिचा स्पष्ट चेहरा दृष्टीस पडतांच बापुसाहेब एकदम दचकले. त्यांनीं एकदम आपली दृष्टि फिरविली. परन्तु हा

प्रकार [illegible] लक्षांत आला नाहीं. विमलेला पाहतांच ते इतके कां दचकले, व त्यांत दचकण्यासारखें एवढें काय गूढ होतें तें त्यांचें त्यानांच ठाऊक ! अजून नरसिंगराव आपली पुढली हकीकत सांगत होता. परंतु आतां त्याच्या बोलण्याकडे बापुसाहेबांचें लक्ष नव्हतें. ते निराळ्याच विचारांत मग्न होते. शेवटीं त्यानें आपली सर्व हकीकत सांगून संपविली तरी बापुसाहेब कांहीं बोलेनात असें पाहून संतोबा म्हणाले, " बापुसाहेब, तुम्हीं कांहीं काळजी करूं नका. नरसिंगरावांना हें घर कांहीं परकें नाहीं. आम्ही सर्वजण त्यांची योग्य काळजी घेऊं. "

" बरं पण संतोबा, तुम्ही आतां एक काम करा—" पुष्कळ वेळानें आपल्या विचारांतून जागे झाल्यावर बापुसाहेब म्हणाले, " तुम्ही खालीं जाऊन टांगा परत घेऊन जाण्यास सांगा आणि आपली मोठी ब्रूमगाडी जोडून आणण्यास सांगा. "

" कशाला ? तुम्ही आतां टांग्यांतून नाहीं का जाणार ? "

" मी जाईन हो टांग्यांतून. पण नरसिंगरावाला कसें नेतां येईल ? "

" म्हणजे ! नरसिंगरावाला तुम्ही येथून नेणार कीं काय ? छे छे ! त्याना आणखी पंधरा वीस दिवस येथून हालूं द्यावयाचें नाहीं असं तर डॉक्टरांनीं निक्षून सांगितलें आहे. "

" कां ? "

" त्यांचा हात आणि पाय मोडला आहे ना ? "

" काय म्हणतां ? त्याचा हात पाय का मोडला आहे. "

इतका वेळ नरसिंगरावानें सांगितलेली हकीकत त्यांनीं जर ऐकलीच नाहीं तर मग हा असा वेड्यासारखा प्रश्न त्यांनीं पुनः केला यांत आश्चर्य काय ? परंतु आतां मात्र त्यांच्या मनावर योग्य तो परिणाम झाला. त्यांनीं पुनः लगबगीनें मिशनच्या डॉक्टरास बोलाविण्याकरितां टांगा पाठविला. आतां ते विमलेविषयींचे सर्व विचार विसरले. नरसिंगराव आणि त्यांचा भयंकर अपघात हेच विचार आतां त्यांच्या मनांत घोळूं लागले. डॉक्टर येईपर्यंत ' तुला आतां कसं वाटतं ?—तुला दूध देऊं का ?—तुला औषध पाहिजे का ?—तुझ्या हातापायाला फार कळा लागल्या आहेत का ?—' असे अनेक प्रश्न ते विचारीत होते. आणि त्यांना भीति वाटूं नये म्हणून आपलें दुःख लपवून नरसिंगरावानें ' होय—नाहीं ' अशीं उत्तरेंहि दिलीं.

बऱ्याच वेळानें पुन: डॉक्टरसाहेब आले. त्यांनीं आंत येतांच प्रथम नरसिंगरावांची नाडी हातांत धरून आपण बांधलेले पट्टे बरोबर आहेत किंवा नाहींत तें पाहिलें. डॉक्टराची ही तपासणी चालू असतांना बापुसाहेब म्हणाले, "डॉक्टरसाहेब याला येथून आमच्या घरीं न्यावयाला कांहीं हरकत आहे काय ? मी अगदीं सांभाळून—"

"अगदीं नांव काढूं नका. त्याला आतां जरा देखील हालतां उपयोगी नाहीं आणि आतां हा याचा ताप चढत जाईल. काळजी आहे ती आतांच आहे. हा तरुण सशक्त आहे म्हणून ठीक आहे. नाहीं तर ही केस फारच जोखमीची आहे. बरं तर बरं, नाहीं तर याचा पायच कापून काढावा लागला असता."

डॉक्टरनें इतकें सांगितल्यावर बापुसाहेबांना खऱ्या वस्तुस्थितीची कल्पना झाली. त्यांनीं नरसिंगरावाच्या कपाळाला हात लावून पाहिला, तेव्हां तें तापलेलें त्यांच्या हाताला लागलें. आतां त्याच्या अंगांत ताप चढत चालला होता. डॉक्टरनीं औषध केव्हां द्यावयाचें, प्रत्येक तासास तापाची नोंद कशी करावयाची, वगैरे सर्व माहिती विमलेला देऊन ते जावयास उठले, तेव्हां बापूसाहेबांनीं दहा रुपयांची नोट काढून ती डॉक्टरपुढें केली. परंतु ती त्यांनीं घेतली नाहीं.

"आपणास जर कांहीं द्यावयाचें असेल तर तें आमच्या मिशनला मदत म्हणून पाठवा, म्हणजे त्याचा आम्ही मोठ्या आनंदानें स्वीकार करूं."

"ठीक आहे. आपली इच्छा असेल तर मी तशी व्यवस्था करतों. पण आपण मात्र वरच्चेवर येऊन पहात जा.

रामदेवरावांच्या इच्छेप्रमाणें वरचेवर येऊन जाण्याचें आश्वासन देऊन डॉक्टर निघून गेल्यावर बराच वेळ सर्व मंडळी स्तब्ध होती. नरसिंगरावाचा ताप चढूं लागल्यामुळें तो आतां गुंगींत स्वस्थ पडला होता. तें पाहून बापूसाहेबांनीं संतोबाला खूण केली आणि ते दोघेहि बाजूच्या खोलींत गेले. विमला तेथेंच उभी होती. खोलींत गेल्यावर हातांतील नोट पुढें करून बापुसाहेब म्हणाले, "संतोबा, आतां ही तुमच्यावर दुसरी जबाबदारी आली आहे. नरसिंगराव बरा झाला पाहिजे हें लक्षांत ठेवा. मी खर्चाला मागें पुढें पहाणार नाहीं; परंतु तो तुमच्या घरांत असेपर्यंत तुम्हाला त्याची काळजी घेतली पाहिजे, हें मीं पुनः पुनः सांगितलं पाहिजे असं नाहीं. ह्या पोरावर मीं किती मोठी इमारत रचिली आहे, तें तुम्हांला ठाऊक आहेच !"

"बापुसाहेब, तें आहे सर्व माझ्या लक्षांत ! आपण अगदीं बेफिकीर रहा."

" मी आतां घरीं गेल्यावर तुमच्या हाताशीं एक मनुष्य पाठवून देतों तो तुमच्याचकडे राहील. फक्त जेवणाकरितां त्याला तुम्ही सोडीत जा. आतां मी जातों. घरीं ती पोर सारखी वाट पहात असेल. "

जातांना बापुसाहेबांनीं नरसिंगरावाजवळ येऊन डोकावून पाहिलें. आणि तसेच ते मागें फिरले. विमला जवळच उभी होती; परंतु तिच्याकडे त्यांनीं पाहिलें नाहीं. ते आंत आले तेव्हां ते आपणाबरोबर कांहीं तरी बोलतील, निदान जातांना आपण केलेल्या कृत्याबद्दल आपले आभार तरी मानतील असें तिला वाटलें होतें. परतु असे विचार तिच्या मनांत का आले तें सांगतां येणें कठीण आहे. वास्तविक तिचें मन इतकें क्षुद्र नव्हतें. बापुसाहेब निघून गेल्यावर थोडा वेळ हेच विचार तिच्या मनांत आले. नंतर दुसरा एक गूढ विचार तिच्या मनांत आला. बापुसाहेबांची आणि तिची दृष्टादृष्ट झाली त्यावेळीं तिच्या सर्वांगावर विलक्षण शहारे आले होते. क्षणभरच कां होईना पण तिचें सर्व शरीर कंपायमान झालें होतें व एक चमत्कारिक धक्का तिच्या मनाला बसला होता. आपल्या शरीरावर आणि मनावर असा विलक्षण परिणाम कशामुळें झाला ह्याविषयीं त्यावेळीं तिला कांहींच कल्पना करतां आली नाहीं; परंतु आतां त्या गोष्टीची आठवण होतांच तिचें मन विचार करूं लागलें. वास्तविक आज दिवसपर्यंत तिची आणि बापुसाहेबांची केव्हांहि बोलाचाली झाली नव्हती. एक दोन वेळां ते तिच्या मिशनमध्यें आले असतांना तिनें पाहिलें होतें इतकेंच ; परंतु त्यावेळीं सुद्धां ' रामदेवराव हे नगरांतील एक मोठे सावकार आहेत ! इतकें तिला कळल्यावर त्यांच्याविषयीं जास्त विचार करण्याची तिला कांहींच आवश्यकता नव्हती. अशा रीतीनें बापुसाहेबाविषयीं कांहीं वेळ विचार केल्यावर संध्याकाळीं भवानीबाईनें उच्चारलेल्या शब्दांची तिला एकदम आठवण झाली. ' मी तुझी आई नाहीं ' असें ती का म्हणाली असा तिनें आपल्या मनाला प्रश्न केला. पुष्कळ वेळ तिनें विचार केला; परंतु जी गोष्ट माहिती नाहीं, त्याबद्दल तिच्या मनानें तरी काय उत्तर द्यावें ? शेवटीं बाबांना—संतोबांना विचारून ह्या प्रश्नाचा उलगडा करावा असें वाटून ती उठली. नरसिंगरावाला झोंप लागली होती. त्याची श्वासोच्छ्वासाची क्रिया फार जोरानें आणि मोठ्यानें होत होती. विमला हळूच उठली आणि त्याच्या तोंडावर उजेड पडत होता म्हणून समोर कोनाड्यांत ठेवलेला दिवा उचलून तिनें थोडा बाजूला केला.

बापुसाहेब गेल्यावर संतोबा आंत गेले. भवानीबाईचा थोडासा स्वयंपाक अजून व्हावयाचा होता. संध्याकाळपासून घरांत चाललेल्या गडबडीमुळें तिचें चित्त आज ठिकाणावर नव्हतें. तिच्या स्वभावांत मुख्य गोम ही होती कीं, तिला घरांत जास्त मनुष्यें खपत नसत. इतकीं वर्षें त्या घरांत फक्त नवरा-बायकोचाच वापर होत असल्यामुळें आतां विमला घरांत आली हें तिला सहन झालें नाहीं. ती माणुसघाणी होती. ती शेजारीं पाजारीं फारशी जात नसे आणि इतर मंडळी तिच्या घरीं बसण्याकरितां आली तर त्यांच्याबरोबर ती वाजवीपेक्षां जास्त बोलत बसत नसे. तिचा स्वभाव सर्वांना माहित झाला होता. संतोबांना दारूचें व्यसन फार होतें; परंतु त्यांच्या घरांत आरडाओरड झालेली कोणीहि ऐकली नाहीं नाहीं तर दारूबाजाचें घर म्हणजे आरडाओरड आणि शिवीगाळी यांचा बाजार ! परंतु भवानीबाईला एक गोष्ट माहित होती, पति जास्त दारू घेऊन घरीं आला कीं तोंडांतून एकहि चकार शब्द न काढतां त्याचें जें कांहीं काम असेल तें अगदीं मुकाट्यानें करावयाचें. आज दोन दिवस संतोबांनीं दारू घेतली नव्हती. नाहींतर त्यांचा नित्यक्रम असा असे कीं, सर्व दिवसांत मागा-वर तयार झालेलें काम सायंकाळीं शहरांत नेऊन विकल्यावर परत येतांना आठ चार आण्याची ते दारू पीत असत. सणावाराच्या दिवशीं किंवा मित्रमंडळीच्या संगतीनें त्यांचें दारू पिण्याचें प्रमाण वाढत असे. वास्तविक आज त्यांच्याजवळ बरेच रुपये आले होते. शहरांतून परत येतांना बापूसाहेबांनीं विमलेच्या पोटगीप्रीत्यर्थ त्यांना दिलेले वीस रुपये त्यांच्या खिशांत होते. आणि वाटेंत भेटलेलीं नित्य परिचयाचीं कलालांचीं दुकानें त्यांना मोह उत्पन्न करीत होतीं. परंतु त्यांनीं तो मोह मोठ्या जिवावर तोडला. ह्याला कारण दुसरें तिसरें कांहीं नसून घरांत आलेली विमला होय. ती घरीं आल्यापासून आणि संध्याकाळीं तिला शिकविण्याकरितां मिशनची मडम येत आहे हें पाहून त्यांना आपलें हें घाणेरडें व्यसन कळूं नये, अशी त्यांना पहिल्याच दिवशीं इच्छा झाली. आणि त्याप्रमाणें आज तीन दिवस ते वागतही होते. असो.

बापूसाहेबांना दरवाजापर्यंत पोंचविल्यावर संतोबा आंत आले आणि स्वयंपाकघरांत गेले. भवानीबाई आपल्या कामांत गढली होती. तिच्या अगदीं जवळ जाऊन ते म्हणाले, "अग, आज तूं हें मांडलें आहेस तरी काय ! दोन दिवस माझ्या तोंडाची अवदसा सुटली. ती तुझ्या तोंडाला

लागली कीं काय ? त्या नरसिंगरावाला तूं मघां बोलबोल बोललीस पण तो आपल्या घरांत आला म्हणून हें पहा—" असें म्हणून त्यांनीं एक नोट काढून तिच्यापुढें धरिली. "आतां तो आपल्या घरीं आहे तोंपर्यंत ह्या नोटांचा आपणावर पाऊस पडेल पाऊस ! काय समजलीस ? आणि दुसरं हें पहा, त्या विमलेलाही नीट सांभाळून घे. आतांपर्यंत तिच्या पोटगीबद्दल दहा मिळत होते पण आजपासून हे पहा—" दोन नोटा पुढें करून—"डबल रक्कम झाली. आतां ह्या नरसिंगरावाबद्दल ह्या आठ पंधरा दिवसांत इतके रुपये मिळतांच प्रथम तुला सोन्याचा शृंगार–साज घेऊन येईन. मग तर तुझी इतक्या वर्षांची कटकट मिटेल ना ?"

"पण हे विमलेच्या पोटगीचे रुपये कोणी दिले ? तिला पोटगी मिळत असे कीं काय ? मी समजत होतें—"

"मिळत होते तर ! बापुसाहेब प्रत्येक महिन्याला दहा बारा रुपये देत असत. पण मीच तुला तें कळूं दिलें नाहीं."

बापुसाहेब देत होते ! कां बरं ! त्यांचा काय संबंध ?"

"अग, ती त्यांच्या मित्राची मुलगी ना ?—विसरलीस वाटतं ?"

विसरणार कोठून ! मला जर तुम्ही सांगितलंच नाहीं तर मी विसरणार तरी कोठून ? ती लहान असतांना, तिला मिशनमध्यें ठेवण्यापूर्वी ती आपल्या घरीं होती तेव्हां 'ती माझ्या मित्राची मुलगी आहे–पोरकी आहे–' असंच तुम्हीं मला सांगितलं होतं."

'तसं सांगितलं असेल तर तें सगळं खोटं आहे, पण आतां खरं सांगतों. ती बापुसाहेबांच्या एका मित्राची मुलगी आहे. आणि पोरकी आहे. तिचे आईबाप आतां आपणच. तूं मात्र आतां तिला ममतेनें वागीव. मला तर ती पोर फार आवडते. पहा, दोन दिवसांत तिनें घर कसें लख्ख केलें आणि ती आल्यापासून मला दारूचाही एकदम वीट आला. खरंच—दारूचें व्यसन वाईट ! त्यापायीं एक पैसाही खिशांत रहात नसे. पण आतां पहा तुला कशी सोन्यानें मढवितों ती !"

भवानीबाई उत्तर देणार इतक्यांत विमला आंत आली. तिच्याकडे पाहून संतोबांनीं विचारलें, "का विमले, खालीं कां आलीस ? नरसिंगराव उठला काय ?"

"नाहीं. त्यांना झोंप लागली आहे."

" मग जेवायला आलीस काय ? घे-घे जेऊन घे. तोंपर्यंत मी जाऊन बसतों वर. " असें म्हणून संतोबा बाहेर आले. विमलाही त्यांच्या मागून बाहेर आली. आणि संतोबा जिना चढूं लागतांच ती म्हणाली, " मला तुम्हाला कांहीं विचारावयाचें आहे. "

" काय विमले, काय आहे ? " मागें वळून संतोबांनीं विचारलें.

" बरंच विचारायचं आहे. "

" ये—वर ये. " दोघेंहि वर गेलीं. नरसिंगराव निजला होता त्या खोलींत डोकावून संतोबा पलीकडच्या खोलींत गेले आणि मागाच्या घडवंचीवर बसले. विमल त्यांच्या मागेंच होती. तिची चर्या गंभीर दिसत होती. तिनें संतोबाकडे सूक्ष्म दृष्टि लावून विचारलें, " बाबा, मी तुम्हाला बाबाच म्हणूं काय ? तुम्ही माझे बाबाच काय ?

" म्हणजे ? " तिनें हा अकल्पित रीतीनें विचारलेला प्रश्न ऐकून संतोबाना आश्चर्य वाटलें व ते अगदीं गोंधळून गेले. " मी नाहीं तुझा प्रश्न समजलों. "

आई– होय आईच ती ! तुम्ही माझे खरे आईबाप नसलां तरी इतकीं वर्षें तुम्ही माझें संगोपन केलें—मला शिक्षण दिलें, तेव्हां तुम्ही मला आई-बापाच्याच ठिकाणीं आहांत. "

" अशी जर तुझ्या मनाची आमच्याविषयीं पूज्य भावना आहे, तर मग मला प्रश्न तरी कशाला विचारतेस ? "

" त्याचें कारण मला खरी गोष्ट कळावी म्हणून ! मी आतां कांहीं लहान नाहीं. मघां आई रागावली असतां म्हणाली कीं, ' मी तुझी आई नाहीं. आणि तूं मला आई म्हणून हांक मारीत जाऊं नकोस ! ' "

" ती मूर्ख आहे, तिला काय कळतं ! "

" मग आई म्हणाली तीच गोष्ट खरी ! तुम्ही कांहीं माझे जन्मदाते मातापिता नव्हत ! मग बाबा, माझे जन्मदाते कोण तें मला सांगा ? "

जी गोष्ट तिला कळूं नये म्हणून थोड्या वेळापूर्वीं आपूसाहेबांनीं त्यांना आग्रहानें सांगितलें होतें व त्याबद्दल विशेष खबरदारी घ्या म्हणून बजाविलें होतें, ती गोष्ट इतक्या लवकर आपल्या बायकोच्या मूर्खपणामुळें तिला कळली हें पाहून संतोबा गोंधळले यांत विशेष नवल नाहीं. आतां तिला काय सांगावें, हें त्यांना सुचेना. त्यांनीं बरीच उडवाउडवी केली, परंतु विमला ऐकेना !

ती म्हणाली, "माझे आईबाप कोण हें मला कळूं नये काय ? मला माझ्या नांवावरूनच एकदां संशय आला होता. कारण तुमचें आडनांव निराळें व माझें निराळें कां म्हणून मी एकदां आमच्या बाईंना विचारलें. परंतु तिनें माझी तात्पुरती समजूत केली. मी नगरच्या मिशनमधली पहिलीच मुलगी म्हणून मला 'विमला नगरकर' असें म्हणूं लागले. आणि तेंच नांव माझें कायम झालें. परंतु आतां मला ह्या नांवांतली गोम कळली. सांगा ना—माझ्या बाबांचें नांव काय ? माझ्या आईचें नांव काय ? ते राहणार कुठले ? सांगा—बाबा, मी तुमच्या पाया पडतें. सांगा !"

हा प्रश्न ऐकून संतोबाची अगदीं वेड्यासारखी स्थिति झाली. विमलेनें केविलवाण्या स्वरांत विचारलेला प्रश्न ऐकून त्यांचें मन विरघळलें. परंतु तिचे आईबाप कोण हें जर त्यांना खरोखरच माहीत नव्हतें, तर ते उत्तर तरी काय देणार ? ती पुनः पुनः आग्रहानें सांगा सांगा म्हणून म्हणतच होती. शेवटीं ते म्हणाले, "विमले, तुझे आईबाप कोण हें मला खरोखरीच माहीत नाहीं. तुला माहितच आहे कीं, आपल्या ह्या नगरास वरचेवर दुष्काळ पडतो ! त्याप्रमाणें सोळासतरा वर्षांपूर्वीं येथें फार मोठा दुष्काळ पडला होता. लोकांची अगदीं अन्नान्नदशा झाली होती. तेव्हां घांसभर अन्नाकरितां लोकांनीं आपलीं लहान अर्भकं देखील विकलीं. आणि त्याच दुष्काळापासून ह्या मिशनरी लोकांचा येथें कायमचा पाय शिरला. त्यांनीं त्यावेळीं कित्येक अर्भकें विकत घेतलीं. कांहीं अन्नान्न करीत भटकत फिरणाऱ्या मुलांना आणि माणसांना त्यांनीं आश्रय दिला. त्या माणसांतील तूं आणि तुझे आईबाप होते. त्यावेळीं तूं अगदीं लहान एक दीड वर्षाची होतीस. तुला एक मिशनचा मनुष्य घेऊन जात होता, तें पाहून मीं त्याच्याकडून तुला मागून घेतलें. आणि तेव्हांपासून मीं तुझें यथाशक्ति लालनपालन केलें. आतां ह्यापेक्षां मला तुझ्याविषयीं जास्त माहिती नाहीं." इतकें बोलून संतोबा गप्प राहिले. आपणास ऐनवेळीं ही दुष्काळाची आठवण होऊन गोष्ट जुळवून सांगतां आली म्हणून त्यांना आनंद झाला.

"बाबा, मजसारख्या अनाथ पोरीवर आपण किती तरी उपकार केलेत ! माझी जातपात कांहीं एक माहित नसतां केवळ परोपकार बुद्धीनें तुम्ही मला जवळ करून आजच्या स्थितीला आणलें ह्या आपल्या उपकाराची फेड मजकडून तरी कधीं होईल काय ? मी ह्या आपल्या पायांत—" असें म्हणून विमला

एकदम गुढघ्यावर बसली आणि संतोबांचे पाय धरून पुढें म्हणाली, “ ह्या आपल्या पायांत मी माझ्या चामड्याचे जोडे करून—”

“ बस् ! बस् ! विमले, वेडे पोरी ! ऊठ—”

इतक्यांत आजाऱ्याच्या खोलींत असलेल्या घड्याळांत नवाचे ठोके पडूं लागले. ते ऐकतांच विमला उठली. प्रत्येक तासाला रोग्याचा ताप किती आहे तो पाहून टांचून ठेवण्यास डॉक्टरनें तिला सांगितलें होतें. त्या कामाला ह्या नवापासून सुरवात होणार होती. डॉक्टरनें तिला सांगितलेली ही कामगिरी संतोबांना माहीत होती. तेव्हां त्यांनीं देखील नवाचे ठोके ऐकून विमलेला तिच्या कामगिरीची आठवण केली. तीं दोघेंही आत गेलीं. विमलेनें कोनाड्यांत डॉक्टरानें मुद्दाम ठेवलेली ताप पहाण्याची नळी घडवंचीवरून घेतली आणि ती नरसिंगरावाच्या काखेंत ठेवण्याकरितां अगदीं हळूंच त्याच्या हाताला स्पर्श केला. त्याबरोबर तिच्या हाताला चटका बसला. इतकें नरसिंगरावाचें सर्वांग तापानें तप्त झालें होतें.



## ४ मनोहर मिसाळ

**तीन** दिवस अत्यंत बिकट गेले. नरसिंगरावाविषयीं सर्वांनी आशा सोडली. त्यांना ताप एकसारखा वाढतच होता. दुसऱ्या दिवशीं डॉक्टरानें त्याची नाडी पाहतांच आपली निराशा स्पष्ट व्यक्त केली. त्याचा ताप उतरावा म्हणून डॉक्टराचे सारखे प्रयत्न चालू होते. परंतु तीन दिवस तो निचेष्टित पडला होता. ह्या तापांतच जर त्याला रक्तदोष ( Blood Poison ) झाला तर आपला कांहीं एक उपाय चालणार नाहीं, असें डॉक्टरानें पहिल्याच दिवशीं निराशा व्यक्त करतांना बापुसाहेबांना सांगितलें. त्या तीन दिवसांत अहोरात्र जर कोणाची मेहनत झाली असेल, तर ती विमलेचीच होय. तिची ती मेहनत पाहून डॉक्टरानासुद्धां विस्मय वाटला मग इतरांना वाटला असेल यांत नवल कोणतें ? त्याला आराम पडावा, तो बरा व्हावा म्हणून ती एकसारखी देवाची प्रार्थना करीत होती. बापुसाहेब, संतोबा आणि भवानीबाई यांनीं पाळीपाळीनें रात्र जागून काढली. दोन रात्रीं त्यांनीं आजाऱ्याच्या खोलींत बसून अशा रीतीनें पहारा केला. परंतु तिसऱ्या दिवशीं तीं तिघेंहि थकलीं. तथापि तीं जागत असतांना देखील नरसिंगरावांना वेळेवर औषध

देणें, त्याचा ताप पहाणें, चमच्यानें त्याला दूध पाजणें इत्यादि कामें विमलाच करीत होती. तिसऱ्या दिवशीं मात्र तिला एकटीलाच त्याच्या उशाजवळ बसून रहावें लागलें. त्यावेळीं तिच्या मनांत काय विचार आले असतील बरें ? आपल्या हातावर गाल टेंकून ती निश्चल दृष्टीनें त्याच्या मुखाकडे पहात तो लवकर बरा व्हावा म्हणून प्रभूची प्रार्थना करीत 'देवा ! माझ्याकरितां ह्यांना बरें कर !' असें म्हणत होती. परन्तु आपण काय बोलतों, याचें तिला भान होतें काय ?

चौथा दिवस उजाडला. आज नरसिंगरावाचा ताप किंचित् कमी होता. परन्तु अद्यापि तो शुद्धीवर आला नव्हता. तीन दिवस घरांतून बाहेर पडावयास न मिळाल्यामुळें संतोबा आज शहरांत बाजार करण्याकरितां गेले होते. बापुसाहेब तितक्या अवधींत दोन वेळां येऊन नरसिंगरावाची प्रकृति पाहून गेले होते. डॉक्टराची दुसरी खेप अद्यापि व्हावयाची होती. विमलेला आपणा स्वतःविषयीं विचार करण्यास ह्या तीन दिवसांत बिलकुल अवसर मिळाला नाहीं. ती आपलीं स्वतःचीं कामें कशीतरी आटोपून पुनः वर येऊन बसत असे. होतां होतां संध्याकाळ झाली. मिशनरीबाईची प्रार्थना करण्याकरितां येण्याची वेळ झाली, तें पाहून विमलेनें तिच्याकरितां एक खुर्ची आणून ठेविली. ठराविक वेळेवर मडमसाहेब आली. तिनें प्रथम नरसिंगरावाची चौकशी केली. नंतर ती म्हणाली, "प्रभु, दयाळु आहे. दीनांचा वाली आहे. आपण ह्या दुखणाई करितां त्याची प्रार्थना करूं म्हणजे तो दयावंत प्रभु आपली सर्व चिंता दूर करील." असें म्हणून तिनें आपलें 'उपासनेचें पुस्तक' उघडलें. तेव्हां विमला तिच्याजवळ येऊन उभी राहिली. नंतर त्या दोघी हळु हळू प्रार्थना करूं लागल्या.

* परमसमर्था, प्रार्थितो तुजला, रोगी मनुष्याला राख सुखी ॥ १ ॥
त्याचीं विघ्नें, दुःखें, संकटें हा सारीं, आणि जडभारी वारीं देवा ! ॥ २ ॥
आजारांत त्यास शांति, समाधान, आत्मिक तें अन्न देई, बापा ॥ ३ ॥
आजारात जरी केली कुरकूर, तरी क्षमा कर, ख्रिस्तासाठीं ॥ ४ ॥
शय्येवरी त्यास सुखें गोड निद्रा, येऊं दे ईश्वरा ! रात्रभर ॥ ५ ॥
त्यजला होवोत आत्मिकानुभव, बसो दृढभाव तुझ्यावरी ॥ ६ ॥
केलेली विनंती ऐक, दयावंता ! वारीं सर्व चिंता, देवबाप्पा ॥ ७ ॥

---

* 'उपासना संगीत' पुस्तकांतून घेतली.

ही प्रार्थना त्या अनंत स्वरूपीं, सर्वसाक्षी करुणासागरानें ऐकली असेल काय ? तो दयावंत आहे, तो विश्वपाल आहे अत्यंत कळकळीनें प्रेमानें आणि सदिच्छेनें त्याला हांक मारा म्हणजे तो तुमच्याजवळ आहे. त्याला राम म्हणून हांक मारा, रहीम म्हणून त्याच्यापुढें गुडघे टेका किंवा खिस्त म्हणून त्याला संबोधा. तो अनंत स्वरूपीं आहे. संस्कृत भाषेंत त्याचें स्तोत्र गा, मराठींत त्याला आळवा किंवा वेड्या वाकड्या शब्दांत त्याच्या मंगल नांवाचें गीत गा, तो जगाचा पिता तुमच्या हाकेला ओ देईल. आणि खरोखरीच तसा प्रकार घडला काय ? नरसिंगरावानें आपले खोल व निस्तेज डोळे हळूच उघडले. तो शुद्धीवर आला परंतु त्याच्या अंगांत बिलकूल शक्ति उरली नव्हती. त्यानें पुनः डोळे बंद केले. थोड्या वेळानें त्याला सुस्वर शब्द ऐकूं येऊं लागले.

* हे प्रभो ! शान्तवन कर ये, या दुःखित दीनजनांचें ॥ धृ० ॥
रोगांनीं दुःखित होतां, तळमळती आपुल्या स्थानीं ।
ते करिती पाणी पाणी, परि द्याया नाहीं कोणी ।
प्रभुराया ! ये धांवोनी ओरडती प्रेमळ वाचें ।
या क्लेशांतुनि कर सुटका, पाहुनी दीनांचें ॥ १ ॥

प्रार्थना आटोपल्यावर थोडा वेळ त्या दोघी डोळे मिटून ईश्वराचें स्तवन करीत होत्या. त्यांचे मंजुळ शब्द बंद होतांच नरसिंगरावानें पुनः डोळे उघडले, तेव्हां जवळच्या खुर्चीवर डोळे मिटून बसलेली विमला त्याच्या दृष्टीस पडली. प्रसन्न चित्तानें ध्यानस्थ बसलेली ती एकादी देवताच आहे कीं काय असा त्याला क्षणभर भास झाला. थोड्या वेळापूर्वी त्यानें ऐकलेली प्रार्थना आणि आतां त्याच्या पुढें बसलेली ती ध्यानस्थ बालिका, ह्या देखाव्यानें त्याच्या मनावर फारच अनुकूल परिणाम झाला. त्याचें दुःख—वेदना थांबल्या. त्याचें मन शांत झालें आणि आपण खरोखरीच बरे झालों असें त्याला वाटलें. आपण किती वेळ निजलों होतों, याची त्याला कल्पना होईना. तथापि अद्यापि दिवे लागले नाहींत, तेव्हां आपणास झोंपून फार वेळ झाला नाहीं असें त्याला वाटलें. आपणास नुकताच सायकलचा अपघात झाला, त्यामुळें आपल्या हातापायाला आणि डोक्याला लागलें असून दुसऱ्याच्या घरांत आपण सध्यां आहोंत एवढ्याच गोष्टी त्याला आठवल्या. त्यानें हळूंच

---

* ‘ उपासना संगीत ’ पुस्तकांतून घेतली.

आपला हात उचलण्याचा प्रयत्न केला परंतु वेदना होतांच ' आई—ई—!' असे दुःखोद्गार काढले. तो शुद्धीवर आला हें कळतांच त्या दोघींना विशेषतः विमलेला आनंद झाला. मिशनरीबाईनें ' आतां कसें वाटतें ?' असें त्याला विचारलें. विमला बाजूला उभी राहून नरसिंगरावाच्या निस्तेज चेहऱ्याकडे पहात होती. इतक्यांत जिन्यांत पावलें वाजूं लागलीं. आणि थोड्या वेळानें डॉक्टरसाहेब आणि त्यांच्याबरोबर, बूट, पाटलोण घातलेला तीसबत्तिस वर्षांचा एक मनुष्य वर आला. आपला रोगी शुद्धीवर आलेला पाहून डॉक्टरानीं हास्यमुद्रा करून आशेचे उद्गार काढले. विमलेनें सकाळपासून करून ठेवलेली तापाची नोंद डॉक्टरास दाखविली. ती पाहून डॉक्टरानीं तिला दुसऱ्या कांहीं सूचना करावयाच्या त्या केल्या. आणि नव्या औषधाची योजना करून 'कांहीं झालें तरी हात आणि पाय उचलावयाचे नाहींत' अशी पुनः ताकीद देऊन डॉक्टर आणि मिशनरीबाई निघून गेले. परंतु त्यांच्याबरोबर अलेला मनुष्य त्यांना गाडींत बसवून पुनः वर आला. डॉक्टराबरोबर तो वर आला तेव्हां विमलेनें फक्त मानेनें त्यांचें स्वागत केलें. पुढें ती डॉक्टरबरोबर बोलत असतांना तो तिच्याकडे आणि मधून मधू खाटेवर पडलेल्या नरसिंगरावाकडे पहात होता.

पोषाखावरून तो मनुष्य बाटलेला असावा, असें दिसत होतें. त्याचा वर्ण काळासांवळा असून तो ठेंगणा होता. त्याचे डोळे पाणीदार होते, तरी लक्ष-पूर्वक पाहिलें असतां त्या पाणीदारपणांत खुनशीपणाची झांक स्पष्ट दिसत असे. त्याची जात कोणती, त्याचे आईबाप कोण, तो मूळ राहणार कोठला इत्यादि गोष्टींचा अद्यापि कांहींच पत्ता लागला नव्हता. परंतु त्याच्या वर्णा-वरूनच जर त्याची जात ठरविण्याचा प्रसंग आला तर त्याचा जन्म शूद्र कुळांत झाला असला पाहिजे असेंच कोणीहि ठरवील, असें आम्हाला वाटतें. मिशनरी लोकांनीं नगर जिल्ह्यांत जो पहिला कंपू बाटविला आणि वर्षासनें नेमून दिलीं त्यांत ह्या मनुष्यालाही वार्षिक शंभर रुपयांच्या उत्पन्नाची शेती मिळाली होती. अशा रीतीनें बाटल्याबद्दल ठराविक उत्पन्नांच्या शेतीजमिनी मिळालेलीं कांहीं कुटुंबें आज नगरांत प्रत्यक्ष पहावयास मिळतात. पुढें बाटणारांची संख्या जास्त वाढतांच मिशनरी लोकांनीं नवीन वर्षासनें देण्याचें बंद केलें. असो.

तो मनुष्य स्वतःला एम्. मिसाळ अशा इंग्रजी पद्धतीनें संबोधीत असे.

त्याच्या बाबतींत दोन जातींची मिसळ असल्यानें त्यानें असें नांव घेतलें होतें किंवा काय ? हें मात्र सांगतां येणें कठीण आहे. तथापि त्यानें स्वतःच्या नांवाची निवड—मनोहरराव मिसाळ अशी मनोहर केली होती यांत शंका नाहीं. त्याचें शिक्षण मिशनमध्येंच झालें होतें. हल्लीं त्याला एका दारूच्या लायसनदार पारशी कॉन्ट्राक्टराकडे नोकरी होती. तो अलीकडे स्वतंत्र राहत होता तरी मिशनमध्यें त्याचें वरचेवर जाणें येणें होतें. त्याला आतां साधारण चांगला पगार मिळूं लागलेला पाहून त्यानें लग्न करावें म्हणून मिशनचे लोक त्याच्या मागें होते आणि तोहि मिशनमधली एखादी मनपसंत मुलगी शोधीत होता. ह्यापूर्वी त्याचें जाणें येणें विशेषेकरून एका रेव्हरंड साहेबाकडे असे. यांना दोन मुली होत्या. परंतु ह्या दोन्ही मुली मनोहर मिसाळाला त्याच्या योग्यतेप्रमाणेंच वागवीत असत. वास्तविक तोही रेव्हरंड साहेबा-प्रमाणें बाटलेला होता. परंतु बाटण्यापूर्वी तो शूद्र असून आपण उच्च वर्णाचे होतों, हा भेदभाव अद्यापि रेव्हरंड साहेबांच्या मनांत जागृत होता. ‘ आपण सर्व एकाच परमेश्वराचीं लेकरें आहोंत ’ असें ते रेव्हरंडसाहेब उपदेश करतांना सांगत असत. परंतु त्यांच्या वर्तनांत असा विरोध होता. मनोहर मिसाळ काळा असून त्याचें नाक फेंदरें होतें. तो ठेंगणा होता. आणि रेव्हरंड साहेबांच्या मुली म्हणजे गोऱ्या होत्या, अशांतला कांहीं भाग नाहीं. त्यांपैकीं एखाद्या मुलीबरोबर रेव्हरंड साहेबांनीं जर त्याचें लग्न करून दिलें असतें तर तो जोडा तंतोतंत प्रमाणांत योग्य शोभला असता. परंतु !

रेव्हरंडसाहेबाकडे कांहीं जुळत नाहीं असें पाहून अलीकडे त्यानें मिशन-मध्येंच मुलीचा शोध चालविला होता. तेव्हां विमल त्याच्या दृष्टीस पडली आणि ती त्यानें आपली भावी वधू म्हणून पसंत केली. ही त्याची वधुपसंती मिशनमधल्या बाईना मात्र रुचली नाहीं. कारण विमला जरी मिशनमध्येंच लहानाची मोठी झाली होती, तरी अद्यापि तिनें त्यांच्या धर्माचा स्वीकार केलेला नव्हता. इतकेंच नव्हे तर तिनें आपलें वर्तन इतकें निर्मल आणि स्वच्छ ठेविलें होतें कीं, ‘ तूं आतां बाप्तिस्मा घे ’ असें सांगण्याचें त्यांना धैर्यही होत नव्हतें. मिशनमध्यें असतांना विमला प्रभु येशु ख्रिस्ताची सकाळ संध्याकाळ आणि रात्रीं त्यांच्याबरोबर नित्य नियमानें प्रार्थना करी. प्रभूचीं पदें मोठ्या करुण वाणीनें म्हणे आणि रविवारीं किंवा त्यांच्या सणावाराच्या दिवशीं सर्वांबरोबर ती मिशनच्या देवळांतहि जाई. इतक्या सर्व प्रकारें जरी

ती ख्रिस्ती धर्मानुसार वागत होती तथापि अद्यापि तिनें बाप्तिस्मा घेतला नव्हता. शेवटीं संतोबांनीं तिला घरीं आणलें, त्या वेळीं मात्र मिशनमधल्या मंडळींना 'त्यापूर्वींच तिला आपण बाप्तिस्मा देण्याचा प्रयत्न केला नाहीं' म्हणून पश्चात्ताप झाला. तरी ती मंडळी अगदींच निराशा झाली नाहीं. 'प्रभु येशूख्रिस्त हाच तारक आहे' अशी तिच्या मनाची खात्री झालीच आहे. तेव्हां आतां थोडासा प्रयत्न करतांच ती बाप्तिस्मा घेईल असें वाटूनच जरी ती घरीं आली होती तरी मिशनमधल्या बाई रोज संध्याकाळीं तिच्याकडे येत असत. विमलेसारखें रत्न आपल्या कळपांत आल्यास आपल्या मिशनला भूषण प्राप्त होईल अशी त्यांची खात्री होती. असें तिच्याविषयीं उच्च मत असल्यामुळें मनोहर मिसाळानें तिच्याविषयीं जेव्हां आपलें मत मिशनच्या बाईजवळ खासगी रीतीनें प्रकट केलें तेव्हां तिला तें रुचलें नाहीं. तो चांगला कर्तासवरता असून एकटाच आहे, तरी त्याच्या स्वरूपाविषयीं विचार करतां, विमला एखाद्या चांगल्या स्वरूपवान रेव्हरंडची पत्नी व्हावी अशीच तिची इच्छा होती. तथापि तिला मनोहर मिसाळाला तोडून बोलतां येईना. परंतु 'विमलेनें अद्यापि बाप्तिस्मा घेतलेला नाहीं. तथापि तिनें लवकरच बाप्तिस्मा घ्यावा असा आमचा प्रयत्न चालू आहे. तूंहि प्रयत्न करून पहा. आणि तिनें स्वसंतोषानें तुझें म्हणणें कबूल करून तुझ्याबरोबर लग्न केलं तर त्यांत आम्हांला आनंद आहे.' असें तिनें सांगितलें. तेव्हांपासून त्यानें आपल्या प्रयत्नास सुरवात केली होती. आज जवळ जवळ सहा महिने त्याची आणि विमलेची ओळख होऊन झाले होते. तो एकदोन दिवसाआड तिला भेटण्याकरितां मिशनमध्यें जात असे. कधीं हातरुमाल, तर कधीं डोक्यांत घालायचे आंकडे, गळ्यांतील सोनेरी मुलामा दिलेले मणी, किंवा अलीकडच्या फॅशनचे शिवलेले कपडे, इत्यादि वस्तु तो तिला मधून मधून नजर करीत असे. परंतु त्या वस्तु ती सहसा घेत नसे. अशा रीतीनें आपल्या नजराण्यांचा तिच्या मनावर कांहींच अनुकूल परिणाम होत नाहीं असें पाहून अलीकडे त्याची निराशा झाली होती. तो आतां पूर्वीप्रमाणें वरचेवर येऊन तिला भेटतहि नसे. परंतु विमला चार दिवसांपूर्वीं मिशन सोडून आपल्या पालकाच्या घरीं भिंगार गांवांत रहावयास गेली असें त्याला कळतांच तो आज मुद्दाम तिला भेटण्याकरितां आला होता. वाटेंत त्याला मिशनचे डॉक्टर भेटले. तेव्हां त्यांच्याबरोबर तो संतोबाच्या घरीं आला.

डॉक्टरची तपासणी चालू असतां मनोहर मिसाळ खाटेवर पडलेल्या नरसिंगरावाकडे आणि डॉक्टरबरोबर बोलत असलेल्या विमलेकडे पहात होता. आपल्यापेक्षां तो तरुण सुंदर आहे आणि विमला रात्रंदिवस त्याची शुश्रुषा करीत आहे, तेव्हां सतत सहवासामुळें त्या दोघांत प्रेमोद्भव होईल असा विचार त्याच्या मनांत येऊन त्याचें मन अस्वस्थ झालें. आजपर्यंत त्यानें आपला हा मनोदय तिला स्पष्ट कळविला नव्हता. फक्त कृतीनें तो आपली इच्छा तिच्या लक्षांत आणण्याचा प्रयत्न करीत होता. परंतु आज हा असा प्रकार पाहून तिला स्पष्ट शब्दानें आपला मनोदय सांगण्याचा त्यानें निश्चय केला. आणि असा त्याच्या मनाचा निश्चय झाला म्हणूनच तो, डॉक्टर आणि मिशनरीबाई निघून गेल्यावर परत वर आला.

त्यावेळीं विमला अगदीं वांकून नरसिंगरावाचा खोल शब्द लक्ष देऊन ऐकण्याचा प्रयत्न करीत होती. परंतु जिन्यांतून आंत येतांना मनोहर मिसाळानें त्या देखाव्याचें भलत्याच गोष्टींत रूपांतर केलें. त्या दोघांचें प्रेममीलन झालें आहे, असें त्याला त्या देखाव्यावरून वाटलें आणि त्याच्या कपाळावर आठ्या पसरल्या. मागें चाहूल लागतांच विमलेनें मागें पाहिलें. परंतु तिच्या निर्मल मनाला त्याच्या चेहऱ्याकडे पाहून कांहींच बोध झाला नाहीं. तिनें डॉक्टरानें सांगितल्याप्रमाणें नरसिंगरावाला औषध दिल्यावर त्याच्याकडे पाहिलें. तेव्हां तो म्हणाला, "विमलाबाई, मला तुमच्याबरोबर कांहीं बोलायचं आहे, मी परवां मिशनमध्यें गेलों होतों, तेव्हां तुम्ही मिशन सोडलें असें मला कळलें. मी कालच येणार होतों. पण मला येथला पत्ता बरोबर माहित नव्हता."

"मी घरीं येऊन आज आठ दिवस झाले." बाहेरच्या खोलींत येत असतां विमला म्हणाली. "त्यानंतर मी मिशनमध्यें गेलेंच नाहीं. बाई मात्र रोज सायंकाळीं प्रार्थना करण्याकरितां मुद्दाम येतात. त्यांचे माझ्यावर फार मोठे उपकार आहेत. गेल्या चार दिवसांपासून घरांत ही केस आल्यामुळें मला अगदींच इकडे तिकडे पहायला मिळत नाहीं."

"पण तो मनुष्य कोण आहे ? त्याची तुमची ओळख आहे काय ?

"नाहीं—ते सायकलवरून पडले, तेव्हां त्यांना येथें आणलं. बागड पट्टींत ते रामदेवराव आहेत त्यांचे हे कोणी नातेवाईक आहेत असं वाटतं."

"एकूण तुमची पूर्वीची ओळख नाहीं तर! ब—रं!" असं म्हणून

मिसाळ क्षणभर थांबला आणि विमलेकडे पाहूं लागला. त्याच्या मनांतील शब्द त्याच्या ओंठापर्यंत आले होते. परंतु त्याचा उच्चार मात्र होईना. शेवटीं मनाचा हिय्या करून तो अडखळत म्हणाला, " विमलाबाई, मी आज मुद्दाम येथें आलों आहे. आपली ओळख होऊन आतां बरेच महिने झाले आहेत. मला आतां महिना पन्नास साठ रुपये मिळतात. शिवाय माझ्या मालकीची थोडी शेतजमीनहि आहे. आतां मी लग्न करण्याचा विचार केला आहे आणि म्हणूनच मी आतां आलों आहे. विमलाबाई, मीं पुष्कळ मुली पाहिल्या परंतु आपल्या मिशनमध्यें मला एकच मुलगी पसंत पडली. "

" असं कां ? " विमलेनें हंसत विनोदी स्वरानें विचारलें, " कोण ती एवढी भाग्यवान् मुलगी ? आमच्या भावी मिसेस मनोहर मिसाळ कोण ? त्यांचं नांव तरी कळूं द्या ? "

" त्यांचं नांव मिस् विमला ! "

" विमला ?—कोणती ? "

" माझ्यापुढें उभी आहे ती. "

" मी ! "

" यस् माय डियर विमला ! आज सहा महिने आपण परस्परांबरोबर स्नेह-भावानें घालविले ते आपलें ' कोर्टिंग ' च समज. मी तुझी रम्यमूर्ति—"

" थांबा. मिस्टर मिसाळ, तुम्ही हा एकदम विचारलेला प्रश्न ऐकून मी अगदीं गोंधळून गेलें आहे. मीं स्वतःच्या लग्नाविषयीं आजपर्यंत केव्हांहि विचार केला नाहीं. तुम्ही आज माझा बहुमान केला त्याबद्दल मी आपली आभारी आहे. बट्, आय् ॲम् सॉरी ! आय् डोन्ट उइश् टू म्यारी ! "

" छे ! असं म्हणून कसं चालेल ? तुला लग्न हें केलंच पाहिजे. पहा, माझं तुझ्यावर अत्यंत प्रेम आहे. अंतःकरणापासून मी तुझ्यावर प्रेम करीत आहे. तुला मी सर्व प्रकारें सुख देईन. तुझ्या सुखाकरितां मी वाटेल तें साहस करीन. तुझें सुख हेंच मी माझें ध्येय समजेन. विमला, आपण दोघं मोठ्या आनंदांत राहूं. तुला मी लग्नाकरितां एक पैचाहि खर्च पडूं देणार नाहीं. तुझा लग्नाचा पोषाख, तूं सांगशील तसा आणि सांगशील त्या किंमतीचा मी मुद्दाम मुंबई—पुण्याहून आणवीन. आपलें लग्न होणार हें कळतांच मिशनमध्यें सर्वांना अत्यानंद होईल. माझी खात्री आहे कीं, आपल्या मिशनमध्यें प्रत्येक बाईकडून तुला उंची उंची लग्नभेटी येतील. "

" पण मिस्टर मिसाळ, माझी लग्न करण्याची इच्छाच नाहीं." विमला मान फिरवून म्हणाली, " शिवाय तुमची जात आणि माझी—" इतकेंच बोलून विमला अडली. स्वतःच्या जातीचा प्रश्न तिच्यापुढें उभा राहिला.

" मला आपल्या जातीची आडकाठीच नाहीं. मी लहानाचा मोठा मिशनमध्येंच झालों. आणि तूंहि मिशनमध्येंच लहानाची मोठी झालीस. आपल्या लग्नाच्या वेळीं प्रभु येशुखिस्ताच्या तीर्थाचें पवित्र पाणी—" इतक्यांत जिन्यांत पाय वाजतांच मिसाळानें आपलें भाषण आटोपतें घेतलें.



## ५ दोघांचे प्रयत्न

" विमलेला हें कळलं हें फार वाईट झालं ! "

" बापुसाहेब, वाईट झालं हें तर खरंच ! पण हा दोष माझा नाहीं. आमच्या बायकोचा स्वभाव पडला हा असा चमत्कारिक ! ती कधीं तोंड उघडायची नाहीं आणि कपिलाषष्ठीच्या योगावर केव्हां एखादे वेळीं तोंड उघडते तेव्हां हा असा घोंटाळा करते. मी आज चार दिवस ही गोष्ट आपणास सांगण्याचा प्रयत्न करीत होतों. पण मला धीर होईना. परंतु काल तो एक कोणी मनोहर मिसाळ नांवाचा मनुष्य आला होता. त्यानें तिच्याजवळ लग्नाची गोष्ट काढिली. तेव्हां मला ह्या सर्व गोष्टी आपल्या कानावर घालणें भाग पडलें. "

" पण सतोबा, त्यानें तिच्याजवळ लग्नाची गोष्ट काढिली ही तुम्हाला कशी कळली ? विमला बोलली कीं काय ? "

" नाहीं. काल रात्रीं मी घरीं जाण्यापूर्वी त्यांच्या गोष्टी चालल्या होत्या. इतक्यांत मी गेलों. मला पाहतांच तो जाऊं लागला. तेव्हां तो कोणी मिशन हॉस्पिटलमधून नरसिंगरावाचें औषध घेऊन आला असेल असें मला वाटलें आणि मी चौकशी केली. तेव्हां त्यानें आपण कोण व कां आलों होतों तें सांगितलें. "

" पण ती काय म्हणाली म्हणून त्यानें सांगितलें ? "

" ती लग्नच करायचं नाहीं असं म्हणाली. शिवाय हा जातीचाही प्रश्न निघाला होता. "

रामदेवराव ऊर्फ बापुसाहेब विचारांत मग्न झाले. त्यांच्या मनांतील विचार समजणें कठीण होतें. पुष्कळ वेळानें ते कपाळावरून हात फिरवीत म्हणाले, " संतोबा, ही मोठी बिकट स्थिति उद्भवली म्हणायची ! विमलेच्या बापाजवळ माझी आणभाक झाल्यामुळें तिची जात काय हें देखील मला सांगतां येत नाहीं. आणि जातपात जर सांगितली नाहीं तर पोरीचं लग्न तरी कसं होणार ? मोठा बिकट प्रश्न आहे ! पण काय हो संतोबा, जो तुम्हीं म्हणाला तो मिसाळ कसा काय मनुष्य आहे ? गुणारूपानें तरी कसा आहे ? "

" गुणाबद्दल मी काय सांगूं ? पण रूपाबद्दल म्हणाल तर—छे छे ! बापुसाहेब, आपली विमला कुठें आणि तो कुठें ? दोघांत जमिन अस्मानाचा फरक ! तो खुजट, बसक्या नाकाचा, काळा आणि—"

" पण त्याचा उद्योगधंदा ? "

" आहे येथें दारूच्या कंट्राक्टराकडे ! मिशनच्या वतीनें लागला आहे तेथें !"

" मग तो बाटलेला असला पाहिजे. पण पूर्वीची त्याची जात कोणती ? "

" तें कांहीं विचारूं नका बापुसाहेब. त्याच्या पूर्वीच्या जातीचा सर्व सांवळा गोंधळच आहे. मला वाटतं तो महार असावा. "

" काय म्हणतां ! तो मूळचा जातीनं महार का आहे ? आणि संतोबा, तुम्ही त्याला आपल्या घरांत येऊं दिलं ? "

" मग त्यांत काय झालं ? आतां तो महार थोडाच राहिला आहे ? आतां त्याला आपण ' बाटलेला हिंदु ' असंच म्हणूं ! "

रामदेवरावांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. विमलेला एका बाटलेल्या महारानें मागणी घातली हें ऐकून त्यांना अत्यंत वाईट वाटलें. ते आपल्या कपाळावर हात ठेऊन बराच वेळ विचारमग्न होते. बराच वेळ ते कांहीं बोलत नाहींत असें पाहून संतोबा म्हणाले, " मग बापुसाहेब, आतां ह्या गोष्टीचा पुढें कसा काय विचार करावयाचा ? त्या दिवशीं तिनें ' माझे आईबाप कोण ? ' असा प्रश्न केला. त्यावेळीं मी तर अगदींच गडबडलों. पण ऐनवेळीं मला ती दुष्काळाची गोष्ट सुचून ती वेळ मी कशी तरी पार पाडली. माझ्या बोलण्याचा तिला कांहीं संशय आला नाहीं. परंतु असं हें खोटं किती दिवस निभावणार ? कांहीं तरी ह्या गोष्टीचा नीट विचार झालाच पाहिजे. "

" संतोबा, मला ह्या गोष्टीचा स्वस्थ चित्तानें नीट विचार करूं द्या. परंतु ही

गोष्ट मात्र खरी कीं, कांहीं झालें तरी त्या बाटलेल्या महाराबरोबर तिचें लग्न होतां कामा नये. विमलेचे आईबाप कोण आहेत हें जरी तुम्हाला आतां माहीत नाहीं तथापि इतके लक्षांत ठेवा कीं, तिचा जन्म कुलवंत आईच्या पोटीं झाला आहे. ती—" इतकें बोलून बापुसाहेब गप्प राहिले. ते बोलण्याच्या आवेशांत आले होते परंतु तितक्यांतच त्यांनीं आपली जीभ चावली. आणि विषयांतर करून ते पुढें म्हणाले, " संतोबा, आतां तुम्हीं जा. मी ह्या गोष्टीचा निर्वाणीचा विचार करून तुम्हाला लवकरच कळवितों."

संतोबा कांहीं जास्त न बोलतां जाण्याकरितां उठले. बापुसाहेब तेथेंच विचार करीत बसून राहिले. कांहीं वेळानें संतोबा उठून गेले. परंतु तें देखील त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. इतके ते स्वगत विचारांत मग्न होऊन गेले. शेवटीं त्या विचारांचा अतिरेक झाल्यावर 'विमले! विमले!' असे त्यांच्या मुखांतून मोठ्यानें उद्गार बाहेर पडले. त्यावेळीं पलिकडील दिवाणखान्यांत कमला कांहीं उद्योग करीत होती. तिला ते उद्गार ऐकूं आले. आणि बापुसाहेबांनीं आपणांसच हांक मारिली असें तिला वाटून ती पुढें झाली.

" बापुसाहेब, मला हांक मारिली ?"

" मी तुला हांक मारिली ?—छे—नाहीं!"

" नाहीं कसं? आतां किती मोठ्यानें 'कमले' 'कमले' म्हणून हांका मारिल्या."

" होय—होय—" आपली बाजू सावरून बापुसाहेब म्हणाले, " मी तुला इतक्याचकरितां हांक मारिली कीं, उद्यां सकाळीं मला नरसिंगरावाची प्रकृति पाहण्याकरितां जावयाचें आहे. तेव्हां तुलाही बरोबर आलें पाहिजे."

" मी नाहीं, मी नाहीं. बापुसाहेब, माझं काम काय आहे तेथें ?"

" काम काय म्हणजे ? वास्तविक नरसिंगरावाची शुश्रूषा करण्याचं तुझंच काम आहे. पण तो आतां आपल्या घरीं नाहीं म्हणून गोष्ट वेगळी. तथापि वरचेवर त्याच्याकडे जाऊन त्याची चौकशी देखील तूं करूं नयेस काय? हें देखील मी तुला सांगायला पाहिजे वाटतं!"

" पण त्यांत काय चौकशी करायची? होतील ते आतां बरे!"

मुलीच्या ह्या उत्तरानें बापुसाहेबांस राग आला; परंतु ते कांहीं बोलले नाहींत. फक्त मान फिरवून 'मूर्ख पोर आहेस तूं!' इतकेंच ते म्हणाले. कमलेनें मात्र ते शब्द ऐकले नाहींत. ती आपल्याच तोऱ्यांत तेथून निघून

गेली. बापुसाहेबांचे विचार पुनः सुरू झाले. परंतु ते ज्या व्यक्तीचा इतका वेळ विचार करीत आहेत, ती व्यक्ति आतां काय करीत असेल बरें ? आज बरोबर एक आठवडा झाला. नरसिंगराव असहाय्य स्थितींत संतोबाच्या घरीं पडला होता. पहिले तीन दिवस त्याची अवस्था अत्यंत भयंकर होती. केवळ तो मृत्यूच्याच द्वारीं पडला होता. परंतु त्याची आयुष्यमर्यादा होती म्हणूनच तो त्यांतून निभावला. ही गोष्ट जरी खरी आहे तथापि अहोरात्र डोळ्यांत तेल घालून विमलेनें केलेली शुश्रूषा त्याची आयुष्यमर्यादा वाढविण्यास कारण झाली असेंच म्हटलें पाहिजे. नरसिंगरावाच्या शरीराची एकसारखी होत असलेली तळमळ पाहून ती त्याच्या आरोग्याकरितां ईश्वराची सारखी करुण-वाणीनें करुणा भाकीत होती. गेल्या आठ दिवसांत शेजाऱ्यापाजाऱ्यांत तिच्याबद्दल अनेक प्रकारच्या कंड्या पिकल्या होत्या. आणि त्यांतील कांहीं तिच्या कानापर्यंत आल्या होत्या. परंतु नरसिंगरावाच्या शुश्रुषेपुढें तिला त्याचें कांहींच वाटलें नाहीं अगर त्याकडे तिनें लक्षहि दिलें नाहीं. ‘ देवा ! नरसिंग-रावांना बरें कर ! ’ ह्या मंत्राशिवाय तिला दुसरें कांहीं एक सुचत नव्हतें. तो बरा होईल किंवा त्याच्या हातापायांत कांहीं खोड राहील याबद्दल अद्यापि डॉक्टरानें कांहीं निश्चयात्मक सांगितलें नव्हतें. त्यामुळें तिला त्याच्याविषयीं जास्तच काळजी वाटत असे.

आतां औषध देण्याची वेळ झाली होती. परंतु नरसिंगरावाला स्वस्थ झोंप लागलेली दिसत होती. विमला त्याच्या उशाजवळ खुर्चीवर तळहाता-वर गाल टेंकून बसली होती. तिचें सर्व लक्ष त्याच्या भालप्रदेशाकडे होतें. आज सतत आठ दिवसांच्या एकाग्र आणि सूक्ष्म निरीक्षणानें नरसिंगरावाच्या मूर्तीनें तिच्या अंतःकरणांत कधींहि पुसून न जाणारें प्रतिबिंब उठविलें होतें. आतां औषध देण्याकरितां त्याला उठवावें असें कितीदां तिच्या मनांत आलें. परंतु त्याच्या अंगाला स्पर्श करण्याचें तिला धैर्य होत नव्हतें. कारण ज्या ज्या वेळीं तिला त्याच्या अंगाला स्पर्श करण्याचा प्रसंग येई, त्या त्या वेळीं तिला एक प्रकारचा चमत्कारिक आघात होत असे. त्या आघाताबरोबर तिच्या सर्वांगावर रोमांच उभे रहात. नरसिंगरावाजवळ बसून तिचें मन सारखे विचार करी. परंतु आपण काय विचार करतों हेंच तिला कळत नसे. ह्या वेळीहि ती अशीच विचारांत मग्न झाली होती. इतक्यांत दरवाजा वाजला. विमलेनें मागें वळून पाहिलें तों मि. मनोहर मिसाळ दरवाजांत उभा होता.

त्याच्या पहाण्यांत मत्सराची छटा स्पष्ट दिसत होती. विमला नरसिंगरावाच्या बिछान्याला इतकी खेटून बसलेली त्याला खपली नाहीं. आणि विमलेलाहि त्याला पाहून तिरस्कारच उत्पन्न झाला. त्याला आज स्पष्ट सांगून लवकरच वाटेस लावावा असा विचार करून विमला उठली आणि बाहेर आली. तीं दोघेहि पलीकडच्या खोलींत गेलीं.

" झाला का तो मनुष्य बरा ? " आंत येतांच मनोहरानें विमलेला प्रश्न केला. " आणखी किती दिवस तो रहाणार येथें ? "

" तें आतां मी काय सांगूं ? परंतु चार दिवसांपूर्वी तर त्यांची फारच अत्यावस्था होती. "

" हा एक तुझ्यामागें नसता त्रास लागला म्हणायचा ! "

" त्यांत कसला त्रास ! उलट अशा स्थितींत एकाद्याला मदत करणं हें आपलं कर्तव्य आहे. "

" कसलं कर्तव्य न् कसलं काय ! " असें पुटपुटत मनोहर म्हणाला, " मग परवां मीं विचारलेल्या गोष्टीचा केलास का विचार ? "

" आपणास त्या दिवशींच मी उत्तर दिलं आहे, मग आतां त्या गोष्टीचा विचार काय करावयाचा राहिला आहे ? "

" त्या दिवशीं मला तूं काय उत्तर दिलंस ? जातीबद्दल बोलत असतां मध्येंच तो व्यत्यय येऊन आपलं बोलणं तितकंच राहिलं. परंतु जातीबद्दल तुला शंका घेण्याचं कांहीं कारणच नाही. तूं ज्या मिशनची आहेस त्याच मिशनचा मी आहें. तेव्हां तशी शंका घेण्याचं कांहीं कारण नाहीं. "

" मी मिशनमध्यें होतें म्हणून काय झालं ? मिशनमध्यें राहिल्यामुळें तुमची माझी जात एकच कशी होईल ? "

" पण जातीचा इतका तुला बाऊ कां वाटतो ? तूं आमच्याच मिशनची आहेस ह्यापेक्षां मला जास्त चौकशी करण्याचं कारण नाहीं. वमला ! तूं अशा भलत्याच शंका घेत बसूं नकोस. मी आतां तुला जास्त कांहीं सांगत नाहीं. फक्त तुला सुखी करणं, तुझ्या सुखाला जपणं हेंच मी माझं कर्तव्य—"

" थांबा — तुम्ही अशी भलतीच कल्पना करून घेऊं नका. मी तुम्हाला एकदां सांगितलं कीं मी तुमच्याशीं लग्न करूं इच्छित नाहीं "

" विमले ! माझी अशी निराशा करूं नकोस. माझं तुझ्यावर किती प्रेम आहे म्हणून सांगूं ! छे छे ! विमले, माझ्या प्रेमाची तुला कल्पना देखील होणार नाहीं. "

" मला ह्या भलत्याच गोष्टी ऐकण्याची इच्छा नाहीं. " असें म्हणून विमला जाऊं लागली. तेव्हां तिला अडवून मनोहर म्हणाला, " विमले, तूं किती तरी निष्ठुर आहेस. तुला माझ्या ह्या प्रेमी मनाची कींव येत नाहींना ? तुझं दुसरं कुणावर प्रेम जडलं आहे का ?—सांग, सांग. असा तो कोण आहे? कोणीं तुला अशी मोहिनी घातली आहे ? "

" मला जाऊं द्या. मला तुम्ही अडवूं नका. मला असे भलतेच प्रश्न विचारायला तुम्हाला कांहीं वाटत नाहीं का ? " असें रागानें म्हणून विमला बाहेर पडली. मनोहर तिच्याकडे पहात राहिला. त्यावेळीं त्याच्या चर्येवर राग आणि तिरस्कार या विकारांचें मिश्रण स्पष्ट दिसत होतें. विमला पलीकडच्या खोलींत गेल्यावर तो उठला आणि बाहेर आला, तेव्हां विमला नरसिंगरावाच्या बिछान्याजवळ वांकलेली त्याच्या दृष्टीस पडली. क्षणभरच त्यानें तो देखावा पाहिला. त्याबरोबर त्याचें मस्तक रागानें भणभणलें. सतत सहवासामुळें विमला त्या अपघात झालेल्या तरुणावर प्रेम करूं लागली असेल किंवा त्या दोघांचें सूत जमलें असेल म्हणूनच ती आपणाला झिडकारीत आहे, असा विचार त्याच्या मनांत येऊन बिछान्यावर अत्यावस्थ स्थितींत पडलेल्या नरसिंगरावाविषयीं सूडाची भावना उद्भुत झाली. आतांच्या आतां आंत जाऊन या गोष्टीचा निकाला करून टाकावा, असाहि विचार त्याच्या मनांत आला. इतक्यांत जिन्यावरून कोणी चढत असल्याचा त्याला भास झाला. त्यानें मागें वळून पाहिलें. त्यावेळीं मिशनरीबाई वर चढत होती. तिला पाहतांच त्यानें आपली टोपी काढिली. मिशनरीबाईनें वर आल्यावर हास्य मुद्रा करून त्याला कुशल विचारलें. त्यांचीं प्रश्नोत्तरें होत असतां विमला बाहेर आली तेव्हां तिच्याकडे वळून ' रोगी कसा आहे ? ' असा मिशनरीबाईनें तिला प्रश्न केला.

" आतां त्यांची प्रकृति थोडी बरी आहे. मघांपासून त्यांना स्वस्थ झोंप लागली आहे. " असें विमलेनें उत्तर दिलें. परंतु तिनें बाजूला असलेल्या मनोहराकडे पाहिलें नाहीं. त्यामुळें तर त्याला जास्तच राग आला. त्याचवेळीं मिशनरीबाईनें सहज त्याच्या चर्येकडे पाहिलें. तेव्हां त्याच्या चर्येवर रागाचा दृग्गोचर होणारा विकार तिला स्पष्ट दिसला. तो विमलेकडे कोणत्या हेतूनें आला आहे हें तिला माहीत होतें. परंतु त्याच्या इच्छित हेतूला उत्तेजन देण्याची तिची इच्छा नसल्यामुळें तिनें तो विषय अद्यापि काढला नव्हता.

तथापि आतां त्याच्या मुखावर रागाची छटा पाहून तिला शंका आली. आणि तिनें विमलेकडे पाहिलें. तिची मुद्रा तिला शांत दिसली. तेव्हां तिनें पुनः मनोहराकडे पाहिलें. अशा रीतीनें तिनें त्या दोघांचें मुखावलोकन करून खरा प्रकार जाणला. परंतु कांहीं एक न बोलतां ती आंत गेली. विमलाही तिच्या मागून आंत गेली. तेव्हां मनोहराला मुकाट्यानें पण तडफडत जिना उतरावें लागलें. अद्यापि नरसिंगराव जागा झाला नव्हता. वास्तविक आतां त्याची औषध घेण्याची वेळ होऊन गेली होती.

नरसिंगरावाला अगदीं शांत झोंप लागली होती. आज त्याला बरीच हुशारी वाटत होती. गेल्या चार दिवसांपूर्वी आपण ह्या प्रसंगांतून जगत नाहीं असें त्याला वाटलें होतें. आपल्या असहाय्य स्थितींत विमला रात्रंदिवस किती जिवापाड श्रम करीत आहे, हें तो पूर्णपणें जाणून होता. तिच्या उपकाराची फेड आपणांकडून कशी होईल या गोष्टीचा विचार करीत असतांच त्याला ही झोंप लागली होती. झोंप पूर्ण होतांच त्यानें डोळे उघडले. परंतु इकडे तिकडे दृष्टि फिरवून त्यानें पाहिलें तेव्हां त्याला खोलींत विमला दिसली नाहीं. त्यानें केव्हांही, रात्रीं—अपरात्रीं डोळे उघडले म्हणजे प्रथम विमला त्याच्या दृष्टीस पडत असे. ती केव्हां त्याच्या बिछान्याजवळ तर केव्हां दिव्याजवळ पुस्तक वाचीत बसलेली असावयाची, त्यामुळें डोळे उघडतांच साहजिक विमला काय करीत आहे हें पाहण्याकरितां नरसिंगरावाची दृष्टी इकडे तिकडे फिरली. परंतु ती खोलींत नाहीं असें पाहून त्याला एकदम उदास वाटूं लागलें. आपल्या मनाची अशी वृत्ति कां झाली असा विचार त्याच्या मनांत येतो न येतो तोंच पलीकडच्या खोलींतून कांहीं शब्द त्याच्या कानीं आले; तेव्हां त्यानें उशीवरून आपलें डोकें किंचित वर उचललें. त्यावेळीं पलीकडच्या खोलींत विमलेला जवळ बसवून मिशनरीबाई आकाशांतील बापाची सायंकाळची प्रार्थना करीत होती. नरसिंगरावाच्या कानीं पडलेले शब्द खालीं दिले आहेत.

"देवाची आम्हावरील प्रीति येणेंकरून प्रगट झाली कीं, देवानें आपल्या एकुलत्या एक मुलाला जगांत यासाठीं पाठविलें कीं, आम्हीं त्याकडून जगावें. कां तर देवानें जगावर एवढी प्रीति केली कीं, त्यानें आपला एकुलता एक मुलगा दिला, यासाठीं कीं, जो कोणी त्यावर विश्वास ठेवितो त्याचा नाश होऊं नये, तर त्याला सर्व काळचें जीवन

व्हावें. देव आमचा आकाशांतील बाप व त्याचा मुलगा येशू ख्रिस्त त्याकडूनच सर्वकाळचें जीवन आहे असा जो कोणी विश्वास धरील त्यास देवाचा पवित्र आत्मा प्राप्त होऊन तो त्यामध्यें वस्ती करील व देवाची प्रीति ही त्यास आपल्या शत्रूवर देखील प्रीति करण्यास साहाय्य करील. हे आमच्या आकाशांतील बापा, तुझें नांव पवित्र मानिलें जावो; आम्हास परीक्षेंत आणूं नको, तर आम्हास वाईटापासून सोडीव; कारण कीं राज्य तुझें आहे, आणि सामर्थ्य व गौरव हीं सर्वकाळ तुझीं आहेत. * आमेन."

"तारक ख्रिस्त खरा। या जगीं तारक ख्रिस्त खरा ॥ धृ० ॥
पाप्यासाठीं त्यागुनि स्वर्गा। झाला गार हिरा ॥ १ ॥
लोकां सांगे सर्वहि ढोंगे। त्यागुनी सत्य धरा ॥ २ ॥
मानवला तो नच लोकांना। नसुनि दोषि जरा ॥ ३ ॥
द्वेषानें त्या मारविलें ते। कंपित झाली धरा ॥ ४ ॥
तिसरे दिवशीं उठला पुढती। झाला लेख पुरा ॥ ५ ॥
होता जगतीं बोधितसे तो। देवाविषयीं बरा ॥ ६ ॥
पाप्यानों ! या ओळखुनीया। याचे चरण धरा + ॥ ७ ॥

दोघींची प्रार्थना आटोपल्यावर थोडा वेळ स्तब्धता होती. नरसिंगरावाचें सर्व लक्ष आतां त्यांच्या गाण्याकडे लागलें होतें. क्षणभरानें मिशनरीबाईचा आवाज त्याला ऐकूं आला.

"विमला, प्रभु येशू ख्रिस्तावर विश्वास ठेवून तूं आकाशांतील बापाला केव्हां शरण जाणार ?" ह्या प्रश्नाला विमलेनें उत्तर दिलें नाहीं. तेव्हां ती थोड्या वेळानें पुढें म्हणाली, "विमला, प्रभु येशू ख्रिस्त आपला निर्माणकर्ता आहे, तो आपला राखणारा आहे, तो येहोवाचा अवतार आहे, तो आपला याजक आहे, त्याला तूं शरण जातांच तुझ्या मनाची तळमळ आतां शांत होईल." मिशनरीबाईच्या याहि प्रश्नाला विमलनें उत्तर दिलें नाहीं. ती आतां काय उत्तर देईल तें ऐकण्यासाठीं नरसिंगरावानें आपले कान अगदीं टवकारिले. इतक्यांत त्याला एक मोठी शिंक आली. आणि त्या शिंकेचा परिणाम असा झाला कीं, त्याची झोंप पूर्ण होऊन तो आतां जागा झाला

---

* पवित्रशास्त्र. मात्थी ६ : ९-१३ + उपासना २४३.

आहे ही गोष्ट पलीकडच्या खोलींत असलेल्या विमलेच्या लक्षांत आली. तिला एक सबळ कारण मिळालें. ती चटकन् उठली आणि 'नरसिंगराव उठले, त्यांची औषधाची वेळ होऊन गेली आहे' असें म्हणून ती बाहेर पडली. मिशनरीबाईलाहि नाइलाजास्तव तिच्या मागून उठावें लागलें.



## ६ मनाची स्थिति

**मिशनरीबाईला** खालपर्यंत पोंचविल्यावर विमला वर आली. आणि पुनः नरसिंगरावाच्या बिछान्याजवळ उभी राहिली. त्यावेळीं तो डोळे मिटून स्वस्थ पडला होता; परंतु त्याचें मन मात्र स्वस्थ नव्हतें. थोड्या वेळापूर्वी मिशनरीबाईनें विमलेला विचारलेले प्रश्न त्याच्या कानांत अद्यापि गुणगुणत होते. विमलेकडून धर्मांतर करण्याचा तिचा प्रयत्न चालला आहे हें त्याच्या लक्षांत आलें. अद्यापि त्याला विमलेविषयीं किंवा तिच्या पूर्ववृत्तांताविषयीं कांहींच माहिती नव्हती. फक्त ती संतोबाची मुलगी नसून त्यांनीं वाढविलेली एक पोरकी मुलगी आहे इतकेंच त्याला कळलें होतें. एक दोनदां त्यानें तिला स्वतःविषयीं विचारलें होतें; परंतु तिला जास्त कांहीं सांगतां आलें नाहीं. याशिवाय तो तिच्याजवळ फारच क्वचित् बोलला असेल. कारण अद्यापि बोलण्याइतकी त्याच्या अंगीं शक्ति नव्हती. आणि जेव्हां जेव्हां बोलण्याचा प्रसंगच येई, तेव्हां तेव्हां तो 'विमलाबाई, तुमचे मजवर अगणित उपकार होत आहेत, यांची फेड मजकडून कशी आणि केव्हां होईल ती होवो!' हें एक ठराविक वाक्य बोलत असे. परंतु आज त्याला बोलण्याकरितां विषय मिळाला असून आपण थोडावेळ बोलूं अशी स्वतःच्या शक्तिविषयीं खात्री वाटत होती, त्यानें एकदां विमलेकडे पाहिलें, तेव्हां ती म्हणाली, "तुम्हाला आतां भूक लागली असेल. पण नुकतंच औषध घेतलं आहे तेव्हां थोड्या वेळानें मी दूध घेऊन येतें."

"मला इतक्यांत दूध नको. पण मला तुम्हाला कांहीं विचारावयाचं आहे." नरसिंगरावानें प्रश्न विचारतांना जो एक प्रकारचा हळू पण मधुर स्वर काढला तो ऐकून आणि त्याची आपल्या मुखाकडे लागलेली भेदक दृष्टि पाहून विमला अगदीं गडबडून गेली. तिनें आपला पदर सांवरून घट्ट

ोढून घेतला. तिची छातीहि धडधडूं लागली. ती मुकाटयानें प्रश्न विचार-याची वाट पहात राहिली. तेव्हां नरसिंगराव म्हणाला, " मघां तुमची बाई ाली असतां तिनें तुम्हाला विचारलेले कांहीं प्रश्न मी ऐकलें. आणि तेव्हां-ासून मला अगदीं अस्वस्थ वाटूं लागलं आहे. तुम्हाला ती बाई आकाशांतील ापाला शरण जावयास सांगते याचा अर्थ काय ? तो आकाशांतील बाप कोण ? ाणि त्याला शरण गेल्यावर तो काय करणार ? "

विमलनें हे दोन तीन प्रश्न ऐकून घेतल्यावर शेवटच्या प्रश्नाचें उत्तर दिलें. ी म्हणाली, " त्याला शरण गेल्यावर तो दयाळु देव सर्व पापांचा नाश करून ांति देईल. "

" असं काय ? पण तुमच्या हातून पापं घडलीं आहेत का ? त्या दयाळु वाला शरण जायचं म्हणजे तुमच्या हातून पापं घडलीं असलीं पाहिजेत. "

" माझ्या हातून कसली पापं घडलीं ?" आश्चर्यानेंच विमलेनें उलट विचारलें.

" पापं नाहीं ना घडलीं ? मग कशाला शरण जाणार ? "

" तो आपला पालनकर्ता, निर्माणकर्ता आहे. त्याला शरण गेल्यानें ांति मिळते. "

" त्याचं नांव काय ? "

" प्रभु येशुख्रिस्त. "

" बरं ह्या देवाशिवाय दुसऱ्या देवांची आपणांस माहिती किंवा नांवं ाऊक आहेत का ? "

" नाहींत. "

" नाहीं ! मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. तुम्हाला प्रभु येशुख्रिस्ताशिवाय ुसऱ्या देवांचीं नावं देखील ठाऊक नाहींत ? राम, कृष्ण, दत्त, शंकर—"

" हीं नांवं मला ठाऊक आहेत पण हे देव कुठें आहेत ? "

" मग हे कोण ? हे जर देव नाहींत तर येशुख्रिस्त तरी देव कसा ? "

" तो आकाशांतील बापाचा मुलगा आहे. "

" असं का ! "

विमलेचें हें उत्तर ऐकून नरसिंगरावाला वाईट वाटलें. परंतु लगेच याच्या मनांत दुसरा विचार आला. विमलेला लहानपणापासून मिशनमध्यें ्विल्यामुळें तिला येशुख्रिस्ताशिवाय दुसऱ्या देवांची माहिती असणें शक्य ासल्याकारणानें तिला या बाबतींत कांहींच दोष देतां येत नाहीं. उलट

इतकीं वर्षें मिशनमध्यें राहून ती अद्यापि येशुखिस्ताच्या कळपांत शिरली नाहीं याबद्दल त्याला समाधानच झालें. आणि इतकीं वर्षें मिशनच्या लोकांनीं तिला आपल्या कळपांत ओढल्याशिवाय कसें ठेविलें याचें आश्चर्य वाटलें.

" पण आतां तुम्हीं नांवं घेतलीं तें सर्व देवच का आहेत ? " विमलेनें विचारलें, " आमच्या बाई म्हणतात कीं, आकाशांतील बापाचा येशुखिस्त हा एकच मुलगा आणि तोच देव. "

विमलेचें हें अज्ञान पाहून नरसिंगरावाला तिची अगदीं कींव आली. तो म्हणाला, " होय. तुमच्या बाई म्हणतात त्याप्रमाणें असेल कदाचित् ! पण मला आतां एक लहानशी गोष्ट आठवली ती मी सांगतों. एक विहीर होती आणि त्या विहिरींत एक बेडुक रहात असे. पुढें एके दिवशीं समुद्रांत रहाणारा एक बेडूक तेथें आला आणि त्या विहिरींत पडला. तेव्हां पहिल्या बेडकानें ' तूं कोठून आलास ? ' असा त्याला प्रश्न केला. दुसऱ्या बेडकानें उत्तर दिलें, ' मी समुद्रांतून आलों. ' त्यावर पहिला बेडुक म्हणाला, ' समुद्रांतून ! तो समुद्र केवढा मोठा आहे ? माझ्या या विहिरीएवढा मोठा आहे काय ? ' असें म्हणून त्यानें विहिरीच्या दुसऱ्या कांठावर उडी मारिली. तेव्हां दुसरा बेडुक म्हणाला, ' अरे वेड्या ! तुझ्या ह्या लहानशा विहिरीची समुद्राबरोबर तूं कशी तुलना करतोस ! ' हें भाषण ऐकून पहिल्या बेडकानें पुनः एक उडी मारली आणि विचारलें, ' इतका तरी आहे का तुझा समुद्र मोठा ? ' हें भाषण ऐकून दुसरा बेडुक म्हणाला, ' तूं मूर्ख आहेस. तुझी ही टिचभर विहिर कुठें आणि माझा अवाढव्य पसरलेला समुद्र कुठें ! ' हें उत्तर ऐकतांच विहिरींतील बेडुक रागानें म्हणाला, ' अरे जा ! उगाच गप्पा का मारतोस ! माझ्या ह्या विहिरीपेक्षां जगांत दुसरें कांहीं मोठें नाहीं. सर्वांत माझी ही विहीरच मोठी आहे ! ' असें म्हणून त्या बेडकानें दुसऱ्या बेडकाला अगदीं तुच्छ मानिलें. तसाच प्रकार तुमच्या बाईचा आहे. ती खिस्तीधर्मरूपी विहिरीच्या कांठावर बसली आहे आणि म्हणते कीं, येशुखिस्त हाच काय तो एक देव. "

" पण येशूखिस्त प्रभूला लोकांच्या पापांकरितां फांशी जावं लागलं. प्रभूनें सर्वांचीं दुःखें आपणांकडे घेतलीं. "

" येशूनें लोकांचीं दुःखें आपणाकडे घेतलीं आणि तो लोकांच्या पापाकरितां फांशीं गेला, या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ईश्वर कोणाचीं दुःखं आपणाकडे घेत नाहीं किंवा कोणाकरितां फांशीहि जात नाहीं. जसे आपल्या-

मध्यें श्रीराम, श्रीकृष्ण यांचे अवतार झाले, तसाच येशू खिस्ताचा एक अवतार झाला. श्रीरामानें किंवा श्रीकृष्णानें जी कामगिरी केली तीच येशू-खिस्तानें केली. जगांत जेव्हां अधर्म पसरतो, लोक अनीतीनें वागूं लागतात, धर्माचा जेव्हां ऱ्हास होऊं लागतो, तेव्हां निरनिराळ्या देशांत ईश्वर अवतार घेतो. खिस्तीधर्मांत येशू खिस्ताच्या तोडीचे जसे सेंट पॉल, सेंट मेरी ह्या थोर विभूति होऊन गेल्या तशाच विभूति आपल्याकडेहि पुष्कळ झाल्या आहेत. रामदास, तुकाराम, नामदेव, एकनाथ अशा आपल्याकडेहि पुष्कळ विभूति आहेत. यांच्याविषयीं तुम्हांला कांहीं माहिती आहे काय ? ”

“ नाहीं. फक्त हीं नांवें मात्र ऐकून माहिती आहेत. ”

“ बरं पण तुम्ही कधीं आपल्या देवळांत तरी गेलां आहांत का ? ”

“ नाहीं. ”

विमलेचें उत्तर ऐकून नरसिंगराव क्षणभर विचार करीत राहिला. तिच्या मनावर आपल्या धर्माचा प्रकाश पाडण्यास आपणास बराच त्रास होईल, असें आतां त्याला वाटूं लागलें. तथापि वाटेल ते श्रम करावे लागले तरी देखील माघार न घेता किंवा निराश न होतां तिला धर्मांतर करूं द्यावयाचें नाहीं, असा त्यानें त्याचवेळीं निश्चय केला. बऱ्याच वेळानें तो म्हणाला, “ आतां-पर्यंतचें तुमचें सर्व आयुष्य मिशनरी लोकांच्या सहवासांत गेल्यामुळें तुम्हाला स्वतःच्या धर्माची कांहीं एक माहिती झालेली नाहीं. परंतु असें असणें कांहीं चांगलें नाहीं. ज्याला स्वतःचा धर्म कळत नाहीं तो मनुष्य नव्हे; असं म्हटलं आहे. पण ह्या बाबतींत मीं तुम्हाला दोष देत नाहीं. कारण तुमच्या पालक मंडळींनीं तुम्हांला [illegible] अगदीं चमत्कारिक परिस्थितींत नेऊन ठेवलं आणि स्वतःचा धर्म समजून घेण्याचीं तुम्हाला केव्हांच संधि मिळूं दिली नाहीं. म्हणून म्हणतों कीं, प्रथम तुम्ही आपला धर्म नीट समजावून घ्या आणि आपल्या बाईला उत्तर द्या.

“ बाईना कसलं उत्तर द्यायचं ? ”

तिनं आज तुम्हाला केलेल्या प्रश्नाचं ! मघां तिनें ‘ आकाशांतील बापाला शरण केव्हां जाणार ’ असा तुम्हाला प्रश्न केला होता. त्याचें तुम्ही कांहीं उत्तर दिलें नाहीं असें वाटतें. कदाचित् तिनें केलेला हा प्रश्न तुम्हाला सम-जला देखील नसेल. पण त्या प्रश्नांत मोठा खोल अर्थ भरलेला आहे.

“ तो कसा ? ”

" त्याचा अर्थ असा कीं, तुम्ही आपली हात जोडून बाप्तिस्मा घ्यावा— ख्रिस्ती व्हावं—"

" धर्म सोडून, जात सोडून, पण जात—पण मला जा—त—" विमला अडखळली !

स्वतःच्या जातीचा प्रश्न पुनः तिच्यापुढें उभा राहिला. तिची बोलतांना अडखळून गडबडलेली स्थिती पाहून नरसिंगराव म्हणाला, " तुमची जात कोणतीहि का असेना. पण तुम्ही हिंदु आहांत ही गोष्ट मात्र खरी ना ? मग झालं तर ! तुम्ही अशा गोंधळून जाऊं नका. मी तुम्हाला प्रथम आपल्या हिंदु-धर्माचें रहस्य सांगतों. आणि हळुहळु आपल्या सर्व देवांची ओळख करून देतों. ख्रिस्ती धर्माचें धर्मपुस्तक म्हटलें म्हणजे फक्त एक पवित्र शास्त्र—बायबलच आहे. आणि आपलें धर्मपुस्तक भगवद्गीता हें होय. ह्याशिवाय आपण पवित्र मानलेले असे पुष्कळ ग्रंथ आहेत, पोथ्या आहेत, आणि पुराणें आहेत. मी आतां कांहीं पुस्तकें आणि पोथ्या मागवितों. त्या सर्व तुम्ही मनन-पूर्वक वाचा." इतकें बोलून नरसिंगराव थांबला. आज तो पुष्कळ बोलला. वास्तविक इतका वेळ बोलण्याची त्याच्या अंगांत शक्ति नव्हती.

" तुम्ही आतां फार बोलूं नका. तुम्हाला फार श्रम होत आहेत. आतां मी तुमच्यासाठीं दूध घेऊन येतें." असें म्हणून विमला दूध आणण्याकरितां खालीं गेली. ती मागें वळल्यापासून तों जिन्यावरून खालीं उतरून जाईपर्यंत नरसिंगराव तिच्याकडे पहात होता. ती दृष्टिआड होतांच तो स्वतःशीं म्हणाला, " नाहीं—हिला मी केव्हांहि धर्मांतर करूं देणार नाहीं. फक्त महाभारत जर हिनं लक्षपूर्वक वाचलं आणि गीता ग्रंथाचं महत्त्व मनावर बिंबलं तर हिच्या हातून केव्हांही धर्मांतर होणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. आणि इतकं जरी मजकडून झालं तर माझ्याकडून मोठंच कार्य झालं असं मी समजेन." इतकें बोलून तो वरच्या छताकडे पहात विचार करीत राहिला. थोड्या वेळानें जिना वाजू लागला. तेव्हां विमलाच वर येत आहे असें समजून त्यानें दरवाजाकडे मान फिरविली. परंतु विमला वर येण्याऐवजीं बापुसाहेब आणि त्यांची लाडकी मुलगी कमला वर येतांना त्याच्या दृष्टीस पडली. तो रामदेवरावांच्या येथें आल्यापासून कमलेबरोबर त्याचें क्वचितच भाषण झालें असेल. पहिल्या दिवशीं त्यानें तिच्या बरोबर मोकळ्या मनानें बोलण्याचा प्रयत्न केला; परन्तु पुढें चार दिवसांच्या अनुभवावरून कमला

दुसऱ्याबरोबर बेपर्वाईनें व स्वतःच्या आढ्यतेंत वागणारी आहे असें त्याच्या लक्षांत आलें. तेव्हां तोही तिच्याबरोबर ' जेवढ्यास तेवढेंच ' वागूं लागला. आज ती बापुसाहेबांच्याबरोबर केवळ त्यांच्या आग्रहावरूनच आली होती. आणि तिला बरोबर आणण्यांत बापुसाहेबांचा काय उद्देश होता हा, वाचकांनीं गेल्या प्रकरणांत वाचलाच आहे. बापुसाहेब आंत आल्यावर त्यांनीं नरसिंगरावाची चौकशी करण्यास सुरवात केली. परंतु कमला खिडकीजवळच उभी राहून बाहेर पाहूं लागली. नरसिंगरावानेंहि तिच्याकडे लक्ष दिलें नाहीं.

" बापुसाहेब, आपल्याकडे महाभारत, गीता आणि अशींच दुसरीं कांहीं धार्मिक पुस्तकें असतील ? " नरसिंगरावानें विचारलें.

" होय, आहेत. तुला वाचायला हवीं आहेत काय ? तुला पडून पडून अगदीं कंटाळा आला असेल, नाहीं बरें ! बरं तर आतां घरीं गेल्यावर मी कांहीं पुस्तकें तुला पाठवून देतों. असें म्हणून बापुसाहेब आपल्या मुलीकडे वळून म्हणाले, " कमला, महाभारताचं पुस्तक तुला वाचायला दिलं होतं तें मग घरीं गेल्यावर मला दे बरं. "

" माझ्याजवळ नाहीं तें पुस्तक. "

कमलेनें हें तिरसट उत्तर द्यावयाला आणि विमला दूध घेऊन आंत यावयाला एकच गांठ पडली. तिनें अद्यापि कमलेला पाहिलें नव्हतें. किंवा ती कोण आहे हें देखील तिला ठाऊक नव्हतें. परंतु तर्कानें ती बापुसाहेबांची मुलगी असेल असें तिनें जाणिलें. आंत येतांना तिच्या कानीं पडलेले शब्द व तिचें वर्तन पाहून विमलेला आश्चर्य वाटलें. नरसिंगरावानें आपल्या अपघाताची हकीकत कळविण्याकरितां रामदेवरावास ' मामा ' असें संबोधिलेलें तिच्या लक्षांत होतें. त्यावरून ती नरसिंगरावाची मावसबहीण असून आपल्या भावाच्या शोध समाचाराला आली असतां तिचें असें चमत्कारिक वर्तन कां असावें याचा तिला उलगडा होईना. तिनें मुकाट्यानें नरसिंगरावाला दूध दिलें. बापुसाहेब जवळच उभे होते परंतु ते देखील विमलेबरोबर प्रथम कांहीं बोलले नाहींत. नरसिंगराव दूध घेईपर्यंत खोलींत पसरलेली शांतता, त्यानें दुधाच्या घेतलेल्या शेवटच्या घोटाबरोबर भंग झाली. त्या घोटाबरोबर त्याला ठसका लागून त्याच्या नाकातोंडांतून सर्व दूध एकदम बाहेर आलें. आणि त्याचक्षणीं त्यानें डोळे पांढरे केले. तें पाहतांच विमला आणि बापुसाहेब यांची धांदल उडाली.

" अहो, कोणी तरी डॉक्टरसाहेबांना बोलवा हो ! हें पहा—हें पहा कसे करतात तें ! " आपल्या पदरानें नरसिंगरावाच्या नाकातोंडांतून बाहेर आलेलें दूध पुशीत असतां अत्यंत केविलवाण्या स्वरानें विमला म्हणाली. बापुसाहेबांनीं खिडकीजवळ जाऊन आपल्या गाडीवानास धांवत जाऊन डॉक्टरास आणण्याचा तांतडीनें हुकूम दिला. परंतु कमला मात्र खिडकीजवळून हलली नाहीं. विमला नरसिंगरावाला शुद्धीवर आणण्याचे शक्य ते प्रयत्न करीतच होती. त्या गडबडींत त्याच्या कपाळाला बांधलेला पट्टा सरकून जखमेंतून रक्तस्राव होऊं लागला. शेवटीं तिच्या प्रयत्नाला यश येऊन नरसिंगरावानें डोळे उघडले आणि इकडे डॉक्टरसाहेबहि आले. त्यांनीं एकाएकीं असा प्रकार होण्याचें कारण विचारून त्याच्या कपाळावरील पट्टा सारखा बांधला आणि ' अति श्रमामुळें असें झालें ' असें आपलें मत दिलें. पुढें बराच वेळ डॉक्टर आणि बापुसाहेब बाहेरच्या बाजूला बोलत उभे होते. नंतर जातांना डॉक्टरांनीं विमलेला कांहीं सूचना केल्या. नरसिंगराव डोळे मिटून आंत स्वस्थ पडला होता. बराच वेळ झाला. बापुसाहेबांनीं एकदोनदां संतोबा घरीं आले किंवा नाहीं याची चौकशी केली. शेवटीं तेहि जावयास निघाले. पुनः सर्वत्र शांतता पसरली. डॉक्टरानें नुकत्याच दिलेल्या औषधामुळें नरसिंगरावास झोंप लागली. हळुहळु रात्र होऊं लागली. विमलेनें दिवा लावून कानोड्यांत ठेविला. स्वयंपाकघरांत जेवण तयार करून भवानीबाई पतीची मार्गप्रतीक्षा करीत बसली होती. तिनें अलीकडे आठ दिवस विमलेला एका शब्दानेंहि दुखविलें नाहीं. कारण ती घरांत आल्यामुळें अर्थप्राप्ति होऊन दोन दागिनेहि तिच्या अंगावर पडले होते. शिवाय विमलेला कळूं नये म्हणून संतोबांनीं दारू पिण्याचेंहि सोडलें होतें. हा सर्व विचार करून भवानीबाई शेजारपाजारच्या बायका टोंचून आणि टाकून बोलत होत्या तरी त्याकडे दुर्लक्ष करीत होती. मधून मधून तिला बोलण्याची लहर येत असे; परंतु नरसिंगराव वरच्या माडीवर आजारी असल्यामुळें तिचा निरुपाय होत असे. स्वतःच्या घरांत तिला मोठ्यानें बोलण्याचीहि चोरी झाली होती. आतां बराच वेळ पतीची वाट पाहून थकल्यावर विमलेला तरी जेवायला बोलवावें या उद्देशानें ती उठली आणि विमलेला हांका मारूं लागली. नुकताच डॉक्टर येऊन गेलेला तिनें पाहिला होता. त्यावरून आज नरसिंगरावाची प्रकृति पुनः बिघडली आहे हें ती जाणून होती. तेव्हां त्याला एकटेंच

वर सोडून विमला जेवणाकरितां खालीं येईल किंवा नाहीं याची तिला शंकाच होती आणि त्याचप्रमाणें झालें.

'बाबा आले म्हणजे मी येतें.' असें भवानीबाईला सांगून विमला व‍ आली. त्यावेळीं नरसिंगरावानें 'विमला–विमला' अशा हाका मारलेल्या तिल ऐकूं आल्या. ती 'ओ' म्हणून चटकन् आंत गेली. परंतु नरसिंगराव झोंप लेला तिच्या दृष्टीस पडला. ती बिछान्याजवळ उभी राहून त्याच्या मुखाकडे अचल दृष्टीनें पहात राहिली. त्यावेळीं नरसिंगराव औषधाच्या गुंगींतच झोंपलेला होता. आणि संध्याकाळपासून अनुभविलेला प्रकार त्याच्या मनांत घोळत होता. पुनः थोडा वेळ गेल्यावर तो म्हणाला, "विमला, तुला मी ह्या देहांत प्राण आहे तोंवर धर्मांतर करूं देणार नाहीं." मनीं वसे तें स्वप्नीं दिसे' असा तो प्रकार होता. त्यानें उच्चारलेलें वाक्य विमलेनें स्पष्ट ऐकलें. आणि झोंपेंतला प्रकार आहे हें तिनें जाणलें. आपणाविषयीं नरसिंगरावाच्या मनाला किती विलक्षण टोंचणी लागली आहे, याची तिला आतां चांगली कल्पना झाली. तिला गहिंवरून आलें आणि त्या भरांत तिनें आपला हात हळूच त्याच्या कपाळावर ठेविला आणि म्हटलें, "मजविषयीं आपणाला इतकी कां काळजी वाटते ?"

तिच्या थंड हाताचा स्पर्श होतांच नरसिंगराव चटकन् जागा झाला. आणि त्याची दृष्टि प्रथम तिच्या पदराकडे गेली. तेव्हां तो एकदम म्हणाला, "विमलाबाई, तुमच्या पदराला हें रक्त कसलें लागलें आहे ?"

"कुठें ?—हें का–मघां आपल्या कपाळावरील जखमेंतून रक्त वाहूं लागलें तें मी पदरानें पुसलें, पण तुम्ही माझ्याविषयीं इतका कसला विचार करीत आहांत ? मी एक कुलहीन दुर्दैवी आहें ! माझ्याबद्दल इतका विचार करून स्वतःला त्रास करून घेण्याचं काय कारण ? आतां जो प्रकार झाला, त्याला कारणहि हेच विचार होत. आतां तुम्ही स्वस्थ पडा आणि बोलूंहि नका. तुम्हाला विश्रांति घेतली पाहिजे."

इतक्यांत 'अग, ए—दार उघड.—विमले—!' अशी संतोबाची हांक ऐकूं आली. परंतु तो रोजचा शब्द नव्हता. त्यानें दारूच्या पूर्ण निशेंत ती हाक मारिली होती.



'खरी आंच लागल्याशिवाय उपरति होत नाहीं असें म्हणतात तें अक्षरशः खरें आहे. घरांत विमला आली, तेव्हांपासून संतोबांना तिची दहशत बसून त्यांनीं आपल्या तोंडाची बाटली दूर केली होती. मधून मधून शहरांतून परत येत असतां त्यांचीं नेहमीचीं ठिकाणें त्यांना मोह घालीत असत परंतु त्यांनीं आपलें मन आवरून धरिलें होतें. गेल्या दहा दिवसांत त्यांनीं दारूचा एक थेंबहि चाखला नाहीं. परंतु असें किती दिवस चालणार ? वाफ जितकी दाबून ठेवण्याचा प्रयत्न करावा तितकीच ती जास्त जोरानें बाहेर पडणार अशीच स्थिति आज संतोबाची झाली. ते आज शहरांतून परत येत असतां गांवाबाहेरील सडकेवर त्यांची आणि मनोहर मिसाळाचीं भेट झाली. गेल्या प्रकरणांत उल्लेख केल्याप्रमाणें तो विमलेची भेट घेऊन कोणत्या स्थितींत बाहेर पडला होता हें वाचकांना अवगत आहेच. तिनें आपणाला झिडकारिलें याचा राग धरून त्याचें डोकें संतप्त झालें होतें आणि त्याच विचारांत तो चालला होता. इतक्यांत समोरून संतोबा येत असलेले त्याच्या दृष्टीस पडले. तेव्हां त्यानें संतोबावर प्रयोग करण्याचा विचार केला.

"का कुणीकडे शहरांत गेला होतां काय ?" संतोबा जवळ आल्यावर मनोहरानें हास्यमुद्रा करून विचारलें. "आतां मी आपल्याच घरीं जाऊन आलों.—कां निघालांतसे ? घाई आहे वाटतं ?"

"होय, जरा जातों घरीं लवकर. आमच्या घरीं तो नरसिंगराव आहे ना आजारी !"

"पण आज त्याची प्रकृति पुष्कळ बरी आहे असें विमला म्हणाली. आणि मीही त्याला आतां समक्ष पाहिलं आहे. बरं पण संतोबा, आपण अगदीं जवळच आहोंत. तेव्हां चला जरा आमच्या डेपोंत आमच्या घरीं तरी तुम्ही केव्हां येणार."

"आतां नको. मग पुढें केव्हां तरी येईन."

"चला हो. कांहीं फार लांब नाहीं जायचं !"

संतोबांना नाहीं म्हणतां येईना. दोघेहि डेपोंत आले. मनोहराला त्याच डेपोंत नोकरी होती. त्याची रहाण्याची खोलीहि डेपोच्या मागेंच होती. संतोबा आंत आल्यावर त्यांना बसण्याकरितां खुर्ची देऊन मनोहरानें कपडे काढून

ठेविले आणि ' मी आतां इतक्यांत येतों असें म्हणून तो थोडावेळ बाहेर जाऊन आला. थोड्या वेळानें एक नोकर आंत आला. त्याला मनोहरानें कांहीं हलक्या आवाजांत सांगितलें. तेव्हां त्यानें कोपऱ्यांत असलेलें लहानसें मेज उचलून त्यांच्यापुढें ठेविलें. ते पाहून संतोबानें विचारलें. " हा काय विचार आहे ? "

" कांहीं, नाहीं, म्हटलं तुम्ही तरी केव्हां माझ्या गरिबाच्या घरीं येणार ?– अरे जा आतां वेळ नको करूं. "

नोकर पुनः बाहेर गेला आणि फराळाचे जिन्नस घेऊन आंत आला. त्या पदार्थांचा खमंग सुवास आणि खोलींत आल्यापासून डेपोंतील दारूचा वास अशा ह्या दुहेरी माऱ्यानें त्याच्या मनावरील आवरण लटपटलें. त्यांनीं प्रथम थोडे आढेवेढे घेतले; परंतु मनोहरानें जेव्हां प्रत्यक्ष बाटली आणून त्यांच्यापुढें मेजावर ठेविली, तेव्हां मात्र त्यांना पक्का मोह पडला. आणि एकदोन फेरे होतांच संतोबांचा घरोबा झाला. ते आतां पोपटासारखे बोलूं लागले. मनोहरानें प्रथम दुसऱ्या गोष्टी बोलून आपल्या मुख्य विषयाला सुरवात केली. त्यांचीं पुष्कळ प्रश्नोत्तरें झालीं परंतु आपण येथें मुख्य मुद्यांचाच विचार करूं.

" हो—हो—तुम्ही म्हणतां तें अगदीं खरं आहे—" संतोबा बोलत होते. " त्यांत कार्य तिचं वाईट होणार आहे ! उलट तिची जातपात न पाहतां तुम्ही तिच्याबरोबर लग्न करण्यास तयार आहांत, हें मी समजतों. आपण तिच्यावर मोठेच उपकार करीत आहांत. शिवाय असं पहा कीं, तुमचं लग्न झाल्यावर, तुम्ही राजा आणि ती राणी अशा थाटांत तिला राहतां येईल. मला तर बुवा तुमची ही धाडसाची मागणी अगदीं पसंत—सोळा आणे पसंत आहे. " दारूचा पेला तोंडाला लावीत संतोबानीं वाक्य पुरें केलें.

" अहो तुम्हांला पसंत आहे पण विमलेला कुठें पसंत आहे ? ती तर स्पष्ट नाहीं म्हणूनच म्हणते. "

" मग तर ती अगदीं मूर्ख—शत मूर्ख—अगदीं गाढव आहे असंच म्हटलं पाहिजे. तिला असं तुमच्यासारखं स्थळ मिळायला तपश्चर्याच केली पाहिजे. "

" तें राहूं द्या हो. पण आतां ह्या गोष्टीला तोड काय करावी ? तुम्हीं मनावर घेतल्याशिवाय कांहीं हें जुळणं शक्य दिसत नाहीं. "

" मी काय त्यांत मनावर घ्यावयाचं ! आणि माझ्या हातांत काय आहे. अहो, ती लहान—दोनतीन वर्षांची असतांना आपले बापुसाहेब काकडे आहेत ना, त्यांनीं तिला माझ्या स्वाधीन केली. मी तिचा दोन वर्षें सांभाळ केला आणि तिला थोडं बहुत कळूं लागतांच बापुसाहेबांच्या सांगण्यावरूनच मिशनमध्यें ठेविली. "

" मग ती बापुसाहेबांची कोणी आप्तसंबंधी आहे कीं काय ? "

" छे हो ! ती त्यावेळीं दुष्काळांत त्यांना मिळाली. अशी कांहीं तिची कर्मकथा—नव्हे जन्मकथा आहे. पण तुम्हीं असं करा, उद्यां जाऊन बापुसाहेबांना भेटा आणि त्यांना एकदां कळविलं कीं, मग तिचा काडीइतका हट्ट चालणार नाहीं. " अशा रीतीनें आपल्या अंगावरील घोंगडें बापुसाहेबांच्या अंगावर फेंकून संतोबा मोकळे झाले. आज त्यांनीं मनोहराचा पूर्ण पाहुणचार घेतला. ते जेव्हां जाण्याकरितां उठले तेव्हां त्यांचे पाय त्यांचीं शरीरयष्टि सांभाळण्यास तयार नव्हते. ते एकसारखे लटपटत होते. शेवटीं बरीच रात्र झाली असें पाहून मनोहरानें एक टांगा बोलाविला आणि संतोबांची घरीं रवानगी करून दिली. गेल्या प्रकरणांत ते केव्हां आणि कशा स्थितींत घरीं आले याचा उल्लेख आलाच आहे.

संतोबांनीं हांक मारलेली स्वयंपाकघरांत स्पष्ट ऐकूं गेली. त्या आवाजावरून आपले पतिराज आज कोणत्या स्थितींत आहेत, हें भवानीबाईनें चटकन् ओळखलें. तिला वाटलें होतें कीं, आतां आपल्या पतीनें दारूचे व्यसन साफ सोडलें पण तिच्या दुर्दैवानें तिचा तो समज आज चुकीचा ठरला. तिच्या डोळ्यापुढें आतां पूर्वीची सर्व चित्रें स्पष्ट दिसूं लागली. इतक्यांत संतोबांनीं पुनः गर्जना केली. तेव्हां नाइलाजास्तव तिला बाहेर येऊन दरवाजा उघडावा लागला. संतोबा दारू पिऊन आले असतां आपण कसें वागावयाचें हें तिला चांगलें माहित होतें. त्याचप्रमाणें तिनें आतां आपलें वर्तन ठेविलें. संतोबांना आरडाओरड करण्याचा अवसर न देतां त्यांचा हात धरून स्वयंपाकघरांत आणिलें. आणि दरवाजा बंद करून घेतला. तेथें त्यांनीं थोडा वेळ बडबड केलीच परंतु भवानीबाईनें आपलें मौनव्रत कांहीं सोडलें नाहीं. शेवटी त्रासून संतोबांची स्वारी तेथेंच आडवी झाली. तितक्या अवधींत विमला दोनदां खालीं येऊन गेली. परंतु स्वयंपाकाच्या खोलीचा दरवाजा बंद आहे असें पाहून ती परत वर गेली. ह्या गडबडींत रात्रीचे अकरा वाजले. संतोबा दारूच्या निशेंत तेथें लोळत पडले होते, त्यांना तेथेंच पडूं देऊन

भवानीबाईनें ताट वाढून बाहेर आणिलें आणि विमलेला हांक मारिली.

" बाबा जेवले का ? " खालीं आल्यावर विमलेनें विचारलें, " ते आज कां रागावले आहेत ? "

" तूं आतां त्यांची चौकशी करीत बसूं नको, मुकाट्यानें जेऊन वर जा कशी ! आज त्यांच्या अंगांत आक्काबाईचा फेरा आला आहे समजलीस ! "

संतोबाच्या अंगांत अक्काबाईचा फेरा आणणारा मनोहरपंत मिशाळ आपल्या खोलींत स्वस्थ विचार करीत बसला होता. उद्यां बापुसाहेबाकडे गेल्यावर त्यांची संमति कशी मिळवावी याचा तो विचार करीत होता. तिकडे विमलनें धर्मांतर करूं नये म्हणून वाटेल तो प्रयत्न करण्याचा नरसिंगरावानें निश्चय केला होता, त्याचप्रमाणें इकडे विमला आपणास मिळावी म्हणून वाटेल तो प्रयत्न करण्याचा मनोहरानें निश्चय केला. दुसरा दिवस उजाडून संध्याकाळ केव्हां होते याची तो वाट पहात होता. पुष्कळ वेळ विचार केल्यावर बापुसाहेब आपल्या मागणीचा मोठ्या आनंदानें स्वीकार करतील, असें त्याला वाटूं लागलें. आणि त्या आनंदाच्या भरांत विमलेसंबंधीं सुखस्वप्नें अनुभवीत तो निद्रावश झाला. परंतु तो समजत होता तें भावी सुख देण्याचें ज्यांच्या हातीं होतें, त्यांची स्थिति आपण क्षणभर अवलोकन करूं या. बापुसाहेब त्यावेळीं दिवाणखान्यांत आरामखुर्चीवर विचार करीत पडले होते. नरसिंगरावाचा समाचार घेऊन आपल्या मुलीसह परत येत असतां वाटेंत त्यांनीं कमलेला तिच्या वर्तनाबद्दल बरेंच दूषण दिलें. परंतु त्या हेकेखोर मुलीनें बापाच्या भाषणाकडे बिलकुल लक्ष दिलें नाहीं. उलट कपाळाला आठ्या घालून अबोला मात्र धरिला. तिच्या ह्या वर्तनावरून आपण त्या दोघांच्या विवाहाचा जो विचार योजला आहे तो कितपत सिद्धीस जाईल अशी आतां त्यांना क्षणोक्षणीं शंका उद्भवूं लागली. शिवाय आज नरसिंगरावाच्या चौकशी-करितां ते गेले असतांना जो प्रकार दिसला त्यामुळें त्यांना आणखी एक नवीन काळजी उत्पन्न झाली. नरसिंगराव दूध पीत असतांना एकाएकीं तो बेशुद्ध झाला असतां विमलेची झालेली स्थिति त्यांच्या पूर्ण लक्षांत होती. या गोष्टीचा विचार करीत करीत ते स्वगत म्हणाले, " काय विलक्षण योगायोग आहे पहा ! मी मनांत योजून ठेवीत आहे काय आणि हा प्रकार पहा कसा विपरीत जुळून येत आहे. नरसिंगरावाला अपघात होऊन तो संतोबाच्या घरीं जावा आणि तेथें विमला असावी हा तरी चमत्कार नव्हे काय ! मीं पण

विमलेला इतक्यांतच मिशनमधून आणण्यास सांगितलें नसतें तर! पण तें व्हावं कसं! तिच्या आजच्या वर्तनावरून तिच्या अंतःकरणांत नरसिंगरावाविषयीं प्रमोद्भव झाला आहे खास! आज आठ दहा दिवसांच्या सहवासामुळें तसें होणें शक्य आहे. पण होत आहे हा प्रकार चांगला का? नाहीं— नाहीं विमले, हे दुर्दैवी पोरी! नरसिंगराव तुझ्याकरितां नाहीं. त्यानें कमलेबरोबरच लग्न केलें पाहिजे. पण ती लहरी आणि हट्टी पोर त्याला वळवून घेईल तेव्हां ना! आतां ह्याला काय तोड काढावी! काय विलक्षण दैवयोग तरी! याच संधीला त्याला अपघात तरी कसा झाला पहा! आणि तो दुसऱ्या तिसऱ्या ठिकाणीं न जातां अगदीं नेमका विमलेच्याच कसा दृष्टीस पडला. पण तें कांहीं नाहीं. त्याला आतां फार दिवस संतोबाच्या घरीं राहूं देणें चांगलें नाहीं. उद्यां डॉक्टराला विचारून त्याला येथें घेऊन येण्याची व्यवस्था केलीच पाहिजे. तो येथें आला म्हणजे कमला त्याच्या तैनातीला राहील म्हणजे हळुहळू परस्परांची स्वभाव ओळख होऊन शेवटीं सर्व कांहीं आपल्या मनाप्रमाणें जुळून येईल. पण पुढें विमलेची काय व्यवस्था करावी? ह्या पोरीनें मला मोठ्या संकटांत टाकलं आहे—"

विचारांचा स्फोट ज्वालामुखीसारखा आहे; एकदां सुरुवात झाली म्हणजे खंड म्हणून पडायचा नाहीं. बापुसाहेबांच्या विचारांचीही तीच स्थिति होती. नरसिंगरावाला आपल्या घरीं आणण्याचा विचार कायम झाल्यावर विमलेची पुढें काय व्यवस्था करावी, हा दुसरा विचार त्यांचें डोकें फिरवूं लागला. त्यांनीं पुष्कळ विचार केला, परंतु काय करावें अशी एकहि निश्चित गोष्ट त्यांना सुचेना. तिचें आतां लग्न करून टाकावें असा एक विचार त्यांच्या डोक्यांत आला, परंतु जातीची अडचण असल्यामुळें तिच्याबरोबर लग्न करण्यास तरी कोण तयार होईल, ही एक अडचण मध्यें होतीच. अशा रीतीनें विचार कर करून शेवटीं आपल्या पसंतीचा एकादा गरीब, पण चांगला मुलगा पाहून त्याला हजार पांचशें रुपये देऊन तिचें लग्न करावें, हा विचार त्यांनीं कायम केला. पण विमलेच्या प्रीत्यर्थ ते इतके पैसे खर्च करण्यास तयार होत आहेत. तेव्हां तिचा आणि त्यांचा काय बरें संबंध असावा?—हें एक मोठें गूढ आहे. आणि यालाच कादंबरी असें म्हणतात.

दुसऱ्या दिवशीं सायंकाळच्या सुमारास बापुसाहेब रात्रीं योजलेला उपाय अमलांत आणण्याच्या उद्देशानें संतोबाच्या घरीं जाण्यास तयार झाले.

डॉक्टराची परवानगी मिळतांच नरसिंगरावाला किंचित्‌हि त्रास न होईल अशा व्यवस्थेनें आपल्या घरीं आणण्याचा त्यांनीं विचार केला आणि त्याप्रमाणें दुपारींच त्यांनीं भोयांना सांगून डोली तयार करण्याचा हुकुमहि दिला होता. अशा रीतीनें तयारी करून बापूसाहेब उठणार इतक्यांत ' तुम्हाला कोणी भेटण्याकरितां आले आहेत ' असा नोकरानें येऊन निरोप सांगितला तेव्हां त्यांना थांबणें भाग पडलें. थोड्या वेळानें मनोहर मिसाळ आंत आला.

" मीं एका महत्त्वाच्या कामाकरितां आपणास भेटण्यासाठीं आलों आहें." खुर्चीवर बसल्यानंतर मनोहरानें बोलण्यास सुरवात केली. " माझें नांव मनोहर मिसाळ असून मला येथें डेपोंत दरमहा पन्नास रुपयांची नोकरी आहे. माझ्या संबंधानें कांहीं विशेष माहिती पाहिजे असल्यास आमच्या मिशन-चर्चचे रेव्हरन्ड साहेब आपणास देतील. मी ज्या कामाकरितां येथें आलों आहे तें काम महत्त्वाचें पण नाजुक आहे. आपली परवानगी मिळेल तर बोलतों." असें बोलून तो बापूसाहेबांच्या परवानगीची वाट पहात राहिला. तो आंत येतांच त्याच्या चेहऱ्यावरून बापुसाहेबांना थोडा संशय आलाच होता. परंतु त्यानें नांव व आपलें नोकरीचें ठिकाण सांगतांच संतोबानीं सांगितलेला तो हाच मनुष्य अशी त्यांची खात्री झाली. ते विचार करीत म्हणाले, " तुम्हीं कोणत्या कामाकरितां येथें आलां आहांत, तें मीं समजलों. परंतु माझ्या परवागीची काय आवश्यकता आहे ! आणि खरोखरीच माझ्या परवानगीची आवश्यकता आहे असें जर तुम्हांला मनापासून वाटलें असतें तर विमलेजवळ गोष्ट काढण्यापूर्वीच तुम्ही मजजवळ आलां असतां."

" आपल्या परवानगीची आवश्यकता आहेच. पण पूर्वीं येऊन विचारण्याविषयीं म्हणतां त्यांत कांहीं बिघडलं नाहीं. आमच्या ' एटिक्वेटस ' ( चालीरीती ) प्रमाणें विमलेला मी प्रथम विचारलें यांत कांहीं चुकलों नाहीं. कारण आमच्यांत तसा प्रघात आहे."

" तुमच्यांत म्हणजे काय ?"

" आमच्यांत म्हणजे इंग्लिश एटिक्वेटस् प्रमाणें—"

" असं असं ! एकूण तुम्ही अगदीं साहेबी धर्तीवर लग्न करणार तर ! पण काय हो, तुम्हीं बाटण्यापूर्वी तुमची जात कोणती होती ?"

" आतां त्या जातीशीं आपणांस काय करायचें आहे ! मी आतां नेटिव्ह ख्रिश्चन आहें."

" आतां तूं कोण आहेस तें मला कळलं ! पण पूर्वी तूं कोण महार होतास किं मांग होतास तें कळूं दे ! "

बापुसाहेब, अशारीतीनें एखाद्या ' जन्टलमन् ' चा पाणउतारा करणं—"

" अहा रे जन्टलमन् ! ही दारूची घाण येते आहे पहा त्या थोबाडाला ! मूळचा तूं झाडूवाला आणि आतां नेक्टायकॉलर लावल्या बरोबर झाला मोठा झाटलीमन् ! दारुड्या कुठला ! म्हणे तुमची परवानगी घ्यावयाला आलों आहें. परवानगी नाहीं पण पायपोस म्हणून येथून तुझी रवानगीच करतों—कोण आहेरे तिकडे ? ह्या दारूबाज जन्टलमनला धक्के मारून घराबाहेर घालवून द्या."

पुनः मनोहराकडे न पाहतां बापुसाहेब उठले. मनोहर त्यावेळीं रागानें इतका लाल झाला होता कीं, तो आतां कांहीं तरी अतिप्रसंग करील असेंच वाटत होतें. परंतु बापुसाहेबांच्या हुकुमाप्रमाणें त्याला घराबाहेर घालवून देण्याकरितां दोन नोकर आंत आले असल्यामुळें आपला सर्व राग गिळून त्याला मुकाट्यानें बाहेर पडावें लागलें. थोड्या वेळानें बापुसाहेबहि आपल्या गाडींत बसून संतोबाच्या घरीं आले. आज सर्व दिवसांत संतोबा घरांतून कुठेंहि बाहेर गेले नव्हते. इतकेंच नव्हें तर ते विमलेलाहि चुकवाचुकव करीत होते. आपण गेल्या रात्रीं दारू घेतली होती ही गोष्ट आतां त्यांना सारखी टोंचत होती. बापुसाहेब आले आहेत असें पाहून मात्र त्यांचा नाइलाज झाला. त्यांना पुढें यावेंच लागलें. परंतु बापुसाहेबांना त्यांच्या गेल्या रात्रीच्या वर्तनाचा मागमूसहि नसल्यामुळें त्यांनीं नुकतीच घडलेली सर्व हकिकत त्यांना सांगितली. आणि विचारलें, " विमलेचा आणि माझा संबंध आहे ही गोष्ट त्याला कशी कळली याचेंच मला आश्चर्य वाटतं संतोबा तुम्ही तर नाहींना त्याच्याजवळ कांहीं बोललांत ? "

" छे छे ! मी कशाला बोलूं ? मला तो त्या दिवसानंतर भेटला देखील नाहीं. पण काय हो बापूसाहेब, विमलेविषयीं तुमचा काय विचार ठरला आहे ? विषय बदलून संतोबांनीं विचारलें.

" तिच्याविषयीं मी एक उपाय योजला आहे आणि तो लवकरच अमलांत आणण्याचा माझा विचारहि आहे पण आज नरसिंगाची प्रकृति कशी आहे ? मी त्याला घरीं घेऊन जाण्याचा विचार केला आहे ! आतां इतक्यांत डॉक्टर येईल त्याला आतां मी हेंच विचारणार आहे. "

संतोबा विचारांत पडले. कारण नरसिंगरावाला तेथून नेण्यांत त्यांचा तोटा होत होता. त्याच्या औषधपाण्याचा सर्व खर्च बापुसाहेबच करीत होते. तरी देखील त्याच्या नांवानें 'हें पाहिजे तें पाहिजे' असें सांगून संतोबांनीं गेल्या आठ दहा दिवसांत बापुसाहेबांकडून पांच पन्नास रुपये काढले होते. नरसिंगरावाला आपल्या घरून नेल्यास आपली ही प्राप्ति बंद होईल अशी संतोबाला साहजिकच चिंता पडली. परंतु त्यांना उघड कांहींच बोलतां येईना. ते म्हणाले, "पहा बुवा! डॉक्टरसाहेब सांगत असले तर त्याला घेऊन जा. मी नाहीं म्हणत नाहीं. पण तुमच्या घरीं त्याच्या तैनातीला कोण राहील? विमलेला देखील नेणार कीं काय?"

"छे—तिला तर न्यावयाची नाहींच! मी ह्या नरसिंगाला येथून नेणार याचें कारणच जर मुळीं ती, तर मग तिला मी कशी नेणार? मी नरसिंगाबद्दल पुढें ठरविलेला विचार तुम्हांला माहिती आहेच. तेव्हां विमलेला आतां त्याच्या जवळ राहूं देणें धोक्याचें आहे. ह्या आठ दहा दिवसांच्या त्याच्या निकट सहवासामुळें पुढें कांहीं गोंधळ उपस्थित होऊं नये म्हणजे झालं!"

बापुसाहेबांचें भाषण ऐकून संतोबांना थोडें बरें वाटलें नरसिंगरावाला नेण्यानें त्यांचा तोटा होणारच होता पण त्याच्याबरोबर विमलेलाहि त्यांनीं नेलें म्हणजे तिच्याकरितां त्यांना मिळत असलेले वीस रुपयेहि बंद होणार ही त्यांना भीति पडली होती. परंतु दैव कांहीं त्यांना अगदींच प्रतिकूल नव्हतें. थोड्या वेळानें बापूसाहेब वर आले. त्यावेळीं विमला नरसिंगरावाच्या बिछान्याजवळ खुर्चीवर बसली होती आणि तो तिला कांहीं सांगत होता. बापुसाहेब आलेले पाहून विमला उठली. ती त्याच्या अगदीं जवळ बसून काय गोष्टी करीत होती, त्या समजाव्या अशी बापुसाहेबास साहजिकच जिज्ञासा उत्पन्न झाली. त्यांनीं नरसिंगरावाची चौकशी करून विचारलें, "कायरे नरसिंगा! काय इतक्या तुमच्या गोष्टी चालल्या होत्या? मला कळतील का?"

"कांहीं नाहीं. मी विमलाबाईना थोडी आपल्या धर्माची माहिती करून देत होतों. पण मामा तुम्हीं पुस्तकं आणलीं काय?"

"होय आणलीं आहेत. तीं खालीं ठेविलीं आहेत तीं घेऊन ये पाहूं वर." विमलेकडे पाहून बापुसाहेब म्हणाले.

"मी तीं धार्मिक पुस्तकं मागविण्याचं कारण आलं का तुमच्या लक्षांत मामा! ती मिशनरीबाई येथें येत असते ना! तिचा उद्देश कांहीं तरी

निराळा असावा अशी मला परवां त्यांचा संवाद ऐकून शंका आली." असें म्हणून नरसिंगरावानें ती सर्व हकीकत सांगितली. तेव्हां बापुसाहेब म्हणाले, "असं असेल तर त्या मिशनरीबाईला येथें येण्याचं मी बंद करतों."

"नका. तसं करण्यांत तिला वाईट वाटेल. मी ह्या गोष्टीचा पूर्ण विचार करून असं ठरविलं आहे कीं, जेव्हां ती बाई येथें येईल तेव्हां आपल्या समक्षच त्यांना जी प्रार्थना करावयाची ती करावयास सांगून इतर गोष्टी करण्यास त्यांना अवसरच द्यावयाचा नाहीं. आणि तोंपर्यंत विमलाबाईला आपल्या धर्माचं खरं महत्त्व सांगावयाचं. विमलाबाई तैलबुद्धीच्या आहेत, तेव्हां एकदां त्यांना आपला धर्म कळल्यावर त्यांच्याकडून धर्मांतर होण्याची भीति बाळगण्याचं कांहीं कारण नाहीं."

"तूं हें सर्व योजिलें आहेस तें ठीकच आहे. पण आज तुला येथून घरीं नेण्याचा मीं विचार केला आहे—" बापुसाहेबांचें वाक्य पुरें होत असतां डॉक्टर आणि त्यांच्यामागून पुस्तकें घेऊन विमला आंत आली. डॉक्टरानें नरसिंगरावाची प्रकृति नीट तपासून पाहिली आणि डोक्यावरील पट्टा सोडून जखम बांधण्यास सुरवात केली. विमला जवळच डॉक्टरास 'काय पाहिजे–नको' तें देण्यास उभी होती. थोड्या वेळानें जखमा धुवून बांधून झाल्यावर बापुसाहेबांनीं डॉक्टरास शेजारच्या खोलींत नेलें आणि आपला मनोदय कळविला.

"आणखी आठ दहा दिवस ही गोष्ट काढूं नका." डॉक्टरसाहेब म्हणाले, "तुम्ही कितीहि काळजीपूर्वक त्याला येथून नेण्याची व्यवस्था केली तरी त्रास होणारच! काल त्याला थोडा त्रास होतांच काय प्रकार घडला तो तुम्ही पाहिलाच आहे. तो लवकर बरा व्हावा अशी जर तुमची इच्छा असेल तर अशी तुम्हीं घाई करूं नये."

बापुसाहेबांना गप्प राहणेंच भाग पडलें. त्याना थोडें वाईटहि वाटलें, परंतु नरसिंगराव आणखी कांहीं दिवस आपल्या घरून जात नाहीं हें ऐकून संतोषला मात्र आनंद झाला. तो आहे तोंपर्यंत आपणास बापुसाहेबांकडून कांहीं रक्कम उकळतां येईल अशी त्याची खात्री होती. डॉक्टर निघून गेल्यावर बापुसाहेब पुनः आंत येऊन बसले. त्यांना आतां बोलण्याकरितां विषयच नव्हता. परंतु बराच वेळ स्तब्ध बसल्यानंतर ते म्हणाले, "तुला आणखी कांहीं दिवस येथेंच राहिलं पाहिजे असं डॉक्टराचं मत आहे. माझी इच्छा होती कीं तुला घरीं न्यावं तें कांहीं जुळत नाहीं. तुला येथें कंटाळा आला

असेल हें मी जाणून आहें. पण त्याला नाइलाज आहे."

"कंटाळा कसला ! उलट एखाद्या हॉस्पिटलमध्यें जाऊन पडलों असतों तर मात्र मला खात्रीनें त्रास झाला असता. पण येथें विमलाबाई आहेत आणि आतां मात्र आम्हाला बोलायला विषयही मिळाला आहे. तेव्हां कंटाळा येण्याचं काय कारण ?"

"कोणता विषय मिळाला आहे ?"

"हा धर्मासंबंधीं !

हा विषय त्यांच्यांत निघाला असतां ह्या विषयाची मूळ उत्पादक ती मिशनरीबाई आपल्या नियमाप्रमाणें विमलेसह सायंकाळची प्रार्थना करण्याकरितां आली. तिच्याकडे पाहून बापुसाहेब म्हणाले, "या बाई, तुम्ही अगदीं वेळेवर आलांत ! परवां तुम्ही विमलेला धर्मासंबंधीं कांहीं विचारलें, त्यावरच आतां आमच्या गोष्टी निघाल्या आहेत. तुम्ही विमलेला आकाशांतील बापाला शरण जाण्यास सांगतां याचा अर्थ काय ? तुम्ही तिला खिश्चन करणार कीं काय ?"

बापुसाहेबांनीं अकल्पित रीतीनें एकदम विचारलेला प्रश्न ऐकून मिशनरीबाई गोंधळली. ह्या बिकट प्रश्नाचं उत्तर देण्याची तिची तयारी नव्हती. इतकेंच नव्हे तर तिच्या अंगांत तितकें सामर्थ्यहि नव्हतें. केवळ शब्दजाल पसरून आपला कार्यभाग साधावा एवढी विद्या तिला ठाऊक होती. आतां आपल्या अंगावर बाजू उलटणार हें ती जाणून होती, तथापि मनाचा हिय्या करून ती म्हणाली, "आमच्या आकाशांतील प्रभूला शरण गेल्यानें मनाला पूर्ण शांती मिळेल."

"आणि आमच्या तेहतीस कोटी देवापैकीं कोणत्याही एका देवाला शरण गेल्यानें, त्याची भक्ति केल्यानें आम्हाला शांति मिळत नाहीं, असें आपलें म्हणणें आहे कीं काय ?" बापुसाहेबांनीं विचारलें,

"तुमचे हे तेहतीसकोटी दगडाचे देव काय शांति देणार ? तुमच्या ह्या देवांची स्थिति म्हणजे 'वरच्या देवाची तुटली दोरी, खालचा देव बोंबा मारी' अशापैकीं आहे."

"एकूण आमच्या मूर्तिपूजेवर तुमचा कटाक्ष आहे तर !" नरसिंगराव म्हणाला, "परंतु मी तुम्हाला असं विचारतों कीं, तुम्ही देखील मूर्तिचीच पूजा नाहीं का करीत ?"

" नाहीं. आम्ही आमच्या आकाशांतील प्रभूची प्रार्थना करतों."

" तो आकाशांतील प्रभू कसा आहे हें तुम्हीं सांगूं शकाल काय? तुम्ही प्रार्थनेकरितां डोळे मिटतां तेव्हां तो आकाशांतील प्रभू तुम्हास कसा दिसतो तें आम्हांला सांगा पाहूं!"

" तें कसं सांगतां येईल?"

" नाहींच सांगतां येणार. म्हणूनच तर आम्ही ही मूर्तिपूजा करतों. आम्ही राम, कृष्ण, विठ्ठल, पांडुरंग वगैरे नांवांचा जयघोष केलेला तुम्हीं ऐकला म्हणजे तुमच्या कपाळाची शीर उठते. आमची मूर्तिपूजा म्हणजे शुद्ध धर्म-भोळेपणा आहे आणि आम्ही मूर्तिपूजा करणारे निव्वळ मूढ आणि अप्रबुद्ध आहोंत, अशी तुमची ठाम समजूत झालेली आहे. पण मूर्तिपूजा करावयाची नाहीं तर डोळे मिटून प्रार्थना तरी करावयाची कोणाची! आकाशातील बाप कसा आहे हें जर तुम्हांला ठाऊक नाहीं तर डोळे मिटून तुम्ही प्रार्थना कोणाची करतां! तुम्ही म्हणतां देव आकाशांत आहे. पण आम्ही म्हणतो देव हा येथें—आपल्याजवळ, आपल्या हृदयांत, नव्हे प्रत्यक्ष आपणच देव आहोंत. पण हें बिकट तत्त्व तुम्हाला कसं कळावं! तुमच्या भौत्तिक शास्त्राला हें तत्त्व अगम्य आहे ह्या तत्त्वाचा विचार करावयाचा म्हणजे आमच्या वेदांतांतच शिरलें पाहिजे. कारण तुम्ही म्हणतां तशीं ईश्वराची कल्पना नसून ह्या सर्व ब्रह्मांडाची उत्पत्ति, स्थिति आणि लय जिच्या केवळ संकल्पानें—इच्छामात्रेंकरून होतो, जी सर्व चराचराला अधिष्ठानभूत आहे, अशा दिव्य आणि अनिर्वचनीय शक्तीलाच ईश्वर असे म्हणतात. ईश्वर सर्व-साक्षी, सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ, सर्वव्यापी, षड्व्यापी, षड्गुणैश्वर्यसंपन्न वगैरे अनंत गुणांनीं युक्त आहे. परंतु तो सगुण म्हणजे सर्वसाक्षी आणि विश्वरूप असूनही निर्गुण आणि निराकार आहे. तो आकाशांत आहे ही तुमची कल्पना ईश्वराचें सर्वव्यापित्व स्थापून तो सगूण आहे हें सिद्ध करते आणि प्रार्थनेकरितां डोळे मिटले असतां तो तुम्हांला दिसत नाहीं यावरून तो निराकार आणि निर्गुण आहे, हें सिद्ध होतें. आतां आम्ही मूर्तीपूजा कां करतों, या करितां एक उदाहरण घेऊन मी तुमचें समाधान करतो. समजा, आपल्याला धन पाहिजे असेल, तर तें ज्याच्यापाशीं आहे अशा धनवान्—श्रीमान् मनुष्याची आपणाला प्रार्थना किंवा सेवा केली पाहिजे. कारण धनप्राप्तीचा हाच राजमार्ग आहे. नुसत्या धनाची अव्यक्त कल्पना—तिच्या नांवानें कितीहि

कंठशोष केला तरी—आपणाला कालत्रयींहि फलद्रूप होऊं शकणार नाहीं. धन हें जड असल्यामुळें आपली उपासना करणाऱ्या भक्ताकडे पाहण्याचें किंवा ऐकण्याचें सामार्थ्य त्याच्यामध्यें नाहीं. कारण, पहाणें किंवा ऐकणें हे धर्म चेतनाचे आहेत; अचेतनाचे नव्हेत. अशा स्थितींत हें जड द्रव्य उपासकाकडे पाहूं शकत नाहीं आणि त्याची प्रार्थना ऐकूं शकत नाहीं इतकें दुबळें आहे. पण धनवंताची मनधरणी करून त्याचें मन वळविलें, किंवा नोकरी करून त्याची कृपा संपादन केली तर तो आपणास धन देईल. हाच दृष्टांत परमार्थाच्या बाबतींत पूर्णपणें लागू आहे. ब्रह्मज्ञान, ज्याला तुम्हीं शांति म्हणून म्हटलं आहे, आणि आतां मी सांगितलेल्या उदाहरणांत ज्याला धन म्हणून म्हटलं आहे, तें ज्याच्यापाशीं आहे असा जो ईश्वर—भगवान् त्याची भक्ति करणें हें त्या ब्रह्मज्ञान लाभाचें किंवा शांतीलाभाचें अथवा धनलाभाचें एकच साधन आहे."

"पण त्या दगडाच्या मूर्तींत हें तुम्ही म्हणतां असं सामर्थ्य आहे काय?"

"अर्थात् आहे. मूर्तिपूजा करणारा मनुष्य मूर्ति म्हणजेच ईश्वर; अशा भावनेनें त्याची पूजा किंवा भक्ति करीत नाहीं. ती मूर्ति केवळ दृष्टिसौंदर्या-करितां असते आणि त्याच्याद्वारें तो ईश्वराची भक्ति करतो. हें मूर्तिपूजेचें रहस्य न कळून तुम्ही ह्या वेड्यासारख्या शंका काढितां. जे लोक आमच्या मूर्तिपूजेला नांवें ठेवितात, मूर्तिपूजकांची निंदा करितात आणि सगुण भजनाचा उपहास करितात अशा लोकांना निराकाराची उपासना करण्याचा अधिकारच नाहीं. वास्तविक हेच लोक जगांतील कोणत्याही पदार्थावर किंवा विषयावर म्हणजे अर्थात् मुर्तीवरच आसक्त झालेले असतात आणि इकडे आमच्या ईश्वराच्या मूर्तिपूजेला नांवें ठेवितात हें निंद्य नाहीं काय? बाई, तुम्हांला जर तुमच्या आकाशांतील बापाची शपथ घालून विचारलें तर तुम्ही असं सांगूं शकाल का, कीं तुमचं कोणत्याहि वस्तूवर प्रेम नाहीं म्हणून!"

"असं कसं होईल?"

"मग झालं तर. ती वस्तु म्हणजे मूर्तीच नव्हे काय? अशा ह्या जड वस्तूवर प्रेम करण्यापेक्षां प्रत्यक्ष ईश्वराची कल्पना करून त्या मूर्तीची आम्हीं पूजा केली तर त्यांत तुम्हांला हसण्यासारखें काय आहे?" इतकें बोलून नरसिंगरावानें एक मोठा श्वास सोडला. त्याला ह्या भाषणानें श्रम झाले असें दिसूं लागलें. तें पाहून विमला हळूच म्हणाली, "आज तुम्ही हें किती

बोलतां ! काल तुम्हांला बोलण्याचे थोडे श्रम झाले ते सहन झाले नाहींत आणि आज तर तुम्ही केव्हांपासून एकसारखें बोलत अहांत. ”

विमलेचें बोलणें बापुसाहेबांनाहि पटलें.



## ८ पुढली तयारी

**सर्पाच्या** शेपटावर पाय दिला असतां जसा त्याचा फूत्कार चालतो, तशी स्थिति मनोहर मिसाळाची झाली होती. बापुसाहेबांनीं त्याला झिडकारून त्याचा पाणउतारा केल्यामुळें तो जवळजवळ देहभान विसरून गेला होता. घरीं येईपर्यंत त्याच्या डोक्यांत बापुसाहेबांचा सूड उगविण्याविषयीं शेंकडों विचार येऊन गेले. त्यांच्या पवित्र शास्त्रांतील ‘ शेजाऱ्यावर—आपल्या शत्रूवर प्रीति कर ’ ह्या पवित्र आज्ञेचें त्याला जर त्यावेळीं एखाद्या रेव्हरन्ड साहेबांनीं स्मरण करून दिलें असतें, तर त्यानें प्रथम त्या रेव्हरन्ड साहेबाचीच बत्तिशी रंगविली असती. मग इतरांची काय कथा ! तो बापुसाहेबांच्या सूडास प्रवृत्त झाला, यांत विशेष नवल मानण्याचें कारण नाहीं. कारण क्षुद्राचे विचार नेहमीं क्षुद्रच असावयाचे ! कडु कारलें साखरेंत घोळून तुपांत तळलें तरी तें कडूच ! मनोहरानें सर्व जगावर प्रीति करावयास सांगणाऱ्या येशूख्रिस्ताच्या धर्माची दीक्षा घेतली तरी त्याच्या हीन कुलाचा मूळ संस्कार बदलणार आहे थोडाच ! बापुसाहेबांच्या सूडाचा विचार करितां करितां त्याच्या विचारांची मजल येथवर जाऊन पोंचली कीं, आत्तांच्या आतां परत जाऊन बापुसाहेब मिळतील तेथें त्यांचा खून करावा. आणि आज जर त्याच्या डोक्यांत आकाबाईचा पूर्ण अम्मल असता तर त्यानें ह्या भयंकर व अमानुष विचाराला अमलांत आणण्यासहि मागेंपुढें पाहिलें नसतें इतका तो भयंकर वृत्तीचा माणूस होता.

विमलेनें अद्यापि बाप्तिस्मा घेतला नव्हता. आणि ह्यापुढें ती बाप्तिस्मा घेईल असेंहि त्याला वाटेना. ती आतां बहुतकरून त्यांच्या घरांत अपघात होऊन पडलेल्या तरुणाच्या गळयांत पडेल असेंच त्याला वाटूं लागलें. हा एक त्याला नवीन प्रतिस्पर्धी उत्पन्न झाला. विमला बाटलेली आहे, अशी जर आपण कंडी पिकविली तर कदाचित् नरसिंगराव तिचा नाद सोडून देईल

आणि आपला कार्यभाग साधेल असें वाटून तो त्या गोष्टीचा विचार करूं लागला. ती बाटलेली आहे असें लोकांत जाहीर झाल्यावर संतोबा तिला घरांत ठेवणार नाहीं. म्हणजे ती पुनः मिशनमध्यें येईल व मग आपणास मिशनच्या मंडळीच्या सहाय्यानें प्रयत्न करण्यास ठीक पडेल. अशी त्यानें भावी कार्याची रूपरेखा आंखली. परंतु कांहीं वेळानें त्याच्या मनांत शंका उद्भवूं लागल्या. आपण पिकविलेल्या कंड्या लोकांना कितपत पटतील, तें आधाराशिवाय ह्या गोष्टीवर विश्वास ठेवतील काय, आणि विश्वास जरी ठेवला तरी संतोबा तिला घरांतून काढून लावतील काय, अशा अनेक शंका उद्भवून तो पुनः विचार करूं लागला. जवळ जवळ दोन तास ह्या विचारांत आपल्या खोलींत येरझारा घालीत होता. शेवटीं त्याचें डोकें अगदीं भणभणून गेलें; तेव्हां डोक्याला शांतता आणण्याच्या उद्देशानें त्यानें नोकराला हांक मारिली आणि डेपोंतून एक दारूची बाटली मागविली.

ग्लासांत दारू ओततांना त्याला एक विचार सुचला. तो स्वतःशीं म्हणाला, "अशा कंड्या पिकवून लोक त्यावर विश्वास ठेवणार नाहींत. कोणातरी अधिकारी मनुष्याकडूनच हें झालें पाहिजे. आणि असा अधिकारी मनुष्य कोण पहावा ? आमच्या मिशनमध्यें साहेबांना शिकविण्याकरितां तो एक शास्त्री येत असतो त्या शास्त्र्याला हाताशीं धरलं म्हणजे माझं काम होईल. असें म्हणून त्यानें ग्लासांत ओतलेली दारू पुनः बाटलींत ओतली आणि शास्त्रीबुवाकडे जाण्याची तयारी केली. ह्या शास्त्रीबुवांचें नांव शिवरामशास्त्रीमहामुनी असें होतें. त्यांचें ज्ञान अकोटोविकट होतें तथापि मिशनच्या साहेबांना 'श्रीगणेशा' शिकविण्याइतकी त्यांना अक्कल होती खास ! शास्त्रीबुवांना ही नोकरी लागेपर्यंत त्यांनीं फेरीवाल्यापासून तो पेढीवाल्यापर्यंत आणि भिक्षुकीपासून तो थेट कारकुनीपर्यंत छप्पन धंदे केले होते. पण अलीकडे सहा महिन्यापांसून ही 'शास्त्रीबुवा' ची पदवी मिळाल्यापासून त्यांचा चांगला जम बसला होता.

मनोहर त्यांच्या घरीं गेला त्यावेळीं शास्त्रीबुवा नुकतेच जेवण आटोपून उद्यां साहेबाला काय शिकवायचें त्याचा विचार करीत बसले होते. मनोहर एकदम आंत आलेला पाहून शास्त्रीबुवा रागानें म्हणाले, "अहो हा काय भ्रष्टाकार मांडला आहे ! एकदम न विचारतां तुम्ही ब्राह्मणाच्या घरांत शिरलां तेव्हां तुम्हाला आतां काय म्हणावें ?"

" नाहीं—चुकलों. पण शास्त्रीबुवा मी तुम्हाला हें देण्याकरितां आलों होतों—" असें म्हणून मनोहरानें खिशांतून एक रुपया काढला आणि शास्त्रीबुवांच्या पुढें ठेविला.

" असं असं ! बसा. " रुपया पाहून शास्त्रीबुवांचा राग एकदम शांत झाला. त्यांनीं मनोहराला अगदीं आपल्या जवळ बसविलें आणि विचारलें, " कां बरं ? हा रुपया कशाबद्दल ? "

" माझं एक काम आहे शास्त्रीबुवा. एवढं काम जर तुम्ही करून द्याल तर मी तुम्हांलां अगदीं खुष करून सोडीन. "

" पण काय काम आहे तें तर सांगा. मग पाहूं पुढला विचार. "

मनोहरानें विमलेविषयीं सर्व सांगून आपण तिच्या मागणीकरितां बापूसाहेबाकडे गेलों असतां तेथें घडलेला प्रकार क्रमाक्रमानें सांगितला आणि त्यावर आपण योजलेली युक्तिहि सांगितली. तेव्हां शास्त्रीबुवा थोडा वेळ विचार करून म्हणाले, " मी तुमचं हें काम करतों—अगदीं सोळा आणे काम करतों. आणि त्या बरोबरच ह्या बापुसाहेबांहि चांगलं पेचांत आणतों पण—पण—"

" आतां पण आणि परंतु नको. काय बोलायचं असेल तें स्पष्ट बोला. मी ह्या कामाबद्दल तुम्हालां दहा रुपये देईन. "

" छे छे ! अगदींच थोडी रक्कम ही, माझ्या श्रमाच्या मानानं—म्हणजे अद्यापि तुम्हाला कल्पना नाहीं कीं, ह्या बाबतींत मला काय काय श्रम पडतील ते ! अहो ! मी हें काम स्वतः नाहीं करणार ! आणि मी करून तरी ' विमला बाटलेली आहे, ह्या गोष्टीवर विश्वास कोण ठेवणार ! "

" मग तुम्ही दुसरे कोणते श्रम करणार ? "

" ते तुम्हाला आतांच सांगून काय उपयोग ! "

" नाहीं. आतांच सांगा. म्हणजे तुम्हाला काय द्यायचं तेंहि मी आतांच ठरवून टाकतों. बोला— "

" हें पहा, एका दगडांत दोन पक्षी मेले तर तें खरं काम ! म्हणून म्हणतों, तुम्ही मला पंचवीस रुपये द्या म्हणजे मी आतांच लागतों त्या उद्योगाला. "

तें सर्व खरं, पण तुम्ही काय करणार तें कळून माझं काम झाल्याशिवायच मी तुम्हाला पैसे कसे देणार ? "

" काम तर होणारच ! त्याबद्दल तुम्ही बेफिकीर असा. विमला बाटलेली

आहे असं ठरून शिवाय बापुसाहेबांचाहि तुम्हाला सूड घ्यावयाचा आहे ना ? मग काढा तर पैसे ? शास्त्रीबुवा कांहीं कच्चे नव्हते. त्यांनीं एक सोळा आणे युक्ति शोधून काढिली होती. परंतु हातांत पैसा पडल्याशिवाय तोंडांतून एक शब्दहि काढावयाचा नाहीं असा त्यांनीं त्याचवेळीं निश्चय केला. शेवटीं बराच वेळ भवति न भवति होऊन मनोहरानें खिशांतून एक दहा रुपयांची नोट काढिली आणि ती पुढें करून म्हटलें, " शास्त्रीबुवा, आतां माझ्याजवळ इतकेच आहेत. इतके घ्या, आणि तुम्ही काय करणार तें सांगा. मग उद्यां ह्याचवेळीं मी बाकीची रक्कम घेऊन येईन. "

" मग घ्या तर शपथ—तुमच्या येशूख्रिस्ताची शपथ घ्या. "

मनोहरनें शपथ घेतल्यावर शास्त्रीबुवा म्हणाले, " हें पहा, आतां मी आमच्या श्रीमत् शंकराचार्यांना एक अर्ज करतों आणि त्या अर्जांत ही विमला बाटलेली असून तिच्याबरोबर पालनपोषणाचा व्यवहार बापुसाहेबांनीं ठेविला आहे असें लिहितों, म्हणजे श्रीकडून त्या दोघांनाहि जातिबहिष्कार घातला जाईल. अशा रीतीनें आमच्या आचार्यांकडून आज्ञापत्र आल्यावर कोणाला तोंडावाटे ब्र देखील काढतां यावयाचा नाहीं आणि तुमच्या अगदीं मनासारखें सर्व कांहीं जुळून येईल. का—आहे कीं नाहीं सोळा आणे युक्ति ? "

" छान ! छान ! शास्त्रीबुवा, तुम्हीं अगदीं बेमालूम युक्ति शोधून काढिली यांत शंकाच नाहीं. "

" पण उद्यां राहिलेली रक्कम देणार ना आणून ? "

" त्याची तुम्हांला काळजी नको. पण हें पत्र केव्हां लिहिणार ? "

" आतां—हा आतां बसतोंच ना लिहायला. "

ते दोघे उपद्यापी ज्या व्यक्तीला शंकराचार्यांकडून बहिष्कार घालण्याकरितां संगनमत करून तेथें बसले होते ती आमची कथानायिका त्यावेळीं नरसिंगरावाच्या बिछान्याजवळ बसून आद्य श्रीशंकराचार्यांचीच कथा लक्ष देऊन ऐकत होती. आज संध्याकाळच्या नरसिंगरावानें केलेल्या भाषणानें फार मोठी कामगिरी बजाविली होती. त्यानें मिशनरीबाईला निरुत्तर तर केलेंच पण विमलेच्या मनावर फारच अनुकूल परिणाम झाला. आपला धर्म अशा उदात्त तत्त्वांनीं भरलेला असा असेल अशी तिला कल्पना देखील नव्हती. आजपर्यंत मिशनमध्यें तिनें धर्मशास्त्राचें एकच—नवा करार हें पुस्तक वाचलें होतें. त्या पुस्तकांतील ' लूकालिखित शुभवर्तमान ' ' योहानलिखित शुभवर्त-

मान ' ' मार्कलिखित शुभवर्तमान ' इत्यादि अनेक शुभवर्तमानांची ती बोजड भाषा वाचून ती कंटाळली होती. तथापि तें पवित्र शास्त्र आहे म्हणूनच त्या पुस्तकाचा अव्हेर न करितां ती तें वाचीत असे. आज मात्र ती निराळीच सृष्टी पाहूं लागली. मिशनमध्यें असतांना हिंदुधर्मांची आणि देवतांची हेटाळणी करितांना तिनें कैक वेळां ऐकली होती. परंतु आज नरसिंगरावाच्या थोड्याशा भाषणानें हिंदुधर्माविषयीं तिचें इतकें उच्च मत झालें कीं, आपण हिंदु आहोंत ही तिला आठवण होतांच अभिमानानें तिचें हृदय कंपायमान होऊं लागलें. आज त्यांच्या श्री आद्य शंकराचार्यांच्या गोष्टी निघण्याचें कारण नरसिंगरावानें गीता हातांत घेतली आणि तिचें तो विमलेला महत्त्व सांगूं लागला. तो म्हणाला, मामांनीं हीं पुस्तकें आणिलीं आहेत. त्यांपैकीं हें महाभारत तुम्ही वाचा. हा भारतवंशाचा इतिहास आहे. पूर्वी दुष्यंत नांवाचा महा पराक्रमी राजा होऊन गेला. त्याला शकुंतलेपासून भरत हा पुत्र झाला. ह्या राजाची कथा मी तुम्हांला केव्हां तरी सांगेन. ह्या राजाचा पुत्र भरत आणि त्याचे वंशज यांजपासून हिंदुस्थानाला भारत असें नांव प्राप्त झालें. ह्या इतिहासाचा मुख्य विषय कौरव पांडवांचें महायुद्ध हा आहे. त्यावेळीं भगवान् श्रीकृष्ण आणि अर्जुन यांचा संवाद झाला तीच ही भगवद्गीता. ह्या ग्रंथासारखा दुसरा ग्रंथ भरतभूमींत अजून निर्माण झाला नाहीं. आपला हा अत्यंत पवित्र आणि परमपूज्य ग्रंथ आहे. आपणांत एक म्हण आहे कीं, ' लहान मूर्ति आणि मोठी कीर्ति ' तसाच प्रकार ह्या ग्रंथाचा आहे. हा ग्रंथ दिसायला इतका लहान आहे पण हा विश्वग्रंथ आहे. ह्या लहान दिसणाऱ्या ग्रंथावर मोठमोठ्या विद्वानांनीं लिहिलेले दुसरे प्रचंड ग्रंथ पाहून तुम्हाला आश्चर्य वाटेल. हे जे अनेक ग्रंथ आहेत त्यापैकीं हल्लीं उपलब्ध असलेला पहिला ग्रंथ म्हणजे शंकराचार्यांचें भाष्य होय."

अशा रीतीनें शंकराचार्यांचें नांव निघून नरसिंगरावानें श्रीशंकराचार्य कोण, त्यांनीं दिग्विजय कसा लाविला, धर्ममठ कसे स्थापन केले इत्यादि माहिती सांगितली. विमला लक्षपूर्वक सर्व गोष्टी ऐकत होती. शेवटीं ती म्हणाली, " आज आपण मला नवीन जीवन दिलें. आजपर्यंत मी आपल्या पूज्य-धर्माविषयीं अगदीं अज्ञातवासांत होतें. हिंदुधर्म म्हणजे आमच्या मिशनमध्यें एक टवाळकी करण्याचा विषय होता. पण मला आतां अगदीं उलट वाटूं लागलें. हिंदुधर्माच्या पासंगालादेखील ख्रिस्तीधर्म पुरावयाचा नाहीं. ',

" छे ! अशी वेडी समजूत करून घेऊं नका. धर्म म्हटला म्हणजे तो येथून तेथून सारखाच आहे. आपण हिंदु आहोंत म्हणून आपण आपल्या धर्माचा अभिमान धरावा. ख्रिश्चननें ख्रिस्तीधर्माचा अभिमान धरावा; मुसलमानानें इस्लामी धर्माचा अभिमान धरावा. कारण धर्म ह्या शब्दाची व्याख्या फार मोठी आहे."

" पण प्रभु येशूनें धर्माच्या दहाच आज्ञा सांगितल्या आहेत." विमला मध्येंच म्हणाली.

" होय. त्याही धर्माच्याच आज्ञा आहेत. चोरी न करणें, खोटें न बोलणें, वडिलास मान देणें इत्यादि सर्व धर्माच्याच आज्ञा आहेत. ह्या आज्ञा ख्रिश्चन धर्मातच काय पण जगांतील निरनिराळ्या प्रत्येक धर्मांत आहेत. परंतु धर्म ह्या शब्दाची शास्त्रीय व्याख्या फार मोठी आहे आणि व्यापक आहे."

" मला समजेल काय ?"

तुम्ही समजून घेण्याचा प्रयत्न केल्यास का समजणार नाहीं ? मीं समजावून देण्याचा प्रयत्न केला तर तुम्हाला सहज समजेल. प्रथम धर्माचा उगम कशापासून झाला हें तुम्हांला समजलें पाहिजे. जें नेत्रादि इंद्रियांनीं पाहिलें जात नाहीं, मनानें ज्याचें मनन होऊं शकत नाहीं, परंतु, जें या सर्वांना आपआपल्या क्रिया करण्याला समर्थ करतें, त्याला ब्रह्म असें म्हणतात. आणि हें ब्रह्म जाणण्याच्या कोणत्याहि मार्गाला धर्म असें म्हणतात."

" इतका हा कठीण अर्थ आमच्या बाईंना तरी समजला असेल काय ! मला तर यांतील कांहींच कळलं नाहीं."

" कांहीं नाहीं कळलं ?" किंचित् हास्य मुद्रा करून नरसिंगरावानें विचारलें. " बरं तर मी उघड करून सांगतों. हें पहा, आतां अशी कल्पना करा कीं, आपण एका उंच टेकडीवर उभे आहोंत आणि सभोंवार पहात आहोंत. हे जें कांहीं आपण पहात आहोंत आणि जें आपल्या इंद्रियांच्या द्वारान आपणास जाणतां येतें, त्याला आपण विश्व असें म्हणतों. आतां ह्या खिडकीजवळ उभे राहून तुम्ही पाहूं लागाल तर विश्वांतील अत्यंत दूरचे तारे देखील तुमच्या दृष्टीस पडतील. ह्या ताऱ्यांचें अस्तित्व दृष्टीनें आपणास जाणतां येतें पण दुसरे असे कित्येक तारे आहेत कीं, ते आपल्या दृष्टिपथांत अद्याप आलेले नाहींत. त्यांचें अस्तित्व आपण मनानें व बुद्धीनें जाणूं शकतों. गणिताच्या योगानें अशा ताऱ्यांचें अस्तित्व व त्यांच्या गती यांचें ज्ञान आप-

प्राप्त होऊं शकतें. हें सर्व दृश्य विश्वाविषयीं झालें, पण अदृश्य स्थिति ही इंद्रियांच्या आटोक्याबाहेरील स्थिति आहे. या अज्ञात आणि अज्ञेय स्थितीचें जें ज्ञान त्यांतूनच धर्मांची उत्पत्ति झाली आहे. आपल्या या जगांत ज्या ज्ञानाला आपण धर्म अशी संज्ञा दिली आहे, तें ज्ञान याच अज्ञेय व अज्ञात स्थितींतून प्राप्त झालें आहे."

इतकें बोलून नरसिंगराव क्षणभर गप्प राहिला. आज तो बराच बोलत होता. बोलण्याचा त्याला आज हुरूपच आला होता. जिज्ञासु भेटल्यावर बोलण्याचा हुरूप येणें हेंहि साहजिकच आहे. तो थांबला असें पाहून विमला म्हणाली, "आज तुम्हांला किती तरी श्रम झाले आहेत. तुम्हीं मघांपासून एकसारखे बोलत आहांत. मला वेडीला तुम्हीं मघांपासून जीव तोडून इतकं सांगितलं पण—पण—"

"अशा थांबलांत का?—पण काय?"

विमलेनें उत्तर देण्याऐवजीं तोंडावर पदर धरिला. तें पाहून नरसिंगरावानें तिला पुनः विचारलें. तेव्हां ती हळूच म्हणाली, "तुम्हीं मला इतकं सांगितलं पण तें मला चांगलं कळलं नाहीं. मला हें चांगलं समजावून घेण्याची फार इच्छा आहे. पण—"

"मग मी मोठ्या उल्हासानें आणि आनंदानें सांगेन. तुमची कोणतीहि इच्छा असेल ती मला सांगा. मी ती मोठ्या आनंदानें मान्य करीन. तुमची इच्छा म्हणजे मला ती आज्ञाच आहे."

"इश्श! हें काय भलतंच बोलणं!

"भलतंच कसं! विमलाबाई, तुमचे मजवर किती अगणित उपकार झाले आहेत ते मला कधीं तरी फेडतां येतील का?"

"हें तुम्ही असं उलटं बोलूं लागलां मग काय बोलायचं!



## ९ ह्यूमसाहेब

**नरसिंगराव** आणि विमला या दोघांच्या मनांत परस्पराविषयींच्या विचारांना खरी सुरवात रात्रीपासून झाली. विमलेचें एकच वाक्य सर्व रात्र नरसिंगरावाच्या कानांत गुणगुणत होतें. आणि त्याबरोबर तिनें आविर्भावासह प्रगट

केलेली उत्कंठा त्याच्या डोळयापुढून हालेना. ‘ मला शिकण्याची इच्छा आहे.’ हें एकच वाक्य तो पुनः पुनः आठवून त्यावर विचार करीत होतो. ह्या एका वाक्यांत विचार करण्यासारखे काय होतें ? आणि विमलाहि सर्व रात्र इतका कोणता विचार करीत होती ? नरसिंगरावानें तिला समजावून सांगण्याचा जो प्रयत्न केला, त्यापैकीं तिला कांहीं कळलें नव्हतें, हें तिनेंच कबूल केलें होतें. मग ती कोणत्या गोष्टीचा विचार करीत होती ? धर्माविषयीं त्यानें जें कांहीं सांगितलें त्याबद्दल ती विचार करीत होती काय ? नाहीं, याबद्दल चुकून देखील विचार तिच्या मनांत आला नाहीं. सर्व रात्र तिच्या मनाला विचाराची गति देणारें नरसिंगरावाचें एकच वाक्य होतें. आणि तें वाक्य म्हणजे, ‘ तुमची इच्छा मला आज्ञेसमान आहे ! ’ हें नरसिंगरावाचें एकच वाक्य तिच्या अंतःकरणावर निरनिराळया विकारांचे तरंग उत्पन्न करीत होतें.

आज नरसिंगरावाच्या हातापायाला बांधलेले पट्टे डॉक्टर सोडणार होता. आणि त्याप्रमाणें त्यानें काय तयारी करून ठेवावयाची तें सर्व विमलेला आदल्या दिवशीं सांगून ठेविलें होतें. विमला आपली सर्व तयारी करून डॉक्टरसाहेबांची वाट पहात होती. बापुसाहबहि त्यावेळीं येणार होते. संतोबांची मात्र बरीच गडबड उडाली होती. आज डॉक्टरानें नरसिंगरावाला आणखी महिनाभर आपल्या घरून नेण्यास सांगूं नये म्हणजे आपण मिळविलें, हा विचार त्याच्या मनांत घोळत होता. नरसिंगराव घरांत आल्यापासून त्याच्या दुखण्यांत त्याला त्रास होईल म्हणून संतोबांनीं मागावर सूत चढविलें नव्हतें. ही गोष्ट बापुसाहेबांच्या लक्षांत येऊन संतोबांचें होणारें नुकसान बापुसाहेबांनीं भरून देण्याचें कबूलहि केलें होतें. नरसिंगराव आपल्या घरीं आणखी रहावा म्हणून काय युक्ति योजावी याचा विचार करतां करतां त्यांना मनोहराची आठवण झाली. त्याला सांगून त्याच्याकडून डॉक्टरास सांगावें असा विचार त्याच्या मनांत आला.

ठराविक वेळीं डॉक्टर आला. त्याच्याबरोबर बापुसाहेबहि आले. डॉक्टरानें प्रथम हाताचा पट्टा सोडून तो तपासून पाहिला. नंतर पायांचा पट्टा सोडला, दोन्ही जखमा भरून आल्या होत्या. डॉक्टरानें आपली पूर्ण तपासणी केल्यावर पुष्कळ समाधान व्यक्त केलें. आणखी चार दिवसांनीं हातापायाला बांधलेल्या फळया सोडून फक्त पट्टा बांधून चालेल असें डॉक्टरानें सांगितलें, तेव्हां बापुसाहेब म्हणाले, “ मग चार दिवसांनीं फळया सोडल्या--

वर नरसिंगरावाला घरीं नेण्यास कांहीं हरकत आहे काय ? "

" कांहीं हरकत नाहीं. " डॉक्टरानें उत्तर दिलें, " नरसिंगराव, तुम्ही मोठे दैववान् म्हणायचे ! वास्तविक तुमची केस फार जोखमीची होती. परंतु तुम्ही फार लवकर बरे झालांत नाहीं तर ह्या फ्याक्चरच्या केसमध्यें पेशन्टला दोनदोन महिने पडून रहावं लागतं. "

" माझं बरं होण्याचं सर्व श्रेय विमलाबाईकडे आहे. त्यांनीं मजकरितां रात्रंदिवस जे श्रम घेतले आहेत, या उपकाराबद्दल मी त्यांचा केव्हांहि उतराई होणार नाहीं. "

विमलनें उत्तर न देतां फक्त हास्य मुद्रेनें नरसिंगरावाकडे पाहिलें. तो आणखी चार दिवसांनीं बरा होणार हें ऐकून तिला कितीतरी आनंद झाला. तिला जितका आनंद झाला त्याच्या उलट तितकेंच संतोबाला वाईट वाटलें. ' चार दिवसांनीं नेण्यास कांहीं हरकत नाहीं ' हें डॉक्टरानें दिलेलें मत ऐकून त्याचे सर्व विचार जागच्या जागीं राहिले.

डॉक्टराचें मत ऐकून नरसिंगरावाला नवीन उत्साह वाटूं लागला. विमलेच्या मनाचीही तीच स्थिति होती. आज सर्व दिवसांत जेव्हां जेव्हां त्यांना परस्परांबरोबर बोलण्याचा प्रसंग आला, त्या त्या वेळीं ती दोघें बरींच मोकळ्या मनानें बोलत होतीं. त्यांचा परस्परांविषयीं आदर कायम होता परंतु आज त्यांना एकमेकांबरोबर बोलण्यांत मोकळेपणा वाटत होता. अशा रीतीनें हां हां म्हणता संध्याकाळ झाली. मिशनरीबाई येण्याची वेळ होत आली. काल तिच्याबरोबर नरसिंगरावानें सप्रमाण वाद केला असल्यामुळें ती आज येईल किंवा नाहीं अशी विमलेला शंका होती. परंतु पांच वाजण्याच्या सुमारास मिशनरीबाई आणि तिच्याबरोबर ह्यूमसाहेब आले. हे साहेब आजच प्रथम आले. त्यांना पाहतांच विमलेची विशेष गडबड उडाली. ह्यूमसाहेब म्हणजे सर्व नगर जिल्ह्यांत मशहूर. त्याचा बांधा ठेंगणा असून त्यांच्या छातीवर लोळणारी दाढी आतां अगदीं शुभ्र झाली होती. हे साहेब मराठी भाषा अति उत्तम बोलत असून प्रथम त्यांनीं सर्व नगरांत दारोदार स्वतः फिरून भिक्षा मिळविली. आणि त्या भिक्षेंतून जमलेल्या पैशाचें टोलेजंग चर्च बांधिलें. ह्या साहेबांनीं आपला सर्व जन्म परोपकारांतच घालविला आहे. नगरास बाबामलंगाच्या वेशीबाहेर गेल्यावर तेथें दृष्टीस पडणारें भव्य हॉस्पिटल, त्याचप्रमाणें तें दगडी चर्च आणि पलीकडे असणारें मिशन हीं

सर्व ह्यूमसाहेबांच्या परोपकाराचीं दर्शक चिन्हेंच होत. नगरांतील कोणताहि इसम ह्या साहेबाविषयीं बोलूं लागला म्हणजे मोठ्या आदरानेंच बोलत असतो. केव्हां केव्हां सायंकाळीं हे ह्यूमसाहेब पुढें आणि मागून रांगेनें दोन अडीचशें मुली फिरावयास निघाल्या असतां तो देखावा पाहून मोठें कौतुक वाटतें.

मिशनरीबाईबरोबर आज ह्यूमसाहेब आले होते, ते निराळ्याच उद्देशानें आले होते. कारण आधल्या दिवशीं घडलेला सर्व प्रकार बाईनें साहेबांस सांगितला होता. त्यावर त्यांच्या बऱ्याच गोष्टी झाल्या. विमलेवर ह्यूमसाहेबांचीहि विशेष मर्जी होती. ती आपल्या मिशनमध्यें यावी अशी त्यांचीहि इच्छा होती. परंतु एखाद्याची फसवणूक करून त्याला धर्मांतर करावयास लावणें हें ह्यूमसाहेबांचें ब्रीद नव्हतें. ते वाटेल त्याच्याजवळ खिस्तीधर्माची तरफदारी करीत असत; परंतु इतर पोटभरू मिशनऱ्यांप्रमाणें चव्हाट्यावर उभे राहून धर्माची नालस्ती मात्र करीत नसत. त्यांचा स्वभाव फारच मनमिळाऊ होता. कोणीहि त्यांच्याबरोबर बोलण्याच्या इच्छेनें किंवा भेटण्याकरितां आले असतां, मग तो मनुष्य कोणत्याहि जातीचा अगर दर्जाचा असो, ते त्याच्याबरोबर तास अर्धातास बोलत असत. लहान मुलाबरोबर जें त्यांचें वर्तन; तेंच मोठ्या मनुष्याबरोबर असे. सर्व मिशनमध्यें ह्यूमसाहेब म्हणजे एक पूज्य व्यक्ति मानली जात असे.

ते वर येतांच विमलेनें त्या दोघांना बसण्याकरितां खुर्च्या दिल्या. प्रथम ह्यूमसाहेबांनीं नरसिंगरावाच्या प्रकृतीची चौकशी केल्यावर थोडावेळ इतर गोष्टी केल्या. नंतर साहेब म्हणाले, " तुम्ही बरे झाल्यावर आमच्या चर्चमध्यें एकदां या. तेथें येण्याची सर्वांना मोकळीक आहे. तुम्ही आमच्या चर्चमध्यें याल तर मला फार आनंद होईल."

" मी मोठ्या आनंदानें येईन. " नरसिंगरावानें उत्तर दिलें.

" तुमचें हें भाषण ऐकून मला फार संतोष होत आहे. काल आमच्या मिसेस + + बाई जवळ तुम्हीं जें भाषण केलें त्यावरून मला वाटत होतें कीं, तुम्ही आमच्या चर्चमध्यें येणार नाहीं. "

" तुमच्या बाईचा असा समज झाला असेल तर तो चुकीचा आहे. तुमच्या चर्चमध्यें मी आलों तरी मला तेथें ईश्वराचीच प्रतिमा दिसेल. कोणतेंहि देऊळ असलें तरी तेथें ईश्वराचा प्रतिनिधिच असणार. मग तें खिश्चन चर्च असलें

म्हणून काय झालें ? मी तुमच्या चर्चमध्यें आलों तरी मला तेथें भगवान् श्रीकृष्णाची प्रतिमा दिसेल. ''

" असं कसं होईल ? तुमचा कृष्ण आणि आमचा प्रभु येशूख्रिस्त यांच्यांत फारच अंतर आहे. "

" साहेब तुमचें चुकतें तें येथेंच ! उलट श्रीकृष्णचरित्राच्या कांहीं भागाचें ख्रिस्तचरित्राशीं अत्यंत साम्य आहे भगवान् श्रीकृष्णाचा जन्म राजकुलांत झाला. कंस या नांवाचा एक अत्यंत जुलमी राजा त्या काळीं होता. श्रीकृष्ण हा त्याच्या बहिणीचा मुलगा. त्याच्या बहिणीचा मुलगा त्याचा वध करील असें भविष्य त्यास सांगितलें होतें; म्हणून बहिणीच्या सर्व मुलांना ठार मारावें असा राजानें हुकूम केला होता. आपली बहिण आणि तिचा पति यांस त्यानें तुरुंगांत ठेविलें होतें. भगवानाचा जन्म तुरुंगांतच झाला; त्यावेळीं मोठा प्रकाश पडला आणि तें तान्हें मूल म्हणालें, " मी जगाचा प्रकाश आहें; जगाच्या कल्याणासाठीं मीं जन्म घेतला आहे. " भगवान् श्रीकृष्णाला गोपाळ असें नांव आहे. गोकुळांत त्यानें गाई राखल्या. त्यावेळच्या मोठमोठ्या ऋषींनीं ' हा परमेश्वराचा अवतार ' म्हणून त्याला वंदन केलें. भगवान् श्रीकृष्ण आणि ख्रिस्त यांच्या चरित्रांतील साम्य येथेंच संपतें. त्यानंतरचीं त्यांचीं चरित्रें एकमेकांहून निराळ्या दिशांनीं गेलीं आहेत.

" पण आमचा प्रभु येशूख्रिस्त आम्हाला शांति देतो. तसा प्रकार तुमच्यांत नाहीं. तुम्ही देवाजवळ शांति मागूं लागलां म्हणजे तुमच्या देवां-देवांतच भांडण होतें. तुमचे देव पुष्कळ असल्यामुळें तुम्हाला कोणता देव शांति देईल. एका देवाला तुम्ही हांक मारिली, तो येण्याकरितां निघाला, तों तुम्ही दुसऱ्या देवाला हांक मारितां ! तो येतो न येतो तों तुम्ही तिसऱ्या देवाला हांक मारितां. तेव्हां पहिला देव म्हणतो, मला नाहीं हांक मारिली, दुसराहि देव तसेंच म्हणतो. एकूण काय तर शेवटीं तुम्हांला शांति म्हणून मिळतच नाहीं. "

" साहेब, आपण म्हणतां त्याप्रमाणें आमच्या देवा-देवांत भांडण लागत नाहीं, किंवा देव शांति देण्याकरितांहि येत नाहीं. हा सर्व आपल्या श्रद्धेचा खेळ आहे. आपण डोळ्यापुढें जसें ध्येय ठेवूं तसें आपणास फळ मिळणार आहे. तुमचा प्रभु येशू ख्रिस्त मोठा महात्मा होता; त्याचें शील वाखाणण्यासारखें होतें. त्याच्या उपदेशाचा परिणाम लोकांना हितकारी होत असे.

आणि बायबलांत जें वर्णन आहे तें प्रत्यक्ष ख्रिस्ताच्या तोंडचें आहे; तेव्हां बायबलांतील शब्दन् शब्द प्रमाण मानला पाहिजे असें तुम्हीं समजतां आणि हें समजतां त्याप्रमाणेंच आचार, विचार आणि कृति केली तर तुम्ही देखील ख्रिस्त व्हाल. तोच प्रकार हिंदूंचा आहे. आमच्यांत ईश्वर जरी पुष्कळ असले तरी एखाद्या मनुष्याची श्रद्धा जर कोणत्याच देवावर नसेल तर तो अधोगतीलाच जाणार. त्याबद्दल देवांना दोष कसा द्यावा ?

" पण हें असें पुष्कळ देव मानणें मूळांतच चूक आहे."

" असें म्हणण्यांत आपण मोठं धाडस करीत आहांत साहेब ! "

नरसिंगराव जरा जोरानें म्हणाला, (" ज्याप्रमाणें येशू ख्रिस्त हा परमेश्वराचाच अवतार आहे असें तुम्हीं समजतां, त्याप्रमाणेंच आम्ही हिंदु लोक परमेश्वरानें कित्येक अवतार धारण केले असें समजतों. अवतार एक दोनच झाले असें नसून, ज्या ज्या वेळीं पृथ्वीवर अधर्म माजतो त्या त्या वेळीं परमेश्वर अवतार घेऊन सज्जनांचें रक्षण आणि दुष्टांचें निर्दालन करतो असें आम्ही समजतों. ")

" असे तुमचे पुष्कळ ईश्वर झाल्यावर कोणत्या देवाला भजावें अशी तुम्हाला पंचाईत पडत असेल ? "

" साहेब, येथेंहि आपण चुकतां ! आमचे ईश्वर पुष्कळ नाहींत. ईश्वर एकच आहे पण त्याचे अवतार पुष्कळ आहेत. त्या अवतारांपैकीं कोणत्याही एका अवताराला आम्हीं भजलों तरी त्या एकाच ईश्वराविषयीं आमच्या मनांत जागृति असते. "

" मग तुम्ही कोणता अवतार पूज्य मानितां ? "

" आम्हाला सर्वच अवतार पूज्य आहे. ईश्वरानें हे निरनिराळे अवतार घेऊन जगापुढें हे वेगवेगळे आदर्श ठेविले आहेत. त्यानें आपल्या प्रत्येक अवतारांत एक एक विशेष गोष्ट करून दाखविली आहे. आणि आपलें उदाहरण जगापुढें ठेविलें आहे. ते अवतार ज्या ज्या कालांत होऊन गेले त्या त्या कालाला अनुरूप असाच त्यांनीं उपदेश केला. आणि आपण त्या अवताराचें भजन करावयाचें म्हणजे त्याचें अनुकरण करावयाचें असा अर्थ आहे. तुमच्या येशूख्रिस्तानें आपल्या अवतारांत किती तरी गोष्टी तुमच्यापुढें आदर्श म्हणून ठेविल्या आहेत, त्याचा विचार करा; म्हणजे माझें बोलणें तुम्हाला पटेल. तुम्हाला शाश्वत सुखाची इच्छा असेल, आपण खरें सुखी

व्हावें असें जर तुम्हाला वाटत असेल तर ' प्रभुभोजना ' च्या वेळीं तुमच्या येशुख्रिस्तानें काढलेले उद्गार ' माझें मांस खाऊन टाका ' हें लक्षांत ठेवा. ह्या एका उद्गारावरून ' आत्मयज्ञ करण्यांत जो मनुष्य आपलें आयुष्य घालवितो तोच सुखी ' या गोष्टीची तुम्हांला सूचना मिळत नाहीं काय ? शिवाय समदृष्टीनें सर्वांकडे पाहणारा तुमचा येशुख्रिस्त ' शेजाऱ्यावर प्रीति कर ' असें तुम्हाला सांगतो याचा अर्थ काय ? त्यानें कोणता आदर्श तुमच्या पुढें ठेविला आहे ? ''

ह्यूमसाहेब शांत स्वभावाचे असल्यामुळें ते नरसिंगरावाचें हें जोराचें भाषण शांतपणें ऐकत होते. मिशनरीबाईला मात्र हें भाषण ऐकून अत्यंत आनंद झाला. आपल्या येशुख्रिस्ताच्या इतक्या उदात्त गोष्टी आहेत हें ऐकून ती म्हणाली, '' आमच्या प्रभु येशूख्रिस्ताचा आदर्श किती सुंदर आहे हें तुम्हीच कबूल करतां. तसा सुंदर आदर्श तुमच्या तेहतीस कोटी देवापैकीं एकानें तरी ठेविला आहे काय ? ''

'' आपली माहिती फार कोती आहे म्हणून आपण मला असा प्रश्न करतां. आमच्या एकट्या श्रीकृष्णाच्या चरित्रांतच सर्व प्रकारचे आदर्श आहेत. परंतु त्यांत संसारी मनुष्यास अत्यंत अवश्य असें कर्म—रहस्य त्यानें सांगितलें आहे. कर्म करीत असतांहि अकर्माची शांति आणि कर्म करीत नसतांहि अत्यंत कर्मप्रवरणता अंगीं कशी आणावी हें त्यानें आम्हांस स्वतःच्या उदाहरणानें शिकविलें आहे. कर्म करीत असतांहि तें अनासक्त चित्तानें केलें—कर्मफलाची इच्छा ठेविली नाहीं—म्हणजे त्याजपासून उद्भवणारीं सुखदुःखें भोगण्याचेंहि कारण नाहीं, हें त्यानें शिकविलें आणि आचरूनहि दाखविलें. ' तुम्ही स्वतः शुद्ध आणि मुक्त अहांत; तुम्ही केवळ साक्षी आहांत: दुःखाची प्राप्ति कर्मामुळें होत नसून फलासक्तीमुळें होते,' हा त्याच्या सांगण्यांतील मुख्य मुद्दा आहे. पैसा मिळवावासा वाटत असेल तर तो खुशाल मिळवा. तो मि[illegible] हवा तितका उद्योग करा; पण त्या पैशाशीं एकजीव होऊन बसूं नका. त्याप्रमाणें आईबाप, बायकामुलें, इष्टमित्र, गणगोत, कीर्ति इत्यादिकांबद्दलहि समजावें. चित्तांत आसक्ति ठेवावयाची ती फक्त परमेश्वराबद्दलच ठेवावयाची. इष्टमित्रादिकांसाठीं कर्म करा; त्यांच्यावर प्रेम असूं द्या; त्यांच्या बऱ्यासाठीं झटा. पण हें करीत असतांना त्यांजबद्दल आसक्ति ठेवूं नका. या आपल्या मेहनतीचें फळ अमुक प्रकारचें मिळावें

अशी इच्छा ठेऊं नका हें आमच्या श्रीकृष्णाचें सांगणें आहे. (त्याचें सर्व चरित्र म्हणजे या उपदेशाचें जिवंत उदाहरणच आहे. त्याचप्रमाणें मातृ-पितृवचन पाळण्यास सांगणारा श्री रामचंद्राचा आदर्श आहे. बंधुप्रेम शिकविणारे भरत-लक्ष्मण यांचें चरित्र आहे. सेवाधर्म शिकविणारा मारुति आहे. पुत्रकर्तव्य सांगणारे प्रल्हाद, चिलया, रोहिदास इत्यादि सत्पुत्र आहेत. स्त्रियांकरितां सीता, सावित्री, द्रौपदी इत्यादी अनेक आर्यस्त्रिया आपला आदर्श पुढें ठेवीत आहेत. अशा रीतीनें हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती इत्यादि प्रत्येक धर्मात त्या त्या धर्मांतील अनुयायाकरितां निरनिराळे आदर्श असतां एखाद्यानें वृथाभिमानानें दुसऱ्यांच्या धर्माची व त्यांच्या देवांची टवाळकी करणें न्याय आहे काय ? ” )

“ नाहीं. उलट तें पाप आहे. ” गंभीर स्वरांत ह्यूमसाहेबांनीं उत्तर दिलें.

“ मग तुम्ही हिंदुलोक बाटविण्याचा प्रयत्न करितां हें पाप नाहीं काय ? ”

कर्मधर्मसंयोगानें त्याचवेळीं बापुसाहेब तेथें आले. त्यांनीं आंत येतांना नरसिंगरावानें विचारलेला प्रश्न स्पष्ट ऐकला. आणि आपण येण्यापूर्वी त्यांचा कोणत्या विषयावर संवाद होत होता हेंहि जाणलें. आदल्या दिवशीं नरसिंग-रावानें मिशनरीबाईला निरुत्तर केलें, त्यावेळीं अलाहाबाद कॉलेजमध्यें मिळणारें धार्मिक शिक्षण मुलांच्या मनावर किती परिणामकारक असतें याविषयीं त्यांची खात्री झाली. त्यांना नरसिंगरावाबद्दल अभिमान वाटूं लागला. कालच्या त्याच्या भाषणा वरून याचे प्रगल्भ विचार, एखादा मुद्दा समजावून देण्याची त्याची हातोटी आणि मनाचा समतोलपणा पाहून कमलेबरोबर त्याचें लग्न झाल्यावर तो हिचा हट्टी आणि एककल्ली स्वभाव सहज सुधारून तिला सुखी करील अशी त्यांनीं खूणगांठ मारिली. आतां होतां होईल तितकें करून त्याला लवकर घरीं घेऊन जावें म्हणजे त्याच्या नित्यसहवासानें आपल्या कमलेची सुधारणा होईल असें त्यांना वाटूं लागलें.

बापुसाहेबांच्या एकदम येण्यामुळें ह्यूमसाहेबास उत्तर देण्यास बरीच सवड झाली. कारण नरसिंगरावानें विचारलेला प्रश्न दिसण्यांत सरळ होता तरी त्या प्रश्नानें साहेबांची परिक्षेचीच वेळ आणिली होती. बापुसाहेब आंत आल्यावर त्यांनीं ‘ काय चाललं आहे ? ’ असा प्रश्न केल्यावर नरसिंगराव म्हणाला, “ मी साहेबांना विचारतों कीं, तुम्ही हिंदु लोक बाटविण्याचा प्रयत्न करितां हें तुम्ही पाप नाहीं का करीत ? ”

" अरे, नुसतें पापच नाहीं तर ही नरकवासाची तयारी करतात !" बापुसाहेब चिडून म्हणाले. हे मिशनरी विमलेला बाटविण्याचा प्रयत्न करीत आहेत याबद्दल त्यांच्या मनांत राग होताच. तो मनांत आणूनच ते इतक्या उघड रागानें म्हणाले. परंतु ह्यमसाहेबांनीं शांत स्वरांत उत्तर दिलें, " पाप तर खरेंच ! परंतु तसा प्रकार हल्लीं होत नाहीं. कांहीं वर्षांमागें तसा काळ होता. हल्लीं जर तसा प्रकार असता तर ही विमला आमच्या मिशनमध्यें इतकीं वर्षें होती, मग आम्हीं तिला बाटविली नाहीं ती ? "

" पण प्रयत्न तर चालू आहेत. " बापुसाहेब म्हणाले, " शिवाय तुमच्या मिशनमध्यें इतक्या मुली आणि मुलें आहेत त्याचा अर्थ काय ? तीं बाटलेलीं नाहींत वाटतं ? "

" त्याबद्दल आम्हाला दोष देतां येणार नाहीं. उलट तीं बाटलीं याबद्दल तुम्हीच जबाबदार आहांत. "

" चोराच्या उलट्या बोंबा म्हणतात त्या ह्याच ! " हें वाक्य बापुसाहेबांनीं अस्पष्ट उच्चारलें.

" आम्ही जबाबदार ! तें कसें ? " नरसिंगरावानें विचारलें.

" कसें तें सांगतों. मीं येथें चर्च बांधिलें, मिशन स्थापन केलें, हॉस्पिटल उघडलें; तें केवळ येथल्या लोकांची स्थिति पाहूनच ! ह्या प्रदेशांत सदा सर्वदा दुष्काळ पडतो. येथें लोकांचे फार हाल होतात. परंतु त्याकडे तुम्हीं धनिक लोक दुर्लक्ष करतां. दुष्काळ पडला किंवा प्लेगसारखी आपत्ती आली असतां तुम्ही शहराबाहेर सुरक्षित ठिकाणीं निघून जातां आणि गरीब बिचारे निराश्रित लोक प्लेगला किंवा दुष्काळाला पटापट बळी पडतात. आमचें हॉस्पिटल अशाच लोकांकरितां आहे. आम्ही दुष्काळांत कांहींतरी रिलिफकाम काढून अशा लोकांना वेतन देतों आणि जीव वांचविण्याची कांहींतरी तजवीज करतों. त्यामुळें उपकारबद्ध होऊन ती मंडळी स्वखुषीनें आमच्या धर्मांत आली तर आम्ही त्यांना आमच्या धर्मांत घेतों. दुष्काळांत आईबाप आपापलीं पोरें विकतात, कित्येक निष्ठुर लोक लहानलहान अर्भकें उकेवर टाकतात. अशीं मुलें आम्हीं विकत घेतलीं किंवा गोळा केलीं आणि यांचे प्राण रक्षण केले तर पाप होईल काय ? हल्लीं आमच्या मिशनमध्यें असलेली सर्व मुलेंमुली सोळा वर्षांपूर्वीं पडलेल्या भयंकर दुष्काळांतील आहेत. आम्ही आमच्या फंडांतून त्यांचें लालनपालन केल्यावर पुढें दुष्काळ संपल्या-

वर त्या मुलांमुलींकडे पाहून तुम्ही आमच्याबरोबर भांडण्यास उठतां. आम्ही फसवून हिंदूंचीं मुलें बाटवितों असा तुम्ही आमच्यावर आरोप करतां; आणि आम्हाला शिव्या देतां पण हींच मुलें दुष्काळांत अन्नपाण्यावांचून पटापट प्राण सोडीत होतीं त्यावेळीं तुम्हाला त्यांचा कळवळा आला नाहीं. त्यांच्याकरितां झीज सोसायला तुम्ही तयार नव्हतां आणि मागून ब्रह्मज्ञान सांगायला तयार होतां काय ? ”

ह्यूमसाहेबांनीं हा उलटा शह दिला. त्यांचें म्हणणें अगदीं अक्षरशः खरें होतें.



## १० प्रेमाकर्षण

**मध्यरात्र** उलटून गेली होती. सर्वत्र शांततेचें राज्य पसरलें होतें. आकाशांत रोहिणीपति आपला मार्ग स्वच्छंदानें क्रमित होता. अशा वेळीं नरसिंगरावाच्या बिछान्याजवळ कोपऱ्यांत दिवा घेऊन विमला बसली होती. तिच्या मांडीवर रामायणाचें मराठींत केलेलें सुरस भाषांतराचें पुस्तक होतें, त्या पुस्तकाचीं कांही पृष्ठें वाचून खुणेकरितां त्यांत तिनें बोट ठेविलें होतें. व वाचलेल्या गोष्टीचा ती स्वतःबरोबर विचार करीत होती.

मागील प्रकरणांत घडलेल्या गोष्टीला आज सहा दिवस झाले होते. ह्या सहा दिवसांत रोज प्रार्थना करण्याकरितां मिशनरीबाई फक्त एकदांच आली. विमलेबद्दल आतां तिची पूर्ण निराशा झाली. ती नरसिंगरावाच्या सहवासांत आहे तेव्हां आतां तिनें धर्मांतर करावें म्हणून आपण कितीही जंग पछाडले तरी त्यांत आपणांस यश यावयाचें नाहीं अशी तिची खात्री झाली. तथापि आपण तिच्याकडे जाणें एकदमच बंद केलें तर आपण रोज मतलबाकरितांच येत होतों असें वाटेल. म्हणून ह्या दोषारोपांतून मुक्त होण्याकरितां तिनें चार दिवसांत एक फेरी टाकण्याचा विचार केला आणि त्याप्रमाणें गेल्या सहा दिवसांत ती एकदांच येऊन गेली. आतां विमलेला बराच वेळ मिळूं लागला. ह्या सहा दिवसांत नरसिंगरावानें तिला किती तरी गोष्टी सांगितल्या; पैकीं गेल्या दोन रात्रीं तो तिला रामायणाची कथा सांगत होता. विमलेची धारणाशक्ति चांगली आहे असें पाहून एखाद्या भाविक श्रोत्याच्या मनावर परिणामकारक व्हावी म्हणून

रामायणाची कथा तिखटमीठ लावून न सांगतां आधुनिक पद्धतीनें सांगत असतां शेवटीं तो म्हणाला, "श्रीराम आणि सीता यांचीं चरित्रें आर्यावर्तांत आदर्शवत मानलीं जातात. येथील सर्व स्त्रिया सीतेची पूजा करीत असतात. एखाद्या स्त्रीची अत्यंत उत्कट इच्छा पाहिली तर सीता होण्याची असते. जी अत्यंत पवित्र आणि अत्यंत प्रेममय असतांहि जिनें जन्मभर कष्ट सोसले, त्या सीतेसारखें आपण व्हावें, ही प्रत्येक आर्य स्त्रीची अत्यंत मोठी इच्छा असते. श्रीराम आणि सीता यांच्या चरित्राचें सूक्ष्म अवलोकन केलें असतां पौर्वात्य आणि पाश्चात्त्य देशांतील लोकांच्या आदर्श कल्पनांत भेद कोणता आहे तो लक्षांत येतो. शरीराला कितीहि कष्ट पडोत, कितीहि दुःखें प्राप्त होवोत आणि कोणतींहि संकटें येवोत, पण आपल्या दानतींत यत्किंचितहि फरक होऊं द्यावयाचा नाहीं हा सीतेच्या वर्तनाचा आदर्श आर्यांनीं आपल्यापुढें ठेविला आहे. आणि याबद्दलचीं अनेक उदाहरणें आपल्या महाराष्ट्राच्या इतिहासांत आपणास जागोजाग पहावयास सांपडतात. परंतु पाश्चात्य राष्ट्रांचा आदर्श कर्मप्रविणता हा आहे. एकसारखें कर्म करून आपला मोठेपणा स्थापन करा, असा पाश्चात्य संस्कृतीचा उपदेश आहे. पौर्वात्यसंस्कृति याच्या उलट उपदेश करते. आपलें मोठेपण कष्ट सोसण्यांत आहे असें आर्यसंस्कृतीचें मत आहे. मनुष्याला किती भोग भोगणें शक्य आहे हा प्रश्न पाश्चात्त्य राष्ट्रें सोडवीत आहेत. उलटपक्षीं मनुष्याला आपल्या गरजा किती कमी करतां येतील हा प्रश्न आमच्या आर्यभूमीनें सोडविला आहे." अशा ह्या परस्परांशीं अत्यंत विसदृश दोन स्थिति विमलेला नीट समजावून व इतर उदाहरणानीं पटवून देऊन नरसिंगराव म्हणाला, "सीता हा हिंदु लोकांचा आदर्श आहे. आर्यभूमीच्या सर्व आकांक्षा एकत्र करून त्यांची मूर्ती निर्माण केली तर ती सीतेसारखी होईल. श्रीराम आणि सीता यांच्या चरित्रावरून आपल्या संस्कृतीचा नमुना कोणत्या प्रकारचा असावा याचें उत्तम चित्र आपणास पहावयास सांपडतें. एकंदर पुराणापैकीं श्रीरामचरित्राइतकें लोकमान्य झालेलें पुराण दुसरें एकहि नाहीं. जनतेच्या अगदीं वरच्या थरापासून तों थेट तळापर्यंत या पुराणांतील रहस्य लोकांच्या हाडींमासीं खेळत आहे. सीता हें नांव सर्वतोमुखीं झालेलं आहे. सीता म्हणजे केवळ सौजन्य, शुद्धता आणि पातिव्रत्य यांची जिवंत मूर्तिच ! स्त्रीला शोभा देणारे जे जे गुण असावेत असें आपणास वाटतें ते सर्व

सीतेच्या ठायीं होते. एकाद्या स्त्रीला आशीर्वाद द्यावयाचा असला तर 'सीतेसारखी हो!' असें म्हणतात. अनेक प्रकारचीं संकटें प्राप्त झालीं आणि जिवाचें अगदीं रान झालें तरी श्रीरामाविरुद्ध एक अक्षरहि तिच्या तोंडून कधीं बाहेर पडलें नाहीं. जें जें कांहीं प्राप्त झालें तें तें कर्तव्य समजून तिनें केलें. तिला खडतर वनवास प्राप्त झाला असतांहि असंतोष, अप्रीति, क्रोध, असूयादि विकार तिला स्पर्श करूं शकले नाहींत. त्यांचा नुसता प्रतिकार करण्याची इच्छा सुद्धां तिला झाली नाहीं. आर्यांचा हाच आदर्श आहे. हेंच त्यांचें ब्रीद वाक्य आहे."

नरसिंगरावानें वर सांगितलेलें हें रामायणाचें मुख्य सार विमलेच्या हृत्पटलावर अगदीं खोदून निघालें. ती आतां रामायणच वाचीत होती. आणि ज्या ज्या ठिकाणीं सीतादेवीचा उल्लेख येई, त्या त्या ठिकाणीं ती पुस्तक बंद करून क्षणभर विचार करी. प्रत्येक वेळीं तिला नरसिंगरावाचें, सीतादेवीसंबंधीं उच्चारलेलें एक एक वाक्य आठवे, आणि तिचें अंतःकरण उचंबळून तिच्या मनांत नानाप्रकारचे विचार येत. सीतेशिवाय आणखी कैक पुराणप्रसिद्ध साध्वी स्त्रियांचा नरसिंगरावानें मधून मधून उल्लेख केला होता. त्या साध्वी स्त्रियांचीं चरित्रें अद्यापि तिनें वाचलीं नव्हती. परंतु रामायण वाचतांना सीतेबरोबर अहिल्या, मंदोदरी, सुलोचना, चंद्रसेना इत्यादि स्त्रियांचीहि तिला त्रोटक माहिती झाली. त्यावरून त्या स्त्रियांचीं संपूर्ण विस्तृत चरित्रें आपण केव्हां वाचूं असें तिला झालें.

अशा रीतीनें विमला आपल्या विचारांत मग्न झाली असतां नरसिंगरावानें त्या खोलींतील शांतता भंग केली. तो झोपेंत बोलूं लागला. "विमला, तूं जर असं करशील तर माझं हृदय विदारण होईल.—विमला, तुझ्या ज्या कांहीं शंका कुशंका असतील त्या मला विचार; पण तूं धर्मांतर करूं नकोस! —विमला, तुझ्या उपकारांचा माझ्या शिरावर एक मोठा पर्वत झाला आहे, त्याची मजकडून फेड होणें अगदीं अशक्य आहे; तरी विमले, तूं माझी झाल्यावर मी तुला सुखी करण्याचा प्रयत्न करीन. मग तूं नाहींना धर्मांतर करणार?—सांग—विमला, तूं बोलत कां नाहींस?"

नरसिंगरावाचें झोपेंतील बरळणें ऐकून विमला अगदीं स्तंभित झाली. त्याचा प्रत्येक शब्द तिच्या मनावर परिणाम करीत गेला. नरसिंगरावाचें बरळणें थांबलें. जणुं काय, त्यानें बरळण्यांत विचारलेल्या प्रश्नाची तो अपेक्षाच करीत होता तो एकदम गप्प राहिलेला पाहून विमला आपल्या हातांतील

पुस्तक बाजूला ठेवून उठली आणि त्याच्या बिछान्याजवळ गेली. क्षणभरच ती त्याच्या मुखाकडे पहात राहिली. आज जवळ जवळ तीन आठवडे ती त्याच्या अगदीं निकट सहवासांत होती. रात्रीं अपरात्रीं तिला कोणत्या ना कोणत्या निमित्तानें त्याला स्पर्श करावा लागत असे. परंतु क्षणापूर्वीं ऐकलेल्या त्याच्या भाषणामुळें सर्व स्थिति एकदम बदलली. ती त्याच्या उशाजवळ बसून रात्रींच्या रात्रीं त्याला लवकर आरोग्य प्राप्त व्हावें म्हणून परमेश्वराची करुणा भाकीत असे. तो जागा असतांना त्याला स्वतःच्या दुःखाची किंवा शरीरव्यथेची जाणीव होऊं नये म्हणून येशूख्रिस्ताचीं पदें आपल्या मंजुळ स्वरांत गाऊन त्याचें मनरंजन करीत असे. परंतु तिच्या मनांत प्रेमाचा विषय केव्हांही आला नाहीं. थोड्या दिवसापूर्वीं असाच एक प्रसंग आला होता. त्यावेळींहि नरसिंगरावानें झोंपेंत 'विमला, तुला मी ह्या देहांत प्राण आहे तोंवर धर्मांतर करूं देणार नाहीं' हें उच्चारिलेलें वाक्य तिला नेहमीं आठवत होतें. आज देखील त्याच वाक्याची पुनरावृत्ति झाली. तथापि त्याबरोबर नरसिंगरावानें आपल्या मनांतील नाजुक पण महत्त्वाची गोष्ट प्रगट केली होती. 'तूं माझी झाल्यावर—' हें त्याचें झोंपेंत उच्चारलेलें वाक्य ऐकून तिच्या डोक्यांत निराळ्याच गोष्टीचा एकदम प्रकाश पडला. आणि त्यामुळें तिची अशी चमत्कारिक स्थिति झाली. ती आतां त्याच्या बिछान्याजवळ उभी राहून त्याच्या मुखाकडे पहात होती. क्षणभरानें ती खालीं वाकली. त्याच संधीला 'विमला, तुझें माझ्यावर प्रेम नाहीं का?—हा पहा मी तुला शरण—' इतकेंच बोलून नरसिंगरावानें आपले हात वर उचलले. त्याच वेळीं ती खालीं वांकलेली असल्यामुळें त्यानें वर उचललेले हात साहजिकच तिच्या खांद्याला लागले. आणि तो स्पर्श होतांच नरसिंगराव एकदम जागा झाला. त्यानें डोळे उघडले आणि गंभीर दृष्टीनें तो तिच्या मुखाकडे क्षणभर पहात राहिला. त्यानें आपले दोन्ही हात तिच्या खांद्यावरच ठेविले होते. विमला देखील त्यावेळीं अशा चमत्कारिक विचारांत मग्न झाली होती कीं, त्यानें तिच्या खांद्यावर ठेविलेल्या हातांचा देखील तिनें प्रतिकार केला नाहीं.

"विमला!"

"काय?"

"विमला!"

" काय ? "

तशाच स्थितींत नरसिंगरावानें तिला गंभीर स्वरांत हांक मारिली आणि त्याच आवाजांत तिनेंहि ' काय ?' म्हणून उत्तर दिलें. ह्या एकाच शब्दाच्या दोन प्रश्नांत किती गूढ अर्थ भरला आहे, याची पूर्ण जाणीव होऊनच तिनेंहि त्या दोन प्रश्नांचीं एकाच शब्दानें उत्तरें दिलीं. क्षणभरानें त्यानें पुनः विचारलें, " विमला, तुझें सर्वांग इतकें थरथर कांपतें कां ? "

नरसिंगरावाच्या गूढ प्रश्नांचा अर्थ कळून तिनें जर त्या प्रश्नाचीं योग्य व आत्मसंमतीदर्शक उत्तरें दिलीं होतीं, तर मग आतां तिच्या सर्वांगाला कंप सुटण्याचें कारण काय ? ह्यापूर्वी अगदीं प्रथम जेव्हां तिनें नरसिंगरावाच्या शरीराला स्पर्श केला तेव्हां तिला एक चमत्कारिक भावना झाली होती. परंतु त्यानंतर नरसिंगराव परस्वाधीन स्थितींत असल्यामुळें प्रत्येक दिवशीं असे कैक प्रसंग येऊन गेले कीं, त्याला तिच्या सहाय्यावांचून कोणतीहि गोष्ट करतां येत नव्हती. त्या प्रत्येक वेळीं तिला तिचा स्पर्श होत होता तरी आणि त्या स्पर्शापासून तिच्या अंगाला कंप सुटला नाहीं. मग आतांच असा कंप कां सुटावा ?

" विमला, आतांपासून तुला मी ' विमला ' अशा एकवचनानें संबोधण्याची तुझ्याजवळ परवानगी मागत आहे. ह्या अशा एकेरी संबोधण्यानें मी तुझा अपमान करीत आहे, असें तूं समजूं मात्र नको. उलट ' विमला ' हें नांव मला किती प्रिय आहे आणि—"

" आपण मला कोणत्याही नांवानें हांक मारा. फक्त नांवच जर आपणास प्रिय असेल— "

" विमल हें नांव निर्मलतेचें आहे; आणि मला तें अत्यंत प्रिय आहे. पर्यायें तें नांव ज्या निर्मल देहाला दिलें आहे तो सर्व देह म्हणजे तूं—विमला तूं—"

" आपण आज माझा बहुमान करीत आहांत. वास्तविक मी एक हीन-कुलांत उत्पन्न झालेली पोरकी मुलगी आहें. माझ्याविषयीं इतका विचार करून आपण स्वतःला असे दुःखी कां करून घेता ? दिवसभर आपण माझ्याविषयीं विचार करितां. पण हें कांहीं चांगलं नाहीं. अति विचारांनीं आपल्या अशक्त प्रकृतीवर विपरीत परिणाम होण्याचा संभव आहे म्हणून म्हणतें आपण मजविषयींचे विचार अजिबात सोडून द्या. "

ही गोष्ट आतां केव्हांही शक्य नाहीं. विमला हें माझ्या आराध्य देवतेचें नांव ! अहाहा—!"

हें काय हें ? आपण मला हें भलतेंच महत्त्व देऊन उलट लाजवीत आहांत. आपली योग्यता कुणीकडे आणि मी म्हणजे कुठल्या झाडाचा पाला ! मी आपल्या जागृतावस्थेंत आणि निद्रावस्थेंतहि विचारांचें केंद्र बनावें इतकें माझ्यांत काय आहे ? मी आपली सेवाचाकरी करतें म्हणून आपण माझ्यावर—"

नाहीं—विमले, तुझ्या सेवाचाकरीनें उपकारबद्ध होऊनच केवळ मी तुझ्यावर प्रेम करतों आणि त्याची फेड करतों, अशी कल्पना देखील तूं मनांत आणूं नकोस. तुझे मजवर अगणित उपकार झाले आहेत. आणि त्या उपकारांची फेड मला केव्हांहि करतां येणें शक्य नाहीं. मी तुझ्यावर प्रेम करूं लागलों तें केवळ तूं आपल्या नांवाप्रमाणें निर्मल प्रेमाला—निस्सिम प्रेमाला सर्वतोपरी योग्य आहेस म्हणूनच ! तुझ्या निर्मल नांवाचा निदिध्यास घेण्यास कोणाहि मनुष्यास मोठा अभिमानच वाटेल."

विमलेनें किंचित् हास्यमुद्रा करून आपली दृष्टि दिव्याकडे फिरविली. आज त्या दोघांच्या प्रेमाचा असा अकल्पित रीतीनें स्फोट झाला परंतु त्यांत त्यांना नवीन असें कांहीं वाटलें नाहीं. आपण एकमेकांवर पूर्वींपासूनच प्रेम करीत आहोंत असेंच त्यांना वाटलें; इतकीं त्यांची मनें परस्परांच्या सहवासांत तयार झालेलीं होतीं. क्षणभरानें दिव्याकडे अचल दृष्टीनें पहात विमला म्हणाली, "मजसारख्या मुलीचा अभिमान धरण्याइतकं माझ्यांत जास्त तें काय आहे ? उलट माझा सर्वांनीं तिरस्कारच केला पाहिजे. कारण मी कोण—काय ? माझी जात कोण ? माझे आईबाप कोण ? या सर्व गोष्टींचा ठाव ना ठिकाण ! असं असून माझ्यासारख्या पोरक्या व कुलशीलहीन मुलीला आपण इतकं महत्त्व देणं योग्य तरी आहे का ?"

"विमला, तुझ्या आचारविचारावरून तुझ्या कुलशीलाचा कोणालाही सहज उलगडा होण्यासारखा आहे. तुझें कुलशील थोरच असलें पाहिजे अशी माझी खात्री झाली आहे. आणि ह्या एका प्रश्नावरूनच बाकीच्या सर्व शंकांचें निरसन होण्यासारखें आहे."

"मग माझे आईबाप आणि जात कोण याबद्दल आपण काय तर्क बांधतां ?"

"तूं उच्चकुलोत्पन्न आहेस असेंच माझें मन मला ग्वाही देत आहे. परंतु

तें कांहीं असो, तुझ्या जातीचा किंवा तुझ्या आईबापांचा प्रश्न माझ्या इच्छेच्या आड येत नाहीं इतकी गोष्ट मात्र खरी ! मी जातीभेदाला मान तुकविणार नाहीं, हें लक्षांत ठेव. ”

“ पण मी धर्मांतर करणार—”

“ काय ? तूं धर्मांतर करणार ? ”

“ नाहीं. मी ह्या देहांत प्राण आहे तोंवर धर्मांतर करणार नाहीं अशी आपण खात्री ठेवा. आपण आपल्या अमृततुल्य वाणीनें मला एकसारखें आपल्या पवित्र धर्माचें ज्ञान देत असतांहि मी धर्मांतर करीन अशी अद्यापि आपणास शंका येते काय ? ”

“ मग तूं आतां काय म्हणालीस ? ‘ मी धर्मांतर करणार ’ असंच ना तूं म्हणालीस ? ”

“ मी काय म्हणत होतें तें पूर्णपणें ऐकून न घेतां माझ्या अर्धवट उच्चारिलेल्या वाक्याचा आपण अर्थविपर्यास मात्र केला. मी म्हणत होतें कीं, मी धर्मांतर करणार अशी आपणास भीति वाटून तसें होऊं नये म्हणून आपण—आपण—”

“ बोल—विमले अशी अडखळूं नकोस. बोल—तुझ्या मनांतून काय बोलावयाचें आहे तें मी समजलों. तूं धर्मांतर करूं नयेस म्हणून मीं हें सर्व प्रेमाचें प्रदर्शन करीत आहे, असें तुला वाटतें काय ?—छे ! छे ! विमले ! अशी कल्पना देखील तूं स्वप्नांत सुद्धां आपल्या मनाला शिवूं देऊं नकोस. पहा—हें पहा—” असें म्हणून नरसिंगरावानें तिचा हात धरला आणि तो आपल्या हृदयावर ठेविला. थोडावेळ तशा स्थितींत गेला. पुढें काय झालें असेल तें असो, विमला हळूहळू खालीं वाकली. तेव्हां पुनः तिच्या खांद्यावर हात ठेऊन तो पुढें म्हणाला, “ विमले, तुझ्याविषयीं ह्या हृदयांत वास करीत असलेलें प्रेम कोणत्या दर्जाचें आहे ? पहा—नीट पहा, नाहीं अद्यापि खात्री होत ? ”

एखाद्या मोहिनीमंत्रानें भारलेल्या व्यक्तीप्रमाणें विमलेनें आपलें डोकें हळूंच नरसिंगरावाच्या छातीवर टेकलें. जणुं काय नरसिंगरावाच्या प्रेमानें स्वतःच्या निस्सीमतेची साक्ष पटविण्याकरितां विमलेचें डोकें आपलेकडे आकर्षूनच घेतलें असून तें तिच्या कानांत कांहीं सांगत होतें.



## ११ बहिष्कार पत्र

ती सकाळची वेळ होती. नुकतेच सात वाजले होते. रामदेवराव ऊर्फ बापुसाहेब आपल्या दिवाणखान्यांत चहा घेत आणि नोकरांना हुकूम सोडीत बसले होते. आज नरसिंगरावाला घरीं आणावयाचें असल्यामुळें त्याची व्यवस्था लावण्याकडे त्यांचें लक्ष वेधलें होतें. त्यांनीं खालच्या मजल्यावर दिवाणखान्याशेजारीं असलेली एक प्रशस्त खोली त्याच्याकरितां तयार केली होती. आणि आतां त्या खोलींत आजारी माणसाला उपयोगी पडेल असें सामान पाठविण्याच्या विचारांत ते चहा घेत बसले होते. इतक्यांत पोष्टाचा शिपाई आला आणि त्यानें एक मोठा लखोटा त्यांच्यापुढें केला. लखोट्यावर त्यांचें नांव असून एका कोपऱ्यांत ओबडधोबड शिक्का मारिलेला होता. तो लखोटा त्यांनीं उलटा पालटा करून पाहिला परंतु तो कोणाकडून आला असावा याबद्दल त्यांचीं कांहींच कल्पना चालेना. लखोट्यावरील पत्ता सुंदर अक्षरांनीं मोडी लिपींत लिहिलेला होता. बापुसाहेबांनीं हातांतील चहाचा कप बाजूला ठेविला आणि तो लखोटा फोडला. आंत एक मोठा कागद होता. बापुसाहेबांनीं त्या कागदांतील मजकुरावरून दृष्टि फिरवतांच त्यांच्या कपाळाला आंठ्या पडल्या आणि क्षणभरानें त्यांची चर्या गंभीर दिसूं लागली. त्य अकल्पित मजकुरानें त्यांच्या मनाची फारच चमत्कारिक स्थिति झाली. त्यांनीं त्या कागदावर पुन्हां एक दोन वेळ नजर फिरविली परंतु विस्मयानें थक्क होण्यापलीकडे कांहींच घडलें नाहीं. अशा स्थितींत बराच वेळ त्यांच्या मुखांतून शब्द बाहेर पडला नाहीं. त्यांच्या हातांतील कागद केव्हां खालीं पडला याची देखील त्यांना आठवण राहिली नाहीं.

" हा काय नवीन घोटाळा उपस्थित झाला ! " आपल्या कपाळावरून हात फिरवीत बापुसाहेब स्वगत म्हणाले. " विमलेनें खिस्ती धर्मात जाऊन बाप्तिस्मा घेतला केव्हां ? आणि हें काय प्रकरण आहे ? " बापुसाहेबांनीं तो कागद जमिनीवरून उचलला आणि पुनः वाचण्यास सुरवात केली.

## श्रीशंकर.

### ( शिक्का )

स्वस्तिश्रीमत्समस्तसुरवृंदपूजितपादारविंदशिवप्रतिबिंबवर्यश्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यतद्वाक्यप्रमाणपारावारपारीणयमनियमासनप्राणायामप्रत्याहारध्यानधारणासमाध्यष्टाङ्गयोगानुष्ठाननिष्ठतपश्चक्रवर्त्यनाद्यविच्छिन्नगुरुपरंपराप्राप्तषड्दर्शनसंस्थापनाचार्यव्याख्यानसिंहासनाधीश्वरसकलनिगमागमागमसारहृदयसांख्यत्रयप्रतिपादकसकलनास्तिकमतोच्छेदपूर्वकसकलधर्मसंस्थापनैकधुरीणवैदिकमार्गप्रवर्तकसर्वतत्रस्वतन्त्रश्रीमहाराजधानीऋष्यशृङ्गपुरवराधीशश्रीमद्राजाधिराजगुरुमण्डलाचार्यश्रीमच्छङ्कराचार्यान्वयसञ्जाताभिनवपञ्चगङ्गातीरवासकमलानिकेतनकरवीरसिंहासनाधीश्वरश्रीसच्चिदानंदविद्यानृसिंहभारतीकरकमलकिंजल्कोद्भवश्रीमदभिनवसच्चिदानंदविद्याशंकरभारतीस्वामिकृतानि श्रीभाक्तसपरीवारच्छात्राणामनुदिनमेधमानभव्यजनकानि श्रीमच्छङ्करारधनावसरीयनारायणस्मरणानि.

---

* **टीप**—प्रस्तुत कादंबरींत विमलेवर बहिष्कारादि झालेला प्रकार वाचकांना काल्पनिक दिसत असला तरी हा सर्व प्रकार एका वस्तुस्थितीला धरून आहे. विमलेबद्दल कांहींएक चौकशी न करतां तिला ज्याप्रमाणें श्रीकडून बहिष्कार घालण्यांत आला आहे. त्याचप्रमाणें श्रीनामदेव शिंपी समाजांत एक गोष्ट घडली आहे. त्या गोष्टीचा त्रोटक इतिहास येणेंप्रमाणें—सन १८८० सालच्या सुमारास हुबळी मुक्कामीं पडलेल्या भयंकर दुष्काळांत लोक अन्नान्नदशेला लागले असतां आपल्या दोन मुलांना—चिंतामण आणि दुर्वास रामचंद्र कोपर्डे वय अनुक्रमें ७ व ९ वर्षें—घेऊन त्यांची आई मिशनरी लोकांनीं काढलेल्या दुष्काळ रिलीफ कामावर सर्व दिवस राबून कसेबसे दिवस काढीत होती. पुढें दुष्काळ संपल्यावर मुलांच्या मामानें त्याना घरीं आणलें. आणि मुलें मोठीं झाल्यावर त्यांचीं स्वजातींत लग्नें झालीं. त्यांचा संसार वाढला. नंतर चिंतामणीची बायको निवर्तली. तेव्हां दुसरें लग्न करण्याकरितां तो मुलीच्या शोधांत राहिला. एक मुलगी ठरली पुढें घेण्यादेण्याच्या बोलाचालींत एका क्षुल्लक गोष्टीवरून भांडण उपस्थित होऊन तें प्रकरण विकोपाला गेलें. त्यांत वधूपक्षाकडील एका व्यक्तीनें झालेल्या भांडणाचा सूड घेण्याच्या उद्देशानें श्रीकडे अर्ज केला आणि त्या अर्जांत चिंतामणी आणि दुर्वास हे दोघे भाऊ २७ वर्षांपूर्वी मिशनऱ्यांकडे

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजेश्री धर्माभिमानी धुरंधर प्रिय शिष्य समस्त ब्रह्मवृंद ज्योतिषी धर्माधिकारी मठाधिकारी पुरोहित, उपाध्ये, राजकीय गृहस्थ, सरदार, इनामदार, देसाई, देशमुख, देशपांडे, पाटील, कुलकर्णी, आदि मत्शिष्य राहाणार नगर यांसी विशेषस्तु—तुमचें कल्याण इच्छित श्रीनिकट असो. अत्रस्थ कुशल जाणोन स्वकीय लेखनी मानस संतोषवीत असलें पाहिजे. तदनंतर विमला नगरकर राहणार भिंगार हिनें खिस्ती धर्मात् जाऊन बाप्तिस्मा घेतला. त्याजबद्दल तिला बहिष्कारपत्र द्यावें म्हणोन अर्ज ता. १० मार्च सन १९१५ इसवी रोजीं केला तो संस्थानीं आम्हीं योग अंक $\frac{3}{१८३७}$ येथें दाखल आहे. त्यावरून मठसांप्रदायाप्रमाणें चौकशी करण्यांत येऊन आज्ञा करण्यांत येते कीं,—

विमला नगरकर हिनें खिस्ती धर्मांत जाऊन बाप्तिस्मा घेतला आहे. तो जरी अज्ञान असतां घेतला तरी तीस शुद्ध करितां येत नाहीं. सबब तिजबरोबर कोणीही अन्नोदकव्यवहार करूं नये. तसेंच संतोबा भिंगारकर कोष्टी यानें तिच्याशीं अन्नोदक केला आहे त्यामुळें तो दोषी आहे. या दोषाची निष्कृति करून घेऊन शुद्धीपत्र मिळवीपर्यंत त्याच्याशीं कोणीही अन्नोदकव्यवहार करूं नये. जोशी उपाध्ये यांनीं त्याचे घरती धार्मिक कृत्यें करूं नयेत. न्हावी यानें चाकरी करूं नये. याप्रमाणें आज्ञा होत आहे. याची प्रसिद्धी तुम्हीं आपले गांवीं व इतर जरूर त्या गांवीं करून अधर्म न वाढे असा बंदोबस्त ठेवावा. याची समज वरील आसामीस देऊन सही घ्यावी. व हें आज्ञापत्र आपले-

---

होते व ते बाटले आहेत असा उल्लेख केला. इकडे ही गोष्ट त्या दोघां भावांना कळतांच त्यांनीं अर्ज करून कोल्हापूरच्या ब्रह्मनाळकर स्वामीकडून शुद्धिपत्र मिळविलें. परंतु त्याला न जुमानतां किंवा वस्तुस्थितीची नीट चौकशी न करतां संकेश्वर मठाधिपतीनीं त्यांना बहिष्कार घातला. हा श्रीकडून झालेला अन्याय त्यांनीं सुधारावा म्हणून श्रीनामदेव समाजांतील पुढाऱ्यांनीं आज ४ वर्षें सतत प्रयत्न चालविले आहेत. माझे मित्र श्री. बाळकृष्ण नाना कोपर्डे यांनीं त्या बंधूंकरितां ज्ञातीच्या वतीनें अर्ज केले, नोटिशी दिल्या; त्याप्रमाणें श्री. बाळकृष्ण परशुराम महिंदरकर यांनीं स्वतः जाऊन संचारस्वारींत श्रीची भेट घेण्याचा प्रयत्न केला; परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. तेव्हां हे आमचे धर्माधिकारी न्यायी म्हणावे किंवा अन्यायी म्हणावे याचा वाचकांनींच विचार करावा.

**लेखक.**

जवळ ठेवावें. आणि आज्ञापत्राप्रमाणें तजवीज केल्याबद्दल विनंतिपत्रानें संचारस्वारीस कळवावें.

तुम्ही संस्थानचे पूर्ण स्वाभिमानी व अगत्यवादी आहां तेथें विस्तारें लिहावें असें नाहीं. विशेष लिहिणें तें काय. मिति चैत्र शुद्ध २ शके १८३७ तारीख १८ माहे मार्च सन १९१५ इसवी. मुक्काम दाभाडा तालुका मजगांव जि० नाशिक.

बार नंबर ५/१८३७

सही महानुशासनवरीवर्ती.

[ शिक्का ]

' हा इतका उपद्व्याप केला तरी कोणी ? विमलेला बाप्तिस्मा दिला कोणी आणि तिला बहिष्कार घालतांना संतोबाला देखील बहिष्कार घातला, तेव्हां ह्या शंकराचार्यांना म्हणावें तरी काय ?—छे बुवा ! याला कांहीं तरी तोड काढली पाहिजे. ' असें पुटपुटत बापुसाहेबांनीं एका नोकराला हांक मारिली आणि संतोबाना बोलावून आणण्यास सांगितलें. आज त्यांनीं नरसिंगरावाला घरीं आणण्याचा विचार केला होता; परंतु ही मध्येंच नवीन भानगड उपस्थित झाल्यामुळें त्याला आज आणावा किंवा नाहीं असाहि एक विचार त्यांच्या मनांत आला. त्यांनीं बराच वेळ विचार केला. शेवटीं संतोबा आल्यावर त्यांच्या विचरानें काय करावयाचें तें निश्चित ठरवावें असा विचार करून ते संतोबाच्या वाटेकडे डोळे लावून बसले. इकडे संतोबा मोठ्या विवंचनेंत पडले होते. आज नरसिंगराव त्यांच्या घरांतून जाणार असल्यामुळें त्याच्याबरोबर त्यांची बरीच प्राप्ति कमी होणार होती; त्यामुळें त्यांची स्थिति अगदीं वेड्या सारखी झाली होती. बापुसाहेबांचें त्यांना बोलावणें आलें, तेव्हां मात्र त्यांना थोडी आशा वाटूं लागली. वास्तविक ते स्वतः यावयाचे ते न येतां त्यांनीं आपणास बोलाविलें आहे, तेव्हां कदाचित् नरसिंगरावाला घरीं नेण्याचा त्यांचा विचार रहित झाला असावा असें त्यांना वाटलें. आणि ह्या विचारांत ते बापुसाहेबांच्या घरीं आले. दिवाणखान्यांत येतांच बापुसाहेब असे सचिंत बसलेले पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. त्यांच्यां चर्येंत बराच फरक पडला होता. संतोबांनीं नमस्कार करून एक खुर्ची जवळ ओढून घेतली. बराच वेळ झाला तरी बापुसाहेब कांहीं बोलले नाहींत तेव्हां संतोबांनींच सुरवात केली. ते म्हणाले, " मग काय, आज नरसिंगरावाला घरीं आणण्याचा बेत रहित केला वाटतं ?

" कोण सांगतं ?—त्याला तर आज येथें आणायचंच ! पण ही नवीन एक भानगड उपस्थित झाली आहे ती पाहिली काय ? " असें म्हणून बापुसाहेबांनीं शंकराचार्यांकडून आलेलें बहिष्कार पत्र त्यांच्यापुढें केलें. संतोबांनीं तें पत्र हातीं घेतलें आणि मनांतच वाचण्यास सुरवात केली.

" म्हणजे ! मला देखील प्रायश्चित्त घेतलें पाहिजे कीं काय ?—वा हा न्याय चांगला ? " संतोबा आश्चर्यानें म्हणाले.

" पण हा इतका खटाटोप केला कुणी ? तुम्हांला कांहीं अटकळ बांधतां येते काय ? "

संतोबा विचार करीत राहिले. त्यांचें मन अगदीं बावरून गेलें. नरसिंगराव गेल्यामुळें त्यांची एक प्राप्ति बंद होणार होती परंतु आतां हें बहिष्कारपत्र वाचून त्यांची काळजी दुणावली. शंकराचार्यांच्या बहिष्कारामुळें विमलेला आतां आपल्या घरीं राहतां येणार नाहीं त्यामुळें तिच्याकरितां बापुसाहेबांकडून होणारी प्राप्तीहि बंद होणार; शिवाय स्वतःला प्रायश्चित घेण्याकरितां कांहीं चट्टा बसणार ! ह्या स्वतःविषयींच्या विचारांत ते बापुसाहेबांनीं विचारलेला प्रश्नहि साफ विसरून गेले. शेवटीं पुष्कळ वेळ त्यांचें उत्तर येत नाहीं असें पाहून बापुसाहेबांनीं त्यांना पुनः विचारलें. तेव्हां ते अडखळत कांहीं तरी बोलूं लागले. तें पाहून बापुसाहेब म्हणाले, " संतोबा, तुमच्या मनाची अशी स्थिति होणें साहजिकच आहे. आपल्या विमलेनें खिस्ती धर्मांत जाऊन बाप्तिस्मा घेतला नाहीं ही गोष्ट सत्य आहे. तेव्हां तुम्हांला भिण्याचें कांहीं कारण नाहीं. तूर्त आपण विमलेला कांहीं दिवस दूर ठेवूं आणि हा उपद्याप कोणी केला आहे याचा शोध करून शंकराचार्यांची खात्री करूं म्हणजे झालें ! "

याप्रमाणें त्यांच्या गोष्टी चालल्या होत्या. परंतु विमलेला ह्या भडकलेल्या वातावरणाचा कांहीं मागमूस लागला होता काय ?—होय. गेल्या दोन दिवसापूर्वी रात्रीं नरसिंगरावाच्या बरळण्यानें त्याचा प्रणयस्फोट झाल्यापासून त्यानें विमलेच्या सहवासांत ते दोन दिवस मोठ्या सुखांत घालविले. परंतु आज सकाळपासून विमलेच्या मनाची एकाएकीं चलबिचल झाली. ' मी तुला मामाच्या घरीं उद्यां नेईन. असें आदल्या दिवशीं नरसिंगरावानें तिला सांगितलें होतें. शिवाय नरसिंगरावांची शुश्रूषा करण्याकरितां बापुसाहेबही आपणास घरीं नेतील अशी तिला खात्री वाटत होती. आणि त्या विचारांतच

ती रात्रीं झोंपली. परंतु सकाळीं उठतांच तिचें मन एकाएकीं उद्विग्न झालें. नरसिंगरावाच्या मनाचीही जवळ जवळ तशीच स्थिति झाली होती. परंतु त्यानें आपल्या मनाची समजूत करून घेतली. आपण इतके दिवस येथें काढले आणि आज आपण येथून जात आहोंत म्हणूनच आपल्या मनाची अशी स्थिति झाली आहे असें वाटून त्यानें आपल्या मनाच्या स्थितीकडे दुर्लक्ष केलें. विमलेला मात्र तशा रीतीनें आपल्या मनाचें समाधान करून घेतां आलें नाहीं. आज कांहींतरी विलक्षण प्रकार घडणार आहे, असेंच तिला सकाळीं उठल्यापासून वाटूं लागलें. तिनें खालीं येतांच प्रथम भवानीबाईकडे नीट न्याहाळून पाहिलें. परंतु तिची चर्या तिला शांत आणि नेहमींप्रमाणेंच दिसली. त्यामुळें तिची भीति बरीच कमी झाली. कारण भवानीबाई म्हणजे दुसरी महाकालिका तोफच! तिनें विमला घरीं आल्या-पासून एक दोनदां आपलें खरें स्वरूप प्रगट केलें होतें, तेव्हांपासून तिच्या-विषयीं विमलेच्या मनांत भीतीनें ठाणें दिलें होतें. संतोबांच्या चर्येत तिला किंचित् चिंतेची छटा दिसून आली परंतु त्याबद्दल तिला विशेष असें कांहींच वाटलें नाहीं. नंतर ती पुनः वर आली आणि तशाच चौकस दृष्टीनें खाटेवर पडलेल्या आपल्या प्रियकराकडे तिनें दृष्टि लाविली.

"विमले, आज तूं अशी बावरलेली का दिसूं लागली आहेस? तुझें मुखकमल आज नेहमींप्रमाणें प्रफुल्लित दिसत नाहीं याचें कारण काय? तुला आमच्या मामांच्या मुलीची—कमलेची आतांपासूनच भीति वाटूं लागली आहे कीं काय? तूं मजबरोबर तेथें आल्यावर ती तुझ्याबरोबर सरळ रीतीनें वागणार नाहीं ही गोष्ट खरी. कारण ती चढेल, हट्टी आणि मिजासखोर पोर आहे, परंतु तिच्याशीं तुला काय करावयाचं आहे? आपण दोघें एकत्र असल्यावर आपणाला तिच्या वर्तनाचा विचार करण्याची काय जरूर?"

"पण बापुसाहेब मला तुमच्याबरोबर घरीं नेतील तेव्हां ना?"

"तुला जर नेलं नाहीं तर मग नर्सचं काम कोण करील? ती फ्याशनेबल पोर माझ्या खाटल्याला तरी उभी राहील काय? आणि माझं औषधपाण्याचं काम मामांच्या नोकराचाकरांकडून तरी होईल काय? आतां गेले तीन चार आठवडे रात्रंदिवस माझ्या शुश्रूषेचं त्रासदायक काम करून तुला जर कंटाळा आला असेल तर—अरे, पण हें काय? तूं रडायला काय लागलीस? विमले, तूं अशी कशी अगदींच वेडी!" असें म्हणून नरसिंगरावानें तिचा हात

धरून तिला जवळ ओढलें. त्यानें 'तुला कंटाळा आला असेल—" इतकें वाक्य उच्चारिलें न उच्चारिलें तोंच कोमल मनाच्या विमलेला भडभडून आलें. तिच्या नेत्रांतून खळकन् अश्रुधारा सुरू झाल्या. थोडावेळ तिची समजूत केल्यावर तिचा दुःखावेग आवरतांच ती अस्फुट शब्दांत म्हणाली, "हें काय गडे ! आज तुम्ही भलतंच बोलूं लागला ! मला ह्या पवित्र चरणांची चाकरी करण्याचा कधींतरी कंटाळा येईल काय ? तुम्ही हें असं भलतंच नका गडे बोलत जाऊं !"

त्यांच्या विनोदांत अडथळा आणण्याकरितांच कीं काय त्यावेळीं संतोबांना बोलावून नेण्याकरितां बापुसाहेबांचा नोकर तेथें आला. संतोबा निघून गेल्यावर कांहीं वेळानें पोष्टाचा शिपाई आला आणि त्यानें संतोबाच्या नांवाचा एक मोठा लखोटा दरवाजांतून आंत फेंकून दिला. विमलेनें तो उचलून घडवंचीवर ठेविला. नंतर ती आपल्या उद्योगाला लागली. बापुसाहेबानी आदल्या दिवशीं सांगून ठेविल्याप्रमाणें ते आज आठ वाजतां गाडी घेऊन येणार होते. तितक्या अवधींत नरसिंगरावानें आपले सर्व प्रातर्विधी आटोपून तयार रहावयाचें होतें. विमलेनें ती सर्व व्यवस्था केली तथापि तिच्या मनाची रुखरुख मात्र कमी होईना. साडेआठाच्या सुमारास बापुसाहेब आणि संतोबा आले. गाडी दरवाजाजवळ उभी राहतांच विमलेचें अंतःकरण धड्धड् उडूं लागलें. आज आपल्या मनाची ही अशी विलक्षण स्थिति कशानें झाली याची तिला कांहींच कल्पना होईना, बापुसाहेब आणि संतोबा आत येतांच त्या दोघांची दृष्टी एकदम त्या घडवंचीवर ठेविलेल्या लखोट्यावर गेली. बापुसाहेबांनीं तो लखोटा कशाबद्दल आहे हें तात्काळ ओळखलें. आपणास शंकराचार्यांकडून आलेल्या आज्ञापत्रात उल्लेख केल्याप्रमाणें हें त्यांच्याकडून आलेलें बहिष्कारपत्रच आहे, असें जाणून त्यांनीं तो लखोटा उचलला. दोघेही पलीकडच्या खोलींत गेले आणि तेथें बापुसाहेबांनीं तो लखोटा फोडला. त्यांत विशेष असें कांहीं नसून बापुसाहेबांना आलेल्या आज्ञापत्राप्रमाणें तें एक आज्ञापत्र असून त्यांत फक्त थोड्या बहुत शब्दांचा फरक होता. 'विमला ख्रिस्तीधर्मांत जाऊन तिनें बाप्तिस्मा घेतला आहे सबब तिला शुद्ध होतां येत नाहीं म्हणून बहिष्कार घातला आहे. आणि तुम्हीं—संतोबानें तिच्याबरोबर अन्नोदकव्यवहार केल्याबद्दल प्रायश्चित्त घेऊन शुद्ध व्हावे नाहींतर तुम्हाला बहिष्कार घालण्यांत येईल' अशा अर्थाचा तो

मजकूर होता. पुष्कळ वेळ ते त्या खोलींत बसून पुढें काय करावयाचें याचा विचार करीत होते. पुढें विमलेची काय व्यवस्था करावयाची तें त्यांनीं ठरविलें. नंतर बापुसाहेब बाहेर आले.

नरसिंगरावाची सर्व तयारी झाली होती. बापुसाहेब गाडी घेऊन आले आहेत. हें त्याला कळलें होतें आणि तो विमलेला तयार होण्याकरितां सांगत होता. परंतु जाण्याकरितां आपण तयार व्हावें असें तिला वाटेना! बापुसाहेब वर आल्यानंतर त्यांची गडबड सुरू झाली. प्रथम त्यांनीं नरसिंगरावाची चौकशी करून बरोबर कोणकोत्या वस्तु न्यावयाच्या तें त्याला विचारलें आणि नंतर त्याला उचलून खाली नेण्याकरितां आपल्या नोकरांना हांक मारिली. हा इतका प्रकार होईपर्यंत बापुसाहेबांनीं चुकून सुद्धां विमलेकडे पाहिलें नाहीं. तिच्या डोळयाला डोळा देण्याचें त्यांना धैर्यच होत नव्हतें. वर मान करून तिच्याकडे पाहण्यास त्यांना कोणती भीति वाटत होती त्याच कारण त्यांचें त्यांनाच ठाऊक!

" विमला, तूं अद्यापि तयार होत नाहींस याचा अर्थ काय? तुझ्या मनातून यावयाचें नाहीं कीं काय?" जवळच उभी असलेल्या विमलेकडे पहात नरसिंगराव म्हणाला.

" अरे नरसिंगा, आतां तिला येथेंच राहूं दे. प्रथम तूं चल. मग करूं आपण तिची व्यवस्था!" त्याच्याकडे पहात बापुसाहेब म्हणाले.

" पण मामा, तिला कांहीं आतां जास्त वेळ नाहीं लागायचा! आहे अनायासें गाडी तेव्हां येईल ती आपल्या बरोबरच!

" छेरे! तिला नाहीं नेतां यावयाचं! तिच्या संबंधानें थोडी भानगड झाली आहे तेव्हां तिला आपल्या घरीं नेतां यावयाचं नाहीं. तूं आतां चल मग घरीं तुला मी सर्व कांहीं सांगतों." बापूसाहेबांचें हें संशयात्मक भाषण ऐकून नरसिंगराव त्यांच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागला. क्षणभरानें त्यानें बाजूला वळून विमलेकडे पाहिलें तों तिचीहि स्थिति चमत्कारिक झालेली त्याला दिसली. बापुसाहेबांच्या भाषणानें तिच्या कोमल मनाला धक्का बसला. परतु त्या दोघांच्या स्थितीकडे दुर्लक्ष करून बापुसाहेब पुढें म्हणाले, " हं–नरसिगा आटप लवकर!" इतकें बोलून ते बाहेर पडले. विमला तेथें उभी असल्यामुळें तिच्याजवळ बराच वेळ उभे रहाण्यासहि त्यांना जड वाटूं लागलें.

बापुसाहेबांना विमलेची इतकी दहशत का बसली होती! याचें उत्तर आज

जरी आपणास देतां येत नाहीं; तरी नरसिंगरावाला त्याबद्दल थोडा संशय आला होता. तो संतोबाच्या घरीं येऊन राहिल्यापासून जवळ जवळ वीस पंचवीस दिवसांत बापुसाहेबांच्या तितक्याच फेऱ्या तेथें झाल्या होत्या. परंतु चुकूनसुद्धां त्यांनीं विमलेबरोबर भाषण केलेलें त्यानें पाहिलें नव्हतें. इतकेंच नव्हे तर प्रत्येक वेळीं ते विमलेला चुकवितात हेंहि त्याच्या लक्षांत आलें होतें. परंतु ह्या गोष्टीचा त्यानें आतांपर्यंत विचार केला नव्हता. आज मात्र त्याच्या संशयाचा एकदम अतिरेक झाला. विमलेजवळ आपलें प्रणयी अंतःकरण उघड करण्यापूर्वी इतर दिवसांप्रमाणें जर तो एक दिवस असता आणि अशा एखाद्या दिवशीं बापुसाहेब वरील प्रमाणें संशयात्मक भाषण करते, तर त्यानें कदाचित् तिकडे दुर्लक्ष केलें असतें. परंतु आजचा दिवस मात्र तसा नव्हता. बापुसाहेबांचें भाषण ऐकून त्याला चमत्कारिक वाटलें आणि तो गप्प राहिला. परंतु विमलेची ती केविलवाणी मुद्रा दृष्टीस पडतांच बापुसाहेबांकडून त्यांच्या भाषणाचा आतांच उलगडा करून घ्यावा असा त्याचा तात्काळ निश्चय ठरला. तो प्रश्न विचारणार तोंच त्याला बोलण्याची अवधी न देतां बापुसाहेब बाहेर निघून गेले, हें वर सांगितलेंच आहे. ते निघून गेल्यावर किंचित् वेळ गेला. बापुसाहेब गेले त्याच दरवाजाकडे नरसिंगराव अद्यापि पहात होता. इतक्यांत विमलेनें इतका वेळ मोठ्या कष्टानें दाबलेला आपला दुःखाचा हुंदका बाहेर पडला. नरसिंगरावानें चटकन् आपली दृष्टि तिच्याकडे फिरविली. ती त्याच्या बिछान्यापासून थोड्या अंतरावर खिडकीजवळ उभी होती. त्यावेळीं ती जर त्याच्या जवळ असती तर तिला त्यानें चटकन् आपल्या बाहुपाशांत घेऊन तिचें शांतवन करण्याचा प्रयत्न केला असता. परंतु ती दूर उभी होती आणि तिच्याजवळ उठून जाणें त्याच्या स्वाधीन नव्हतें.

" विमला आज तूं हें असं काय करतेस ? सकाळपासून तुझं चित्त ठिकाणावर नाहीं. तूं आज कसल्या तरी विचारांत आहेस ? तुला असं काय वाटतं तें मला सांग. " परंतु उत्तराऐवजीं ती जास्त जास्त हुंदके देऊं लागली. तिची छाती इतकी भरून आली कीं, एका मागून एक बाहेर पडणारे हुंदके अडखळूं लागले.

" माझ्या संबंधानें कसली भानगड निघाली ? " पुष्कळ वेळानें आपला दुःखावेग कमी झाल्यावर डोळे पुशीत विमला हुंदके देत देत म्हणाली,

" सकाळपासून माझ्या मनाला रुखरुख वाटत होतीच. आणि आतां मला त्याची प्रचीति आली.—मी असं काय केलं ? देवा, माझ्याकडून असा काय अपराध घडला ? माझा दुर्दैवांत जन्म झाला आणि मी अशीच जन्मभर दुर्दैवांत रहाणार काय ?—"

" विमला, हें तूं काय बोलतेस ? इतक्यांत तूं मला विसरलीस काय ? माझा तुला विश्वास नाहीं काय ? मी तुला दुखांत ठेवीन असं का वाटतं ?"

" मला काय वाटतं तें मी आपणाला काय सांगूं ! पण आपली आतां ह्यापुढें भेट होणार नाहीं असंच मला वाटूं लागलं आहे. माझं कोणतं तरी दुर्दैव उभं राहून तें आतां आपल्या मार्गांत आडवं येत जाईल असेंच माझें मन आतां मला सांगूं लागलें आहे. सकाळपासून माझें मन चलबिचल झालें होतें, त्याचें कारण आतां हें बापुसाहेबांचें भाषण ऐकून माझ्या लक्षांत आलें. मी जन्मतःच दुर्दैवी ! माझ्याबद्दल कांहीं भानगडी उत्पन्न झाल्या असतील, किंवा पुढें होतील त्याबद्दल मी माझ्या दुर्दैवी नशिबाशिवाय दुसऱ्या कुणाला बोल लावूं ?" विमला आतां स्पष्ट बोलूं लागली होती. परंतु तिनें आपले सर्व विचार प्रगट करण्यापूर्वीच बापुसाहेबांनीं पाठविलेले चार नोकर आंत आले. आणि नरसिंगरावाला नेण्याची घाई करूं लागले. 'तुम्ही प्रथम मामांना येथें पाठवा' असें त्यानें दोन चारदां त्या नोकरांना सांगितलें. त्याप्रमाणें बापुसाहेबांना बोलावण्याकरितां एक नोकर दोनदां बाहेर गेला. परंतु बापुसाहेब आंत आले नाहींत. शेवटीं नरसिंगरावाचा अगदीं नाइलाज झाला. आपण मामांच्या घरीं जाऊंच नये. असाहि विचार त्याच्या डोक्यांत आला. विमला अगदीं स्तब्ध उभी होती. तिचें मन जितकें कोमल आणि प्रेमळ होतें, तितकीच ती निश्चयी होती. आपणामुळें नरसिंगरावांच्या मनाची स्थिति द्विधा झाली आहे, हें तिच्या लक्षांत आलें. ती क्षणभरानें पुढें झाली आणि आपलें दुःख, चिंता वगैरे सर्व विकार दाबून हळूच म्हणाली, " मजकरितां आपण आपल्या मनाला दुःख करून घेऊं नका. येथल्यापेक्षां तेथें आपली बरदास्त चांगली राहील. शिवाय आपण आपल्या मंडळींत गेल्यावर आपलें मन रमेल व आपण लवकर बरे व्हाल."

" शक्य नाहीं. विमले, तुझ्याशिवाय त्या शून्य घरांत माझं मन रमेल असं तुला वाटतं काय ?"

विमलेनें उत्तर दिलें नाहीं. ती पुनः खालीं मान घालून स्तब्ध उभी

राहिली. तितक्यांत बापुसाहेब घाईघाईनें आंत आले, आणि म्हणाले, "अरे तुम्ही अद्यापि येथेंच उभे ? हं—चला, उचला त्याला अगदीं हळू. तू त्याच्या मानेखालीं हात घाल. नीट सांभाळून उचला. त्याच्या पायाला धक्का लागेल—" बापुसाहेबांची ही गडबड कां चालली होती हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. आपण विमलेला टाळून नरसिंगरावासह केव्हां एकदां घरीं जातों असें त्यांना झालें होतें. नोकर त्याला उचलूं लागले तेव्हां तो म्हणाला, "मामा, इकडे या. मला असें संशयांत ठेवूं नका. तुम्हीं आतां विमलेविषयीं काय काय बोललांत तें मला नीटसें कळलें नाहीं. तिला आपल्या घरीं यावयाला काय हरकत आहे ?"

"अरे वेड्या ! हरकत कसली ? आणि मी तिच्याविषयीं काय बोललों ? तूं प्रथम घरीं चल. मग आपण तिला सावकाश आणूं !—हं उचला पाहूं. सांभाळा; नीट धरा. जिना उतरावयाचा आहे—"



## १२ अंमलबजावणी

"तूं कोण बायको आहेस, कीं हडळ आहेस ? आहेस तरी कोण ?"

बापुसाहेबांनीं नरसिंगरावाला घरीं नेल्यावर संतोबा आपल्या पत्नीजवळ आले आणि त्यांनीं श्रीशंकराचार्यांकडून आलेल्या बहिष्कारपत्राची तिला हकीकत सांगितली, त्याबरोबर तिचें पित्त खवळलें. कांहीं एक न करितां न सवरतां आपणास हें प्रायश्चित्त घ्यावें लागणार असें पाहून ती रागानें म्हणाली, "तरी मी पहिल्यापासून कानीं कपाळीं ओरडत होतें, पण नाहीं ! माझं ऐकावं कुणी ? कोण ती सटवाई घरांत आणली आणि शेजाऱ्यापाजाऱ्यांत आपली शोभा करून घेतली, म्हणे ती पोरकी आहे; तिच्यापासून आपल्याला फायदा आहे, अशा माझ्याजवळ मत्रा गोष्टी केल्या. आतां घ्या हा फायदा. त्या बाटलेल्या पोरीला घरांत आणून ठेवण्याची तुम्हांला काय जरूर पडली होती ? बापुसाहेबांनीं पुष्कळ सांगितलं पण माणसानं आपला पुढला मागला विचार करावयाचा कीं नाहीं ? आतां म्हणावं त्या बापुसाहेबांना, घ्या तुम्ही हें प्रायश्चित्त !. ते श्रीमंत झाले तर ते आपल्या घरचे. त्यांना कांहीं आहे का ह्या गोष्टीचं सुखदुःख ! मात्र निस्तरावं लागतं आम्हांला ! आतां ही गोष्ट

शेजारींपाजारीं कळली कीं, तोंड तरी वर करूं देतील का? कुठली आली ही अवदसा आमच्या घरीं आणि केला आमचा सत्यानाश!"

"तूं कोण बायको आहेस, कीं हडळ आहेस? आहेस तरी कोण? तुझ्या जिभेला कांहीं तरी हाड!" तितक्याच रागांत संतोबा वर लिहिलेले शब्द म्हणाले.

आतां ह्यापुढें एक क्षणभरहि विमलेला आपल्या घरीं ठेवणें शक्य नाहीं ही गोष्ट संतोबा समजून चुकले. तिची आजच्या आज कांहीं तरी व्यवस्था लाविली पाहिजे, नाहींतर आपली बायको त्या गरीब निरपराधी पोरीला चवताळलेल्या वाघिणीप्रमाणें फाडफाडून खाईल, अशी त्यांची खात्री होती. परंतु विमलेला अशी एकदम नेऊन ठेवावयाची तरी कुठें? हा एक त्यांच्यापुढें मोठा कठीण प्रश्न होता. आपण बायकोला सांगून तिच्या संमतीने विमलेची कांहीं तरी व्यवस्था लावूं असा त्यांचा विचार होता. आणि त्याप्रमाणें त्यांनीं तिला सर्व हकीगत शांतपणानें सांगितली. परंतु त्याचा परिणाम अगदीं उलट झाला. भवानीबाईनें एखादी युक्ति सुचविण्याऐवजीं उलट तीच त्यांच्यावर घसरली. आतां पुढें काय करावें याचा विचार करीत ते तेथेंच स्वयंपाकघराच्या दरवाजाजवळ उभे राहिले. तेव्हां हातांतील भांड्यांची आदळआपट करीत भवानीबाई म्हणाली, "माझ्या जिभेला हाड नाहीं. पण ती हडळ आली आहे घरांत तुमचीं हाडं ठेचायला. त्याचा कांहीं विचार करा! मी आतां साफ सांगतें, ती हडळ जर ह्या घरांत राहील तर मी क्षणभरहि येथें पाणी पिण्याला राहणार नाहीं. माझ्या घरीं मला ह्या सटवाईचा कशाला सासुरवास हवा आहे? उलथून का जाईना मसणांत! तुम्हाला जर नसेल धीर होत तर मी तिचा हात धरून तिला घालवून देतें आतांच्या आतां घराबाहेर! मरेना का ती! मेली तर थोडंच येणार आहे घरांत सुतक! चांडाळीण, कुणाची कोण, आणि आली आमच्या घरादारावर वरवंटा फिरवायला!—व्हा दूर— आतां जातें आणि झिंज्या धरून देतें घराबाहेर घालवून!—काय करूं आणि कसं करूं म्हणून बसले आहेत विचार करीत! आतां कसला करायचा विचार! करायचा तेव्हां नाहीं केला विचार आणि आतां बसले आहेत डोकें खाजवीत! व्हा पलिकडे. जाऊं द्या मला बाहेर—"

"अग हो! पण चाललीस कुठें?"

"चाललें तुमच्या विमलाबाईला येसूख्रिस्ताच्या कळपांत सोडायला!"

खवळलेल्या बायकोचें हें उत्तर ऐकून संतोबांना एकदम एक विचार सुचला. क्षणभरच त्यांनीं सुचलेल्या विचारांचें मनन केलें आणि ते म्हणाले, " हें पहा, आतां झालं तें होऊन गेलं ! आतां उगाच डोकं पिकवून घेण्यांत काय अर्थ आहे ? मी आतां विमलेला आपल्या घरांत तर कांहीं ठेवीत नाहीं, त्याविषयीं तूं काळजी करूं नकोस. पण थोडावेळ थांब. मी आतां बाहेर जाऊन येतों. पण तोंपर्यंत तूं आपल्या तोंडाला कुलुप लावशील का ?—"

" का—का—पण ? मला कांहीं कोणाची चोरी आहे ? इतके दिवस कुलुप लाविलं—गप्प राहिलें, म्हणून तर ही अवदसा घरांत शिरली ? "

" तूं आतां तशी ऐकणार नाहींस ! " असें म्हणून संतोबा बाहेर पडले आणि दरवाजाला बाहेरून कडी लावून म्हणाले, " बैस आतां आंत कोकलत ! "

आपल्या बायकोला स्वयंपाकघरांत कोंडून संतोबा तडक घराबाहेर पडले. इकडे भवानीबाई मोठमोठ्यानें त्रागा करीतच होती. हा सर्व प्रकार विमला माडीवरून पहात होती. नरसिंगरावाला उचलून नेल्यावर ती खिडकीजवळ जाऊन त्याची गाडी दृष्टीआड होईपर्यंत तेथें उभी होती. नंतर जवळच्या खुर्चीवर बसून ती सकाळपासून घडलेल्या गोष्टींचा विचार करूं लागली. आतां तिला ती खोली अगदीं भयाण वाटूं लागली. त्या रिकाम्या पडलेल्या बिछान्याकडे पाहून तिचें मन शून्याकार होई. आतां आपली आणि आपल्या प्रियकराची भेट होणें फार कठीण असा तिच्या मनाचा ठाम ग्रह झाला आणि यदाकदाचित् भेट झालींच तर ती औपचारिक भेट होईल असें आतां तिला वाटूं लागलें. हळुहळू नरसिंगरावाच्या विचारांनीं तिचें मन भरून टाकिलें. अपघात झाल्यादिवसापासून घडलेली प्रत्येक गोष्ट ती क्रमशः आठवूं लागली. शेवटीं विचार करतां करतां परस्परांनीं परस्परांना आपापल्या प्रेमाची ओळख दिली, त्या प्रसंगाची तिला आठवण होतांच तिचें सर्व शरीर रोमांचित झालें. किंचित्कालच का होईना. ती त्या सुखमय विचारांत देहभान विसरून गेली. अशा रीतीनें ती सुखस्वप्न अनुभवित असतां खालीं स्वयंपाकघरांत भवानीबाईचा कडकडाट एकदम सुरू झाला. अर्थात् विमलेचें सर्व लक्ष खालीं चाललेल्या सरबत्तीकडे वेधलें. भवानीबाईनें उच्चारिलेला प्रत्येक शब्द तिला स्पष्ट ऐकूं आला. तिनें आपणावर एकाएकीं असा गहजब कां करावा याचें कारण तिच्या लक्षांत येईना. संतोबा निघून गेल्यावर तिनें बराच वेळ त्या गोष्टीचा विचार केला. शेवटीं आईलाच जाऊन विचारावें म्हणजे कळेल

असें ठरवून ती जड पावलांनीं हळुहळू खालीं आली. आपणाबरोबर आईचे दोन शब्द होऊं नयेत म्हणून मुद्दाम बाबांनीं दरवाजा बंद करून घेतला आहे, याची तिला कल्पनाहि न होतां तिनें चटकन् दरवाजा उघडला.

" आई, तूं आज अशी—"

" आई गेली चुलींत ! सटवे, तुला मी हजारदां सांगितलं, मी तुझी आई नाहीं आणि मला तूं आई म्हणून हांक मारूं नकोस. कुठें उलथून पडली तुझी आई ती शोधून काढ आणि बैस तिच्या नांवानें ' आई आई ' हाका मारीत. काय निलाजरी सटवी ! "

" पण आ—पण झालं तरी काय ? माझ्या हातून असा काय अपराध झाला ? मी पदर पसरतें, पण—"

"—दूर हो. चांडाळणी, गाजिवलेस तेवढे प्रताप पुष्कळ झाले. आतां नको आणखी आमचे धिंडवडे काढूं ! "

" मी पाया पडतें—माझ्या हातून कांहीं नकळत झालेला अपराध—"

" नकळत झाला काय अपराध ! अग + + , चांगली धडधडीत येसूच्या कळपांत जाऊन बाटलीस आणि नकळत म्हणतेस काय ? पहा—डोळे फाडून पहा, ह्या पत्रांत काय आहे तें ! दिसायला कशी गोगलगाय पण सटवीनें आमच्या अब्रूवर, संसारावर आणि घरादारावर वरवंटा फिरविला ! "

भवानीबाईनें अंगावर फेंकलेला तो लखोटा विमलेनें उचलला आणि उघडून वाचला. त्याबरोबर एका क्षणांत तिला सर्व गोष्टीचा स्पष्ट उलगडा झाला. धर्मांतर केलें नसतांहि आपण बाप्तिस्मा घेतला असा आपला गैरसमज करून घेऊन शंकराचार्यांनीं आपणास बहिष्कृत केलें आहे व आपणाबरोबर व्यवहार ठेविल्याबद्दल संतोबांस प्रायश्चित्ताची सजा दिली आहे हें वाचून तिला अतिशय वाईट वाटलें. आतां जास्त बोलण्यांत किंवा भवानीबाईबरोबर जास्त वादविवाद करण्यांत अर्थ नाहीं असा विचार करून ती मागें वळली. तेव्हां भवानीबाई वस्कन् ओरडून म्हणालीं, " आतां चालती हो—आतांच्या आतां आमच्या घराबाहेर चालती हो ! तुझं काळं थोबाड मला आतां दृष्टीसमोर नको. घातलीस आमच्या गळयांत घोरपड तेवढी पुष्कळ झाली ! आतां बया, तुला हात जोडतें पण आतां घरांत येणं होण्यापूर्वी तूं आपला रस्ता सुधार. तुला आतां चारी दिशा मोकळ्या आहेत. तुला वाटेल तिकडे जा, नाहींतर मसणांत जाऊन पड पण एकदाची आमच्या घरांतून जा."

विमला अगदीं स्तब्ध राहिली. तिनें भवानीबाईला तोंड द्यावयाचें नाहीं असा निश्चय केला. सकाळीं नरसिंगराव जातांना बापुसाहेबांचें संशयात्मक भाषण ऐकून तिच्या मनाची जी ओढाताण झाली होती, त्या सर्व गोष्टींचें कारण आतां तिला चांगलें कळलें. 'विमलेविषयीं कांहीं भानगड झाली आहे म्हणून तिला आपल्या घरीं नेतां यावयाचें नाहीं' ह्या बापुसाहेबांच्या वाक्यांचा खरा अर्थ आतां तिला कळला. इतका वेळ कारण न कळल्या-मुळें तिच्या मनाची झालेली चलबिचल, आतां खरें कारण कळतांच शांत झाली. आतां पुढें काय करावयाचें याचा विचार ती करूं लागली. तिला ह्या थोड्या दिवसांच्या परिचयावरून भवानीबाईचा स्वभाव चांगला ठाऊक झाला होता. तेव्हां अशा स्थितींत आपण तिच्या दृष्टीसमोर ह्याच घरांत वावरणें आपणाला त्रासदायक होईल, हा विचार तिच्या मनांत येऊन ती मोठ्यां विवंचनेंत पडली. आतां ह्या घरांत रहावयाचें नाहीं, असा तिनें निश्चय केला खरा; परंतु जावयाचें कुठें, हा एक मोठा बिकट प्रश्नच होता. इकडे भवानीबाईच्या तोंडाचा पट्टा सारखा सुरूच होता. कांहीं वेळानें ती तशीच बडबड करीत घागर घेऊन नळावर गेली, तेव्हां विमला तेथून हळू-हळू माडीवर आली आणि त्या शून्यवत् झालेल्या खोलींत विचार करीत खिडकीजवळ बसली. थोड्या वेळानें रस्त्यांवरून संतोबा परत घरीं येत अस-तांना तिच्या दृष्टीस पडले. ते देखील आपल्या पावलाकडे पहात विचार करीतच येत होते. आजचा दिवस खरोखरीच त्यांना मोठा संकटाचा वाटत होता. ते घरीं आले त्यावेळीं भवानीबाई नळावर गेली होती, त्यामुळें स्वयं-पाकघराचा दरवाजा उघडा होता तरी ती त्यांच्या दृष्टीस पडली नाहीं. ते क्षणभरच तेथें उभे राहिले. आपण बाहेरून दरवाजा बंद केला असतां तो कोणी उघडला असावा असा एक विचार त्यांच्या मनांत आला; परंतु ते फार वेळ तेथें विचार करीत उभे राहिले नाहींत, त्यांना आतां एक मोठें काम करावयाचें होतें. ते हळुहळू वर आले. विमला त्यांचीच वाट पहात होती. ते आंत येतांच प्रथम त्यांनीं विमलेकडे चौकस दृष्टीनें पाहिलें. परंतु त्या निश्चयी व विचारी मुलीची मुद्रा अगदीं शांत दिसत होती. आणि त्यावरून तिच्यावर कोणतें संकट आलें आहे याची अद्यापि तिला कांहींच माहिती नसावी, असें वाटून ते सौम्य शब्दांत म्हणाले, "तुला एक अत्यंत वाईट गोष्ट सांगण्याची मजवर पाळी आली आहे. मी आतां तुला जें सांग-

णार आहे, तें ऐकून तुझ्या कोमल मनाला अत्यंत दुःख होईल पण माझा अगदीं निरुपाय झाला आहे."

"बाबा, तुम्ही मला काय सांगणार ती सर्व गोष्ट मला कळली आहे. ह्या एका पत्रावरून मला त्या सर्व गोष्टी कळून आल्या आहेत." असें शांतपणें म्हणून विमलेनें हातांतील बहिष्कारपत्र पुढें केलें.

"हें तुझ्याजवळ कसें आलें ?"

"मला तें आतां आई—आईनें दिलें."

"मग ती तुला फार बोलली असेल. विमला, तूं फार समजुतदार आहेस. तुला तिचा स्वभाव माहीत आहे. ती तुला नाहीं नाहीं ते शब्द बोलली असेल, त्याचा तूं राग धरूं नकोस. माझें तुझ्यावर किती प्रेम आहे, हें तूं विसरूं नकोस."

"बाबा, तुम्ही मला जन्म दिला नाहीं, तरी माझ्या जन्मदात्यापेक्षां तुमचे मजवर अधिक उपकार आहेत. इतकीं वर्षें आपण माझं प्रेमानं—प्रत्यक्ष पोटच्या मुलीसारखं पालनपोषण केलं आणि त्याबद्दल उलट आपण माझ्या-मुळें संकटांत मात्र पडलां. माझ्यामुळें आपणावर हा प्रसंग आला आहे. आतां यापुढें मी आपणांस जास्त संकटांत घालूं इच्छित नाहीं. आतां मी आपल्या घरीं राहणें म्हणजे आपल्या उपकारांची फेड मी अपकारांनीं करण्या-सारखें आहे. तुम्ही मजविषयीं आतां विचारच करूं नका. ह्यापुढें आतां माझें दैव आहे आणि मी आहें."

"पण विमला, तूं आतां काय करणार ? कुठें जाणार ?"

"मीं आतां पुन्हां आमच्या मिशनमध्यें जाण्याचा विचार केला आहे. मी तेथें गेलें तर मला आमच्या बाई मोठ्या आनंदानें परत मिशनमध्यें घेतील."

"छे—छे ! विमले ! हा तुझा विचार मला बिलकुल पसंत नाहीं. आमच्या मूर्खपणानेंच का होईना पण तूं त्यांच्या पूर्ण कचाट्यांत सांपडली असतां तुला आम्हीं तेथून काढून येथें आणलें, आणि आतां तूं पुनः तेथें जाणार ?"

"मग मी काय करूं ? मीं बाप्तिस्मा घेतला नाहीं, ही गोष्ट जरी खरी तरी मला अशा स्थितींत कोण आश्रय देणार ? मी आतां कोणाकडे राहिलें तरी माझ्यामुळें त्याच्यावर संकट येणारच !"

"मीं एक तोड काढली आहे. तूं मिशनमध्यें असतांना आपली म्हातारी

जया तुला जेवण घेऊन येत असे. ती एकटीच आहे. तूं तिच्याकडे जाऊन रहा. तुझ्या खर्चाची मी व्यवस्था करीन आणि येथें खटपट करून तूं बाप्तिस्मा घेतला नाहींस हें सिद्ध करून तुझ्या नांवाला व्यर्थ लागलेला हा कलंक दूर करून तुला मी पुनः घरीं घेऊन येईन." संतोबाचें हें वात्सल्यपूर्ण भाषण ऐकून विमलेला गहिंवरून आलें. तिनें इतका वेळ घट्ट मन करून दाबलेलें आपलें सर्व दुःख ह्या भाषणामुळें बाहेर आलें. तिचा कंठ भरून आला. तिनें संतोबांचा हात धरला आणि अस्फुट शब्दांत ती म्हणाली, "बाबा, तुमचे हे उपकार मी कुठें फेडूं?"



## १२ नरसिंगरावाचा प्रयत्न

एखादें गरीब कुटुंब का होईना, पण त्या कुटुंबांत भावी जांवई आला असतां त्याचा मानसन्मान आणि आदरातिथ्य थाटांत होत असतें. श्रीमंत घराण्यांत आणि त्यांतल्या त्यांत तो एकटाच जांवई असला म्हणजे मग त्या थाटला सीमाच नसते. नरसिंगरावाचा थाट अशाच प्रकारचा होता. त्यांतून तो आजारी असल्यामुळें बापुसाहेब स्वतः त्याची बरदास्त ठेवीत होते. परंतु आपणाकडे बापुसाहेब भावी जांवयाच्या दृष्टीनें पहात आहेत, ही कल्पना देखील नरसिंगरावाच्या मनाला शिवली नव्हती. तो बापुसाहेबांच्या घरीं आल्यापासून त्याची सर्व व्यवस्था अति उत्तम झाली होती. परंतु त्याच्या मनाला एका क्षणाचीहि शांति नव्हती. त्याला घरीं आणतांच त्याच्या आग्रहावरून बापुसाहेबांनीं तें बहिष्कारपत्र दाखवून विमलेला आपल्या घरीं न आणण्याचें कारण सांगितलें. तें ऐकून निर्मल आणि शुद्ध वर्तनाच्या विमलेला शंकराचार्यांनीं बहिष्कार घातला, हा विचारच त्याला असह्य झाला, आज बहुतेक सर्व दिवस बापुसाहेब त्याच्या खोलींत होते. त्यांचें सर्व बोलणें बहिष्कारपत्राबद्दलच होतें. नरसिंगरावाच्या मनाला जितकी हुरहुर वाटत होती तितकीच बापुसाहेबांच्या मनालाहि वाटत होती शेवटीं विचार ठरतां ठरतां त्यांनीं असें ठरविलें कीं, विमलेविषयीं खरी खरी हकीकत कळवून आणि तिनें बाप्तिस्मा घेतला नाहीं त्याबद्दल योग्य पुरावे देऊन शंकराचार्यांस तें बहिष्कारपत्र रद्द करावयास अर्ज करावा, याप्रमाणें ठरल्यानंतर शंकराचार्यांस अर्ज कसा लिहावयाचा या विचारांत नरसिंगराव स्वस्थ पडला.

इकडे रात्रीं बापुसाहेब आपल्या मऊ शय्येवर आराम घेत पडले असतां त्यांच्याहि मनांत निरनिराळे विचार येत होते. त्यांनीं मनांत योजल्याप्रमाणें नरसिंगराव तर त्यांच्या घरीं आला. विमलेविषयीं त्यांच्या मनांत जी एक भीति वाटत होती ती आतां दूर झाली. आतां आपण आपल्या मुलीला कमलेला त्याच्या शुश्रूषेकरितां ठेवूं म्हणजे हळुहळूं आपल्या मनासारखें घडून येईल, असें त्यांना खात्रीपूर्वक वाटूं लागलें. ही एक गोष्ट त्यांच्या मनासारखी घडून आली असें वाटतांच त्यांच्या मनांत पुनः विमलेविषयीं विचार येऊं लागले. शंकराचार्यांनीं तिला बहिष्कार घातला म्हणून इतका वेळ त्यांच्या मनाला वाईट वाटत होतें परंतु आतां ते त्या गोष्टीचा निराळ्याच दृष्टीनें विचार करूं लागले. झाला हा प्रकार चांगला झाला असेंच आतां त्यांना वाटूं लागलें. यदाकदाचित् नरसिंगरावावर तिनें जर कांहीं मोहिनी घातली असेल तर आतां तिनें कितीहि प्रयत्न केले तरी, लौकिकदृष्ट्या ती बाटलेली आहे, हा तिला कलंक लागला असल्यामुळें नरसिंगराव तिच्या म्हणण्याला रुकार देणार नाहीं; म्हणजे अर्थात् त्याला आपल्या मुलीलाच रुकार द्यावा लागेल, असा विचार त्यांच्या मनांत आल्यानें विमला शुद्ध आहे अशाबद्दल नरसिंगरावाकडून शंकराचार्यांस अर्ज करूं नये असें आतां त्यांना वाटूं लागलें.

बरीच रात्र झाली. बापुसाहेबांना वरील विचारामुळें झोंप येईना. शेवटीं ते उठले आणि खिडकीजवळ येऊन उभे राहिले; तों खालीं नरसिंगरावाची खिडकीहि उघडी असून दिव्याचा स्वच्छ पडलेला प्रकाश त्यांना दिसला. तें पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. वास्तविक नरसिंगराव आजारी असल्यामुळें तो केव्हांच निजला असेल असें ते समजत होते. परंतु खरा प्रकार तसा नव्हता. नरसिंगरावाच्या डोक्यांत एकसारखा विमलेचाच विचार घोळत राहिल्यामुळें त्याला चैन पडेना. पुष्कळ वेळ शंकराचार्यांना पत्र कसें लिहावयाचें याचा विचार करून झाल्यावर तें पत्र आपण केव्हां लिहूं असें त्याला झालें. त्यानें निजलेल्या नोकराला हांक मारिली आणि त्याच्याकडून सर्व लेखनसाहित्य मागविलें. वास्तविक लिहिण्याइतका त्याचा हात अद्यापि मोकळा झाला नव्हता. परंतु अद्यापि आपला हात दुखत आहे. तो मोडला होता, ह्या गोष्टीची तो त्यावेळीं आठवण देखील विसरला होता. नोकरानें लेखनसाहित्य आणून देतांच तो हळूच उठून बसला आणि नोकराला दिवा मोठा कराव-

याला सांगून त्यानें मांडीवर पुष्टिपत्र धरलें. आतां पत्र काय लिहावयाचें याचा विचार करावयाचा नव्हता. इतका वेळ तो विचार झालाच होता. आतां फक्त भणभणलेल्या डोक्यांत गर्दी करून ' मी जाऊं कीं तूं जातोस ? अशी हातघाई करून पुढें येणारा विचार त्याचा मोडका हात किती जलद लिहील इतकाच प्रश्न होता. त्यानें कागदावर ' श्री ' काढून लिहावयास सुरुवात केली. नोकर जवळच उभा होता. त्याच्या समजुतीप्रमाणें पत्र चारपांच मिनिटांत लिहून होईल व तें पोष्टांत टाकण्याकरितां आपणाजवळ येईल असें त्याला वाटलें. परंतु नरसिंगरावानें इकडे तिकडे न पाहतां आपली लेखणी चालविली होती. कागदावर कागद लिहून तो बाजूला ठेवूं लागला. लिहितां लिहितां त्याच्या हाताला वेदना होत होत्या. परंतु त्यानें तिकडे दुर्लक्ष केलें. आठ दहा पानें लिहून झालीं तेव्हां दरवाजा उघडून बापुसाहेब आंत आले आणि त्याला लिहीत बसलेला पाहून म्हणाले, " अरे नरसिंगा, हें तूं काय करीत आहेस ? तुझा हात दुखतो आहे आणि तूं लिहीत काय बसला आहेस ? तुला काय लिहावयाचें असेल तें उद्यां कमलेला जवळ बसवून तिच्याकडून लिहून घे. " परंतु नरसिंगरावानें कांहीं उत्तर न देतां लिहिलेलें सर्व कागद एकत्र करण्यास सुरुवात केली. तेव्हां बापुसाहेब पुढें म्हणाले, " कुणाला हें इतकं लांबलचक लिहिलं आहेस ? "

" हें पत्र श्रीशंकराचार्यांना लिहिलं आहे. एखाद्या खोडसाळ अर्जावर त्यांनीं विमलेसारख्या सरळ व शुद्ध मुलीला बहिष्कार घालण्यांत किती अन्याय व अधर्म केला आहे त्याचें मी पत्रांत योग्य स्पष्टीकरण केलें आहे. "

बापुसाहेबांनीं तात्काळ उत्तर दिलें नाहीं. कारण त्या नरसिंगरावाच्या जोरदार उत्तरानें त्यांची पहिली शंका पुनः उद्भवली. विमलेकडे त्याचा ओढा आहे हें त्यांच्या लक्षांत आलें. तेव्हां अनायासें विमलेंत आणि त्याच्यांत हा शंकराचार्यांनीं तिला बहिष्कार घातलेला पडदा आहे तो दूर करण्याचा प्रयत्न करावा किंवा नाहीं हा त्यांना विचार पडला. ते हळूच म्हणाले, " पण नरसिंगा, आपण ही खटपट करण्यांत काय अर्थ आहे ? ती अशी कोण मोठी व्यक्ती आहे कीं, तिच्या विषयीं आपण ह्या भानगडींत पडावें ? "

" मामा, असं काय म्हणतां ! विमला कोणी क्षुद्र व्यक्ति आहे असा आपला समज झाला असेल तर तो साफ चुकीचा आहे. ती एक पवित्र आणि निर्मल अशी देवता आहे. तिची योग्यता फार मोठी आहे. शंकरा-

चार्यांकडून हा केवळ अन्याय झालेला आहे. तिला हा विनाकारण लागलेला कलंक धुवून काढण्याकरितां, तिचें शुद्धत्व प्रस्थापित करण्याकरितां मी वाटेल तें करीन. मला ह्या बाबतींत वाटेल तितके श्रम पडले तरी त्याचें कांहीं वाटणार नाहीं. कारण तिनें मजवर केलेल्या उपकारांची जेव्हां जेव्हां मला आठवण होते तेव्हां तेव्हां माझ्या मनांत तिच्याविषयीं जे कृतज्ञतेचे विचार येतात त्याची तुम्हाला कल्पनाहि होणार नाहीं. मामा, तिनें मला जीवदान दिलें आहे. "

नरसिंगरावानें लिहिलेले कागद उचलून बापुसाहेब वाचूं लागले. प्रथम त्या वाचनाकडे त्यांचें लक्ष लागलें नाहीं. फक्त नरसिंगरावाच्या भाषणाचाच ते विचार करीत होते. त्या विचारांत त्यांनीं एक पान चाळलें परंतु पुढल्या पानापासून त्यांचें सर्व लक्ष त्या मजकुरानें आपणाकडे वेधलें. ते आतां लक्षपूर्वक प्रत्येक पान वाचूं लागले. थोड्या वेळानें सर्व वाचून होतांच त्यांनीं आपली गंभीर मुद्रा नरसिंगरावाकडे वळविली. आणि ते म्हणाले, " नरसिंगा, तूं हा पहिला मजकूर लिहिला आहेस तो ठीक आहे. त्यांत विमलेबद्दल केलेला उल्लेख सत्य आहे. पण विचाराच्या ओघांत आणि लिहिण्याच्या भरांत तूं हा पुढील मजकूर फार कडक लिहिला असून त्यांत मिशनरी लोकांची तरफदारी केलेली दिसते. "

" पण मी त्यांत जें लिहिलं आहे तें वस्तुस्थितीला धरूनच लिहिलं आहे. "

" म्हणजे तुझ्या मतें ख्रिश्चनधर्म चांगला असाच अर्थ झाला ! "

" नाहीं. तुम्हीहि माझ्या लिहिण्याचा अर्थ नीट समजला नाहीं. पण माझ्या लिहिण्यांत इतका गूढ अर्थ राहूं नये. पाहूं, मामा, मी एक वेळ पुनः वाचतों—" असें म्हणून त्यानें ते लिहिलेले कागद पुनः हातांत घेऊन वाचण्यास सुरुवात केली. प्रथम कांहीं भाग त्यानें स्वगत वाचला. नंतर तो मोठ्यानें वाचूं लागला—' धर्म आणि अधर्म याचा प्रश्न सोडविण्याचा आपला अधिकार, परंतु विमलेच्या बाबतींत आपण आपल्या जबाबदारीचा कांहींच विचार केलेला दिसत नाहीं; असें मोठ्या दुःखानें म्हणावें लागतें ! "

" हें तूं कशावरून म्हणतोस ? शंकराचार्यांनीं विमलेच्या बाबतींत चौकशी केली नसेल असें कसें आपणास म्हणतां येईल ? "

" त्यांनीं चौकशी केली असती तर हें बहिष्कारपत्र येतेंच ना ! परंतु माझें असें म्हणणें आहे कीं, शंकराचार्यांनीं त्यांना मिळालेल्या माहितीवरून

विमलेला बहिष्कार घातला आणि आपल्या अधिकाराची अंमलबजावणी केली, म्हणजे त्यांचें धर्मप्रसाराचें म्हणा अगर धर्मजागृतीचें म्हणा कार्य संपलें असें मात्र होत नाहीं. मुळांत विमलेनें बाप्तिस्मा घेतला नाहीं, ही गोष्ट खरी आहे तरी त्यांच्या मताप्रमाणें तिनें बाप्तिस्मा घेतला ह्या अधर्माबद्दल त्यांनीं तिला बहिष्कार घातला याबद्दल धर्माभिमान्यांना आनंद मानण्याचें कारण नाहीं. वास्तविक असा अधर्म मुळांत होऊं न देण्याबद्दल जपणं हें धर्माधिकाऱ्यांचें पहिलें कर्तव्य आहे. आणि ह्या कर्तव्याला जर ते दक्ष राहतील तर त्यांच्याकडून खरं खरं धर्मजागृतीचं कार्य होईल."

"ह्या तुझ्या भाषणाचा अर्थ मला चांगलासा कळला नाहीं. शंकराचार्यांनीं एखाद्याला बहिष्कार घातला म्हणजे धर्म जागृति कशी होते ?"

"मामा, हा प्रश्न फार विचार करण्यासारखा आहे. आद्य श्रीशंकराचर्यांना ह्या धर्माच्या गादीची कां स्थापना करावी लागली, याचा आपण विचार केला म्हणजे सर्व गोष्टी आपल्या लक्षांत येतील. केवळ दिवसा मशाली लावून पालखी मेण्यांतून गांवोंगांव आणि शहरोंशहरीं फिरावयाचें आणि एकावन रुपये घेऊन आपली पाद्यपूजा करून घेतली म्हणजे हल्लींच्या शंकराचार्यांचें धर्मजागृतीचें काम संपलें असें होत नाहीं. आपले चार वर्ण आपापल्या धर्माप्रमाणें चालतात किंवा नाहीं आणि चालत नसल्यास त्यांच्याकडून कोणत्या बाबतींत अधर्म होतो तें पाहून त्या गोष्टीला योग्य वेळीं आळा घालणें हें शंकराचार्यांचें मुख्य काम आहे. परंतु हल्लीं पहावें तर सर्वच प्रकार उलट दिसून येतो. आपली पाद्यपूजा करून घेण्यांत व आपल्या संस्थानाच्या मानापमानांत हे शंकराचार्य दंग असतात. आपण ह्या नगरीचीच गोष्ट घेऊं या. आपल्या चार वर्णांपैकीं विशेषेंकरून एक वर्णांतील बरीच संख्या आज ख्रिश्चन झालेली दिसते. म्हणजे बराच अधर्म झाला आहे. हा अधर्म होऊं नये म्हणून आमच्या शंकराचार्यांनीं काय प्रयत्न केले आहेत बरें ? थोडा विचार केला तर असें दिसून येईल कीं, आमच्या शंकराचार्यांनीं कांहीं एक केलें नाहीं. ह्या बाटलेल्या मंडळींत शेंकडा दहा मंडळी आपला धर्म काय हें न कळल्यामुळें मिशनरी लोकांच्या थापांना बळी पडली आहे आणि बाकी शेंकडा नव्वद मंडळी ह्या दुष्काळांत अन्नान्न करीत असतां त्यांचे प्राण वांचविले म्हणून कृतज्ञतेनें ती बाटलेली आहे."

"मग ह्या गोष्टीला शंकराचार्यांनीं काय करावं ?"

काय करावं म्हणजे ! हें सर्व काम तर शंकराचार्यांचं आहे. आमच्या ह्या चवथ्या वर्णाबद्दल—अंत्यज, अस्पृश्य मानलेल्या जातीबद्दल धर्माच्या बाबतींत ह्या आचार्यांकडून काय प्रयत्न होतात ? त्यांना स्वतःचा धर्म काय हें माहीत नसतें, त्यांना तुमच्या देवळांत जाण्याची चोरी, तुमच्या कोणत्याही सार्वजनिक उत्सवांत त्यांना तुम्ही भाग घेऊं देत नाहीं. कां तर ती जात तुम्ही नीच समजतां म्हणून ! यांची देवाची कल्पना म्हणजे एखादा म्हसोबा, दगडोबा ! ज्याप्रमाणें त्यांची कल्पना त्याचप्रमाणें त्यांचे विचार. आणि त्या विचाराप्रमाणेंच त्यांचें ध्येय बनून त्यांच्याकडून कृति आणि आचारहि तसाच घडतो. त्यांची स्थिति सुधारावी म्हणून राहिलेल्या तीन वर्णांपैकीं कांहीं समाज-हितेच्छूंनीं प्रयत्न चालविले आहेत परंतु मुळांत हें काम धर्माधिकारी म्हणविणाऱ्या आचार्यांचें आहे. त्याचप्रमाणें परवां ह्यूमसाहेबांनीं सांगितलें त्याचा आपण कधीं विचार केला आहे काय ? दुष्काळांत मिशनरी लोकांनीं रिलिफ कामें काढावीं, आणि आमच्या आचार्यांनीं फक्त आपलें वैभवच भोगावें काय ? दुष्काळासारख्या वेळीं शंकराचार्य पुढें होऊन त्यांनीं अधिकारानें फंड गोळा केला तर धर्माचें किती मोठें कार्य होईल. मिशनऱ्यांच्या हातून किती लोक सुटतील याचा विचार करा. ”

घड्याळांत बाराचे ठोके पडूं लागले. बापुसाहेब कांहीं एक न बोलतां मुकाट्यानें उठले.

## १४ मनोहराचा गळ

जया म्हातारीकडे रहावयास येऊन विमलेला सहा दिवस झाले. तिच्यामुळें म्हातारीला मोठा आधार वाटूं लागला. तिला जगांत मायेचें असें कोणीच राहिलें नव्हतें. आज इतकीं वर्षे विमलेला जेवण करून देण्याचें तिच्याकडे काम असल्यामुळें त्यांतल्यात्यांत तिचाहि निर्वाह होत असे. परंतु विमला गेल्या महिन्यांत संतोबाकडे रहावयाला गेल्यापासून ती मोठ्या संकटांत पडली होती. आतां तिचें वय झाल्यामुळें कुणाचे दळणकांडण करावयाचें कामहि तिच्याकडून होईना. परंतु अनाथांचा वाली परमेश्वर ! विमला पुनः तिच्या घरीं आली. म्हातारीचे तिच्यावर अत्यंत प्रेम होतें. तिला बहिष्कृत केल्यामुळें

ती आपणाकडे आली, याचा तिला अर्थच कळला नाहीं. केवळ परमेश्वरानेंच तिला आपणाकडे पाठविली असें समजून ती विमलेवर जास्त प्रेम करूं लागली. तिच्याकडे आल्यापासून विमला सदासर्वदा विचारांत बसलेली असे. नरसिंगराव हाच तिच्या विचाराचा विषय होता. गेल्या सहा दिवसांत ती क्वचितच बाहेरच्या खोलींत आली असेल. तिचा सर्व वेळ आंतल्या खोलींत एकांतांत बसून विचार करण्यांत जाई. परंतु आज मात्र तिच्या मनाची तळमळ जास्त वाढली. एक महिना रात्रंदिवस नरसिंगरावाच्या सहवासांत तिचे दिवस गेले असल्यामुळें आतां एकाएकीं ती ह्या शून्य वातावरणांत येऊन पडल्यामुळें तिच्या मनाची शोचनीय अवस्था व्हावी यांत नवल नाहीं. गेल्या सहा दिवसांत नरसिंगरावाविषयीं तिला एक अक्षरही कळलें नाहीं, आतां आपणांस नरसिंगरावाची प्राप्ति होणें शक्य नाहीं, हें जरी तिला पूर्णपणें कळून चुकलें होतें, तथापि मन विचार केल्याशिवाय शून्य रहाणें शक्य होतें काय ? आतां आपण नरसिंगरावाविषयीं विचारच करावयाचा नाहीं, असा ती प्रत्येक घडीला ठाम निश्चय करी तोंच दुसऱ्या घडीला प्रियकरानें सांगितलेली एखादी विशेष गोष्ट आठवून त्यांत तासताम तिचें मन रमून जाई.

आज मात्र तिचें मन अगदींच अस्वस्थ झालें. नरसिंगरावाची प्रकृति कशी आहे; तें आपणास कळावें म्हणून तिच्या मनाला सारखी तळमळ लागली, ती आजच इतक्या दिवसांत खिडकीजवळ उभी राहिली होती. ती संध्याकाळची वेळ असून विमला तळहातावर आपला उजवा गाल टेकून खिडकींत सचिंत उभी असलेली कवीनें वर्णन केलेल्या विरही तरुणीप्रमाणें दिसत होती. जणुं काय ती तरुणी विरहनलानें व्याकूळ होऊन आपल्या प्रियकराची मोठ्या उत्सुकतेनें मार्गप्रतीक्षा करीत होती, आणि खरोखरीच विमलेच्या मनाचीहि तशीच स्थिति झाली होती. नरसिंगराव गेल्या सहा दिवसांत हिंडूं फिरूं लागला असून त्याच्या मनाची स्थिति आपल्या मनाप्रमाणेंच म्हणजे आपणास केव्हां येऊन पाहूं अशी झाली असेल. आणि तो आज आपणाला भेटण्याकरितां आतां इतक्यांत येईल असेंच तिला वाटत होतें. बराच वेळ झाला, ती शून्य दृष्टीनें रस्त्याकडे दूरवर पहात होती. परंतु आज त्या रस्त्यावरून कोणीच येतां जातांना तिच्या दृष्टीस पडलें नाहीं. सर्वत्र शुकशुकाट होता. अशा रीतीनें बराच वेळ गेल्यावर एक फाटकी पतंग उडवीत धांवत येत असतांना जिवा पोर तिच्या दृष्टीस पडला. त्याच्या

हातांतील पतंग गोते खातांना पाहून तिच्या मनांत नवीन विचार उद्भवला. पतंगाची दोरी आंवळून धरिल्यामुळें तो जसा गोते खात आहे, त्याचप्रमाणें आपल्या मनाचा अवरोध केल्यामुळें, तें देखील गोते खात आहे असें तिला वाटूं लागलें. आणि वस्तुस्थिति तशीच होती. थोड्या वेळानें जिवा तिच्या खिडकीजवळ येतांच त्याची दृष्टि सहज खिडकीकडे गेली. आणि विमलेला तेथें उभी असलेली पाहून तो आश्चर्यानें म्हणाला, "विमलाताई, तुम्ही इकडे कुणीकडे ? संतोबा दादाच्या घरीं तुम्हीं रहात होतां ना ? आणि येथें उभ्या राहून काय करितां ?

" तुझी पतंग गोते खाते तें पहात उभी आहे."

" विमलाताई, माझा पतंग फाटला आहे तो चिकटवून देतां काय ? मग पहा तर खरा तो कसा उडतो तो ! "

विमलेनें त्याला आंत बोलाविलें, आणि ती आतां पतंग चिकटवून देण्याच्या उद्योगाला लागली. हातानें तिचा हा उद्योग चालला असतांना तो तिला कांहीं तरी प्रश्न विचारीतच होता, आणि तिचें विचारयंत्रहि चालू होतें. थोड्या वेळानें ती जिवाला म्हणाली, " जिवा, माझें एक काम करशील कायरे ? "

" हो—सांगा आतां करितों. त्याला उशीर कसला ! "

" हें पहा—ते सायकलवरून पडले ते तुला माहित आहेत ना ? "

" हो हो, मींच तर तुम्हाला तें पहिल्यांदा येऊन सांगितलें ! ते आतां कुठें आहेत ? इकडेच आहेत ना ?—मी जाऊं कां त्यांना पाहायला ? "

" जिवा, त्यांची प्रकृति आतां बरी आहे. पण ते आतां इकडे मात्र नाहींत. त्यांना त्यांच्या मामांनीं आपल्या घरीं नेलें. त्याला आज सहा दिवस झाले. मला त्यांची कांहींच खबर लागली नाहीं. मला मोठी चुटपुट लागली आहे. तूं जातोस का त्यांच्याकडे ? आणि त्यांची खबर कशी आहे तें विचारून येतोस का ? "

" हो हो, मला पत्ता सांगा—मी आतां जातों."

विमलेनें त्याला रामदेवरावाच्या घराचा पत्ता सांगितला. तेव्हां—' हा माझा चिकटविलेला पतंग येथेंच असूं द्या. मी येईपर्यंत तो वाळेल आणि मग पहा कसा छानदार उडेल ! ' असें म्हणून जिवा उड्या मारीत तेथून निघाला. विमला तेथेंच बसली. तिच्यापुढें तो चिकटविलेला पतंग तसाच

पडलेला होता. त्याकडे पहात ती स्वगत म्हणाली, 'माझ्या मनाची स्थिति आणि ह्या पतंगाची स्थिति अगदीं सारखी आहे. जिवानें पतंग उडवितांना ह्या पतंगाची दोरी वाटेल तशी सैल सोडली तर पतंग गोते खात वातावरणांतील हवेला धक्काबुक्की करील व शेवटीं कुणीकडे तरी भडकेल. मला बहिष्कार घातला आहे. मी शुद्ध जरी असलें तरी जगाच्या दृष्टीनें मी अपवित्र—अशुद्ध ठरलें आहे. मला माझें मन पतंगाप्रमाणेंच आवरून धरलें पाहिजे. मला त्या पवित्र मूर्तीचा विचार सोडून दिला पाहिजे. जनदृष्ट्या माझ्या नांवाला लागलेल्या कलंकामुळें मी माझ्या मनानें त्या रमणीय व परिसासारख्या, स्वतः निर्मळ असून दुसऱ्याला निर्मळ करणाऱ्या मूर्तीचें चिंतन करणें म्हणजे त्याच्या लौकिकरूपीं वातावरणाला धक्के देण्यासारखें होईल.-छे नाहीं. मला आतां माझें मन आवरलेंच पाहिजे! मज अभागिनीमुळें त्यांच्या निर्मल लौकिकाला थोडासाही धक्का लागलेला मला केव्हांच खपावयाचा नाहीं. ते मजपासून दूरच राहिले पाहिजेत. अरेरे! पण मीं आतां हें काय केलें? जिवाला त्यांच्याकडे पाठवून या सहा दिवसांत बुजत चाललेली माझी स्मृति आतां मी पुन्हां ताजी करणार काय? जिवा जर अजून गेला नसेल तर मी त्याला हांक मारूं काय?' असें म्हणून ती चटकन् उठली आणि खिडकीजवळ आली. तिला आतां जिवा दिसणें शक्यच नव्हतें. कारण तो आपल्या इच्छित स्थळीं केव्हांच जाऊन पोहोंचला होता. ती खिडकींत येऊन उभी राहिल्यावर जिवा तिच्या दृष्टीस पडण्याऐवजीं समोरून मनोहर मिसाळ येतांना तिच्या दृष्टीस पडला. तो अगदीं "अप्-टू-डेट" पोषाख करून चालला होता. विमला दृष्टीस पडतांच तिला अशा ठिकाणीं पाहून त्यानें आश्चर्य वाटल्याचा आविर्भाव दाखविला. तो आपल्या वाटेनें निघून जाईल असें प्रथम तिला वाटलें होतें. परंतु तसें होणार कोठून? तो आज सहा दिवस मोठ्या अधीरतेनें ज्या दिवसाची वाट पहात होता तो आजचाच दिवस होता! गेल्या सहा दिवसांत त्यानें अनेक कारस्थानें केलीं होतीं. महामुनि शास्त्रीबुवांकडून शंकरचार्यांना अर्ज केल्यावर तो ज्या परिणामाची वाट पहात राहिला होता त्याप्रमाणें विमला शंकराचार्यांकडून बहिष्कृत होऊन त्याच्या मनाप्रमाणें घरांतून बाहेर पडली. तो तिला तात्काळ येऊन भेटणार होता. परंतु अशी घाई करण्यांत उलट आपलाच संशय येईल असें वाटून तो थांबला. नंतर एके दिवशीं त्यानें संतोबांना गांठून पुन्हां एकदां

आपल्या डेपोंत नेलें. आणि त्यांच्यावर दारूची मोहिनी प्रयोग करून विमलेविषयीं सर्व माहिती काढून घेतली. अशा रीतीनें सर्व माहिती मिळवून आज ती स्वारी मुद्दाम आली होती. तो आंत येतांच साहेबी थाटानें टोपी काढून म्हणाला, "गुड् इव्हिनिंग विमलाबाई! तुमच्यावर तुमच्या त्या मूर्ख धर्माधिकाऱ्यानें कांहीं आरोप ठेवला आहे अशी मला काल बातमी लागली. मला त्याबद्दल अत्यंत वाईट वाटलें. आणि स्वतःचें दुःख प्रदर्शित करण्याकरितां दोन दिवसापूर्वीं संतोबाच्या घरीं मी गेलों. तेथें माझी त्यानें कांहींच डाळ शिजूं दिली नाहीं. तेव्हां मला त्या दारूबाज संतोबाचाच संशय आला. परंतु स्वतःची खात्री झाल्याशिवाय कोणालाही दोषी ठरवावयाचें नाहीं असा माझा बाणा असल्यामुळें मी ह्या गोष्टीची खडानूखडा माहिती मिळविण्याच्या उद्योगाला लागलों. नंतर मी तुमच्याकडे तंगड्या मोडून पडलेल्या त्या तरुणाच्या मामाकडे गेलों तेव्हां मात्र तेथें मला सर्व खरी हकीगत कळली." इतकें बोलून, मोठ्या ऐटीनें आपल्या खिशांतील रुमाल काढून तो तोंड पुसूं लागला. इतका वेळ विमलेच्या तोंडांतून एक चकार शब्दही निघाला नाहीं. ती मोठी शांत—विचारी मुलगी होती. कोणत्याही गोष्टीचा सारासार विचार केल्याशिवाय ती आपलें मत केव्हांही ठाम निश्चित करीत नसे. ती कांहीं बोलत नाहीं असें पाहून मनोहर मोठ्या आढ्यतेनें पुढें म्हणाला, "विमला, तुला वाईट वाटून घेऊं नकोस. तुझें त्या तरुणावर व त्या तरुणाचें तुझ्यावर प्रेम आहे ही गोष्ट बापुसाहेबांना कळली म्हणूनच तुझ्यावर हा प्रसंग आला आहे. ह्या तरुणाविषयीं तुला कांहीं माहिती असावी असें दिसत नाहीं. तो बापुसाहेबांच्या एका अस्सल जुगारी व पक्क्या दारूबाज मित्राचा मुलगा आहे. त्याची सर्व इस्टेट बापुसाहेबांनीं गिळंकृत केली असून ती पचविण्याकरितां त्यांनीं एक बिनतोड शक्कल काढली आहे. आपली मुलगी कमला हिचा त्याच्याबरोबर विवाह करून त्याला घरजांवई करावयाचा! हीच ती बिनतोड शक्कल होय! परंतु बापुसाहेबांच्या दुर्दैवानें त्याला सायकलचा अपघात होऊन तुमचं एकमेकाचं जुळलेलं प्रेम त्यांना कळलं. तेव्हां तुझा मधला कांटा कसा काढावा ह्या विचारांत ते होते. पुढें एके दिवशीं त्यानें मिशनरीबाईच्या बरोबर केलेला धर्माचा वाद ऐकून, तो पक्का धर्माभिमानी आहे असें त्यांना वाटलें आणि असा धर्माभिमानी मुलगा, धर्मांतर केलेल्या मुलीवर त्याचें प्रेम असलें तरी लग्न करणार नाहीं असें योग्य धोरण बांधून

त्यांनीं तुमच्या शंकराचार्यांना एक अर्ज केला. आणि सर्व गोष्टींचा परिणाम त्यांनीं योजिल्याप्रमाणेंच झाला. आतां ते आपल्या मुलीविषयीं तिकडे प्रयत्न करतील. त्यांचा मार्ग आतां मोकळा झाला."

मनोहरानें आपल्या पाताळ-यंत्री भाषणानें आपला इच्छित हेतु साध्य करून घेतला. बिचारी विमला त्याच्या भाषणाला पूर्णपणें चकली. तिच्या विचारांत एकदम क्रांति होऊन थोड्या वेळापूर्वींचे तिचे सर्व बेत पालटले. मनोहर आपल्या बारीक डोळ्यांनीं तिच्या चर्येत क्षणोक्षणीं होणारा फरक न्याहाळीत होता. आपण सांगितलेली सर्व हकीगत तिला खरी वाटली असें तिच्या चर्येवरून त्यानें ताडलें. विमला पुन्हां पहिल्यापासून विचार करूं लागली. सहा दिवसांपूर्वीं बापुसाहेब नरसिंगरावाला घरीं नेण्याकरतां आले असतांना जें संशयात्मक भाषण करून गेले त्या भाषणाचा तिला पूर्णपणें उलगडा झाला. आपल्या मुलीच्या कल्याणाकरितां शंकराचार्यांकडून आपणास बहिष्कार घालण्याचा त्यांनीं जो व्यूह रचिला त्याबद्दल क्षणभर तिचें डोकें भणभणलें. परंतु तिचें मन सुसंस्कृत झालें असल्याकारणानें बापुसाहेबां-विषयीं तिच्या मनांत क्षणभरच जे रागाचे विचार आले होते ते तिनें दाबले. मनुष्य स्वार्थाला बळी पडला असतां त्याच्याकडून होणाऱ्या अपराधांस सर्वांनाच दोष देण्याचा अधिकार नाहीं हें ती जाणून होती. बापुसाहेबांच्या जागीं आपण असतों तर स्वार्थाकरितां आपण देखील तंतोतंत असेंच वर्तन केलें असतें अशी तिनें मनाची समजूत करून घेतली. आपण नरसिंगरावाच्या सुखांत मोठा काटा आहोंत असें तिला वाटूं लागलें आणि आपल्या सुखा-करितां नरसिंगरावानें दुःखी व्हावें ही कल्पना देखील तिला सहन होईना. आजपासून आपण नरसिंगरावाचा विचार करावयाचा नाहीं असा तिनें त्याचवेळीं निश्चय केला. ती बराच वेळ बोलत नाहीं असें पाहून मनोहर पुढें म्हणाला, "विमला, त्या लंगड्या मनुष्यावर तुझें प्रेम आहे ही गोष्ट खरी; पण आतां त्याचा काय उपयोग ? तुझ्या नांवाला बाप्तिस्मा घेतल्याचा खोटा कलंक लागला आहे हें त्याला माहीत आहे तथापि तो लौकिकदृष्ट्या तुझें केव्हांहि पाणिग्रहण करणार नाहीं. परस्परांवर असणाऱ्या निःसीम प्रेमाच्या जोरावर तुम्ही जर हा प्रेमसंबंध असाच चालू ठेवाल तर जगाच्या दृष्टीनें तुला व्यभिचारी हा शिक्का मिळेल ! म्हणून म्हणतों तूं आतां त्या तरुणाचा नाद सोडून देणेंच हितावह आहे. आतां तुझी स्थिति एखाद्या लोंबकळत

राहिलेल्या दुर्दैवी माणसासारखी झालेली आहे. ना इकडे ना तिकडे ! मुळांत तुझ्या जातीचा पत्ता नाहीं; तुझे आईबाप कोण याचा ठिकाणा नाहीं; अशा स्थितींत प्रथम तुझें लग्न होणें दुरापास्त होतें. त्यांतून तूं आतां असें म्हणशील की, 'नरसिंगराव माझ्याबरोबर लग्न करतील' पण हा विचार देखील मनांत आणावयास नको. एकतर बापुसाहेब असें घडूं द्यावयाचे नाहींत; आणि घटकाभर असें गृहीत धरून चाललें कीं, त्या तरुणानें बापुसाहेबाच्या सर्व प्रयत्नांना लाथाडून आपल्या प्रेमाच्या जोरावर तुझ्याबरोबर लग्न केलेंच तर तुमची काय स्थिती होईल याचा तूंच विचार कर. तत्काळ त्याला देखील बहिष्कार घालण्यांत येईल! आणि इतकें होऊनहि तुम्हां दोघांना सुख लाभेल असें तुला वाटतें काय? बापुसाहेब त्याला कफल्लक बनवून—भणंग भिकारी बनवून आपल्या घरांतून हाकून देतील. अशा निर्धन स्थितींत सर्वच बाजूनीं कोंडमारा झाल्यावर तुम्ही दोघें किती सुखी व्हाल?— पहा मी वस्तुस्थितीचें खरें चित्र तुझ्यापुढें हुबेहुब मांडिलें आहे. आतां तूंच विचार कर. त्यापेक्षां माझ्या मागणीचा तूं स्वीकार केलास तर मी तुझ्याकरितां जगाबरोबर टक्कर देण्यास तयार होईन. आतां एवी तेवी तुझ्या नांवाला कलंक तर लागला आहेच; तेव्हां वेड्यासारखी सुखाला तरी पारखी कां होतेस? नीट विचार कर. माझें तुझ्यावर किती प्रेम आहे हें मला शब्दांनीं व्यक्त करून दाखवितां येत नाहीं. मी तुला खरोखरच सुखी करीन."

विमला एखाद्या स्फटिकाच्या पुतळ्याप्रमाणें गप्प राहून मनोहरचे शब्द ऐकत होती. या त्याच्या भाषणानें तिच्या मनावर कांहींच परिणाम झाला नाहीं आणि ती तसें बोलून दाखविणार होती इतक्यांत जिवा धांवत आला. त्याच्या हातांत कांहीं कागद होते. ते त्यानें विमलेच्या पुढें केले आणि मनोहराकडे पहात तो हंसत म्हणाला, "साहेब, तुम्ही तर येशुख्रिस्ताच्या काळ-पांतील गांवठी साहेब दिसतां! वा—आज इकडे कुणीकडे? हा कांहीं तुमचा दारूचा डेपो नव्हे!" इतकें बोलून तो पुन्हां विमलकडे वळला आणि म्हणाला, "विमलाताई, त्यांची प्रकृती आज पुष्कळ बरी आहे; पण काल हा अर्ज लिहिल्यामुळें आज त्यांचा सर्व हात ठणकत आहे. तरी देखील त्यांनीं ही एक चिठ्ठी दिली आहे."

कागद आणि त्यांत नरसिंगरावाची चिठ्ठी आहे असें कळतांच विमलेचा हात क्षणभर थरथरला. समोर उभा असलेल्या मनोहराकडे तिचें अगदींच

दुर्लक्ष्य झालें. त्या पत्रांत अशी काय जादू भरली होती कीं, त्यामुळें आपल्या सभोंवतालच्या गोष्टींचें तिला विस्मरण पडलें. तिनें प्रथम पत्र वाचलें, नंतर ती ते कागद वाचूं लागली. इतक्या अवधींत जिवा आपली पतंग उचलून "मी जातों" असें म्हणून केव्हांच निघून गेला हें देखील तिच्या लक्ष्यांत आलें नाहीं. ती कागद वाचीत असतां तिच्या चर्येवर दृग्गोचर होणारे विकार पाहून मनोहराच्या कपाळाला आठ्यावर आठ्या पसरत होत्या, शेवटीं सर्व कागद वाचून झाल्यावर विमलेनें एक दीर्घ निश्वास सोडिला तेव्हां मनोहर म्हणाला, "विमला, तूं आतां माझें ऐक आंणि त्या तरुणाचा नाद सोडून दे. तूं माझें ऐकणार नाहींस तर खरोखरीच सुखी होणार नाहींस."

विमलेनें उत्तराऐवजीं मनोहराकडे रागानें पाहून आपली दृष्टी बाहेर पतंग उडवीत असलेल्या जिवाकडे वळविली. आतांपर्यंतच्या तिच्या वर्तनावरून त्याला उत्तर न देण्याचा तिनें निश्चय केला होता असें दिसत होतें. संतोबाच्या घरीं असतांना तिनें शब्दानें आपली दोनदां नापसंती दर्शविली. आज तेंच काम तिनें आपल्या दृष्टीकडे सोंपविलें होतें. परंतु मनोहर अशानें थोडाच हार जाणार होता? त्यानें पुन्हां आपली चर्पटपंजरी सुरू केली तेव्हां कंटाळून विमला म्हणाली, "मि. मनोहर, मी यापूर्वीच तुम्हाला जें काय सांगावयाचें होतें तें सांगितलें आहे. आतां यापुढें तुम्हीं मला त्रास द्यावयास येऊं नये हेंच चांगलें!"

---

## १५ गोष्ट काढली

त्या सर्व रात्रीं बापुसाहेबांच्या डोळ्याला डोळा देखील लागला नाहीं. नरसिंगरावानें शंकराचार्यांना लिहिलेलें पत्र त्यांच्या मनांत सारखें घोळूं लागलें, त्या पत्राच्या मोडणीवरून आपण जी शंका पूर्वीं घेतली होती ती खरी आहे अशी आतां त्यांची खात्री झाली. मनांत प्रेम असल्याशिवाय लेखणींतून इतकी तरफदारी व्हावयाची नाहीं, तेव्हां आपण आपल्या मुलीसंबंधानें योजिलेला बेत सिद्धीस नेण्यास आपणास फार प्रयास पडतील असें त्यांना वाटूं लागलें, आतां विमलेबद्दल काय विचार करावा, म्हणजे तिच्याबद्दल यापुढें आपणांस कोणत्याहि प्रकारें त्रास होणार नाहीं, या एका

विचारांत त्यांनीं सर्व रात्र जागून काढली. घटकेंत त्यांना असें वाटे कीं, आपण विमलेला येथून कोठें तरी दूर रवाना करावें आणि दुसऱ्या क्षणीं त्यांना असें वाटे कीं नरसिंगरावाला सर्व गोष्टी समजावून देऊन आपल्या मुलीबरोबर लग्न करण्यांतच तुझा तरुणोपाय आहे असें सांगावें.

या दोन विचारांवर विचार करण्यांत त्यांनीं बराच वेळ घालविला. शेवटीं दुसरा विचारच त्यांनीं पसंत केला. आणि तो होतां होईल तितक्या लवकर त्याच्या कानावर घालावा म्हणजे विमलेचें बहिष्कारपत्र रद्द करून घेण्याच्या त्याच्या कार्यांत शिथिलता येईल असें त्यांना वाटलें.

परंतु नरसिंगरावाचे विचार कोणत्या दिशेनें वहात होते बरें ! त्यालाहि झोंप नव्हती. विनाकारण निर्मल आणि शुद्ध विमलेला शंकराचार्यांनीं बहिष्कृत केलें हा विचार ज्या ज्या वेळीं त्यांच्या मनांत येई त्या त्या वेळीं त्याचें डोकें भडकून जाई. तो जर त्यावेळीं चांगला बरा असता तर खरोखरीच स्वतः जाऊन शंकराचार्यांपुढें उभा राहिला असता आणि शंकराचार्यांच्या अधिकारावर रागाच्या भरांत सप्रमाण तोंडसुख घेरून त्यांच्याकडून झालेला प्रमाद त्यानें खात्रीनें पुन्हां सुधारून घेतला असता. परंतु अपघातामुळें त्याचा अगदीं नाइलाज झाला होता, विमलेच्या नांवाला कलंक लागणार म्हणून त्याच्या प्रेमांत फरक पडला काय ? त्याचें प्रेम असें दिखाऊ होतें काय ? केवळ उपकारबद्ध होऊन त्याची फेड म्हणून तो तिच्यावर प्रेम करीत होता काय ? नाहीं; सतत सहवासांत त्यांनीं परस्परांचीं मनें ओळखलीं होतीं. विमलेच्या प्रत्येक अलौकिक गुणाकडे पाहून तो तिला देवताच समजत होता. आतां तिच्यावर असा प्रसंग आला असतांनाहि त्याचें प्रेम उलट वृद्धिंगतच झालें होतें. आपण चालविलेल्या प्रयत्नांत आपल्या दुर्दैवानें जर अपयश आलें आणि एकदां घातलेला बहिष्कार हट्टाला पेटून शंकराचार्यांनीं रद्द केला नाहीं तरी जनापवादाला भीक न घालतां विमलेला आपली सहचारिणी करावयाची असा त्यानें निश्चय केला.

दुसऱ्या दिवशीं वडिलांच्या सांगण्याप्रमाणें कमला नरसिंगरावाचें तोंड धुण्याचें पाणी घेऊन आंत आली. घरांत इतके नोकरचाकर असून बाबा आपणांस हें असलें हलकें काम करावयास सांगतात त्याबद्दल ती आंतल्या आंत जळफळत असे. परंतु बापुसाहेबांच्या सक्त हुकुमापुढें तिची कांहींच मात्रा चालत नसे. तिनें पाणी आंत आणल्यावर तें जवळच्या मेजावर ठेविलें आणि ती म्हणाली,

"तुम्हाला आणखी कांहीं लागलें तर कोणाला तरी हांक मारा. माझा अजून अभ्यास झाला नाहीं—मी जातें." असें म्हणून ती जाऊं लागली. तेव्हां नरसिंगराव म्हणाला "कमले, तुझा काय अभ्यास असेल तो येथेंच येऊन करीनास ? माझी तरी करमणूक होईल."

"तुम्हाला नाहीं त्यांत कांहीं कळावयाचं—" असं तोऱ्यांत म्हणून ती चढेल पोर चटकन् बाहेर निघून गेली. तिच्या या उत्तरानें नरसिंगरावाला किंचित्काल हंसूं लोटलें. वाचकहो, बापुसाहेबांचे प्रयत्न चालू आहेत हें सर्व ठीक आहे. परंतु मुळांत असलेला हा छत्तीसाचा आंकडा उलटा व्हावा कसा, हा एक मोठा प्रश्न होता. नरसिंगरावाला कोणत्याहि गोष्टीचा मागमूस नसल्यामुळें तो कमलेकडे कोणत्या दृष्टीनें पहात होता त्याचा उल्लेख मागच्या एका प्रकरणांत येऊन गेलाच आहे.

नरसिंगराव तिला आवडूं नये असें त्याच्यांत काय होतें ? तो कुरूप होता, किंवा काळा होता अगर व्यसनी होता काय? उलट तो देखणा, स्वभावानें गोड आणि विद्वान होता. मग असें असून कमला त्याच्याबरोबर अशी फटकून कां वागत होती ? तो तिला आवडत नव्हता असें नाहीं. त्या हूड मुलीला स्वतःचें मत नसल्यामुळें शाळेंतील मुली चिडवूं लागतांच त्या पोरीनें डोक्यांत राख घातली होती इतकेंच ! तथापि तिचें मन तिच्या नकळत आपलें काम करीतच होतें. आपण बापाच्या सांगण्यावरून कां होईना, त्याच्या पुढें पुढें करतों हें जर एखाद्या मुलीनें पाहिलें तर—! अशी तिला भीति असे. शिवाय नोकर चाकरांनीं जीं कामें करावयाचीं तीं आपण करणें म्हणजे कमीपणा आहे अशी तिची श्रीमंती समजूत होती. परंतु इतकें असतांहि कांहीं तरी निमित्त काढून त्याच्या खोलींत जावें व त्याच्या मोहक चेहऱ्याकडे पहावें असें तिला वाटत असे. साखरेनें मुंगीला मोह पाडावा यांत नवल नाहीं.

इतका हात दुखूं लागला होता तरी चहापान झाल्यावर नरसिंगरावानें रात्रीं शंकराचार्यांना लिहिलेल्या अर्जाची स्वच्छ नक्कल केली. नेमलेल्या वेळीं डॉक्टरसाहेब आले. त्यांनीं नरसिंगरावाच्या उजव्या हाताला चढलेली सूज पाहून हा एकाएकीं असा प्रकार होण्याचें कारण विचारलें. तेव्हां बापुसाहेब म्हणाले कीं, 'तो रात्रीं बराच वेळ एकसारखा लिहीत होता.' डॉक्टर साहेबांनीं याबद्दल त्याला दोष दिला. त्यानंतर सर्व दुपारचा वेळ कांहीं विशेष घडलें नाहीं. त्यानें लिहिलेला अर्ज [illegible] होता. तो शंकरा-

चार्यांकडे पाठवावा किंवा नाहीं, याबद्दल त्यांचा विचार चालला होता. कदाचित् ह्या अर्जाचा योग्य परिणाम होऊन शंकराचार्यांनीं विमलेला ती शुद्ध असल्याबद्दल शुद्धिपत्र पाठविलें तर तिला पुनः जवळ करावी लागेल आणि नरसिंगरावाला कोणत्याही रीतीनें आपणास प्रतिबंध करतां येणार नाहीं; करितां कमलेविषयीं गोष्ट काढून त्याचा रुकार मिळेपर्यंत आपण हा अर्ज पाठवूं नये असें त्यांनीं ठरविलें. इकडे अर्ज हातावेगळा होतांच नरसिंगरावाला थोडें हलकें वाटूं लागलें. आपण केलेलें स्पष्टीकरण वाचतांच शंकराचार्य तात्काल आपली चूक सुधारतील म्हणजे मग बापुसाहेबांना सांगून आपण विमलेला येथेंच रहावयास बोलावूं असा त्याचा विचार झाला.

संध्याकाळ झाला होता. कमला नुकतीच शाळेंतून आली होती. ' चहा पाहिजे का ? ' असें विचारण्याच्या उद्देशानें ती एकदां नरसिंगरावाच्या खोलींत येऊन गेली. परंतु त्यापूर्वीच नरसिंगरावानें चहा घेतला होता. तो आपल्या विचारांत स्वस्थ पडला होता. इतक्यांत बाहेरच्या बाजूनें खिडकींत कोणी डोकावीत आहे, असें त्याला वाटलें. त्यानें ' कोण आहे ? ' असा प्रश्न करतांच जिवानें आपलें डोकें वर केलें. परंतु नरसिंगानें त्याला ओळखलें नाहीं. तथापि ' काय पाहिजे ?—आंत ये. ' असें म्हणून त्यानें जिवाला आंत बोलाविलें.

" आतां तुम्हांला कसें वाटतें असें विमलाताईनें विचारलें आहे. " जिवा दरवाजाजवळ येऊन म्हणाला.

" तूं विमलेकडून आला आहेस काय ? पण विमला आतां कुठें आहे ? तिनें प्रथम होऊन तुला माझ्या चौकशीकरितां पाठविलं आणि मी ह्या साहासात दिवसांत तिची चौकशीहि केली नाहीं.—मुला, आतां ती काय करीत होती ? ती कशी आहे ?—पण मी हें तुला काय विचारतों ! ती बिचारी आतां दुःखांत आणि चिंतेत चूर असणार, दुसरें काय ? इतकें असूनही तिला माझी किती काळजी ! तिनें माझ्या चौकशीकरितां—" अशा रीतीनें बोलतां बोलतां नरसिंगराव स्वतःबरोबरच एखाद्या वेड्यासारखा बोलूं लागला. तेव्हां जिवा थोडा पुढें होऊन म्हणाला, " मग काय सांगूं विमलाताईला ? ती मला म्हणाली, ' जिवा आज सहा दिवस मला त्यांची खबर कळली नाहीं रे '—"

" विमले, तुझ्या ह्या एका प्रश्नानेंच तुझें मजवरील निस्सीम प्रेम स्पष्ट व्यक्त होत आहे. विमले, तूं शुद्ध आहेस, निर्मल आहेस आणि तुझ्यावर असा

प्रसंग यावा काय ? पण तूं चिंता करूं नकोस. तुला निष्कलंक करण्याकरितां मी वाटेल तें करीन ? ”

“ पण तुमची खबर कशी आहे आतां ? पुनः जिवानें विचारलें. तेव्हां आपल्या विचारांतून जागा होऊन नरसिंगराव म्हणाला, “ माझी प्रकृति आतां पुष्कळ बरी आहे. दोन चार दिवसांत मला डॉक्टर उठण्याची व काठी घेऊन चालण्याची परवानगी देणार आहेत. पण थांब–मी तुला एक पत्रच लिहून देतों. ” नरसिंगरावानें बाजूच्या मेजावरील एक कागद घेतला आणि थोड्या वेळांत एक पत्र लिहिलें. त्या पत्राबरोबर शंकराचार्यांना लिहिलेला अर्ज विमलेला वाचण्याकरितां द्यावा किंवा नाहीं याचा त्याला क्षणभर विचार पडला. आपण काय प्रयत्न करीत आहोंत तें तिला प्रथम न कळवितां शंकराचार्यांकडून शुद्धिपत्र आल्यावर तें घेऊन आपण स्वतः जावें आणि तिच्या आनंदाचे वाटेकरी व्हावें, असा एक विचार त्याच्या मनांत आला. परंतु शुद्धिपत्र येईपर्यंत तिला चिंतेंत तळमळत ठेवण्यापेक्षां आपण हा अर्ज तिला वाचण्याकरितां पाठविला असतां आपणाकडून प्रयत्न चालू आहेत असें पाहून तिची चिंता बरीच कमी होईल. असा दुसरा विचार त्याच्या मनांत येऊन त्यानें पत्राबरोबर तो शंकराचार्यांकडे पाठविण्याकरितां प्रथम लिहिलेला अर्जहि दिला. जिवानें ते कागद घेतले आणि तो बाहेर पडला. त्या वेळीं बापुसाहेब बाहेरच्या ओटीवर एका कोष्टयाबरोबर बोलत उभे होते. त्यांनीं जिवाला हातांत कागद घेऊन जातांना पाहून विचारलें, “ कायरे पोरा, काय घेऊन चालला आहेस ?—थांब, पाहूं दे ते कागद. ”

जिवानें कागद पुढें केले. बापुसाहेबांनीं ते हातांत घेऊन उघडून पहातांना ‘ हे कुठें घेऊन चाललास ? ’ असें विचारलें. तोंच आंत असलेलें पत्र त्यांच्या दृष्टीस पडलें. आणि त्याचवेळीं ‘ विमलाताईकडे ’ असें जिवानें उत्तर दिलें. बापुसाहेबांनीं तें पत्र उघडलें, हें पाहतांच जिवानें चटकन् झडप घालून ते सर्व कागद त्यांच्या हातांतून हिसकावून घेतले.

“ गाढवा, आण ते कागद इकडे ! ” बापुसाहेब रागानें म्हणाले.

“ हें पत्र तुमचें नाहीं. विमलाताईचें पत्र तुम्ही कोण वाचणार ? ” असें उत्तर देऊन जिवानें तेथून धूम ठोकली. बापुसाहेब त्याच्या वाटेकडे पहात गुरगुरत स्वस्थ उभे राहिले. त्यांना अतिशय संताप आला परंतु करतात काय ! जिवा तेथून निघाला तो थेट विमलेजवळ आला आणि ते

कागद त्यानें तिच्या स्वाधीन केले. गेल्या प्रकरणांत त्याचा उल्लेख येऊन गेलाच आहे. इकडे बापुसाहेब बराच वेळपर्यंत तेथें उभे राहिले. त्यांच्या-समोर उभा असलेला म्हातारा कोष्टी शेवटीं कंटाळून 'जातों बापुसाहेब' असें म्हणून निघूनहि गेला तरी तें त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. पुष्कळ वेळानें ते स्वतःशीं म्हणाले, 'येथपर्यंत गोष्ट गेली हें कांहीं चांगलें झालें नाहीं. पत्रांत नरसिंगानें त्या पोरीला काय लिहिलें होतें तें जरी मला वाचावयाला मिळालें नाहीं, तरी सुरवातीला 'जीवितेश्वरी!' म्हणून तिला संबोधिलें आहे त्यावरून पत्रांतील मजकुराची सहज कल्पना होण्यासारखी आहे. आतां स्वस्त राहून उपयोगी नाहीं. एकदांचा सोक्षमोक्ष लावून टाकलेला बरा!' असें म्हणून ते आंत आले आणि नरसिंगरावाच्या खोलींत गेले. तो पलंगावर स्वस्थ विचार करीतच पडला होता. बापुसाहेब आंत आल्यावर प्रथम त्यांनीं प्रकृतीची चौकशी केली आणि एक खुर्ची जवळ ओढून ते म्हणाले, "नरसिंगा, तुला बऱ्याच गोष्टी सांगावयाच्या आहेत. पण त्या मी इतक्यांतच सांगणार नव्हतों. तुझी प्रकृति ईश्वरकृपेनें आतां सुधारत चालली आहे. आणखी थोड्या दिवसांनीं तूं साफ बरा झाल्यावर मी तुला त्या गोष्टी सांगण्याचा विचार केला होता. परंतु मला आतां असं वाटूं लागलं आहे कीं, मी तुला त्या गोष्टी जितक्या लवकर सांगेन तितकं चांगलं."

"माझं कल्याण व्हावं अशीच तुमची केव्हांहि इच्छा असणार."

"म्हणून तुला विचारतों कीं, तूं ह्यापूर्वी आपल्या भावी आयुष्यक्रमाचा कधीं विचार केला आहेस काय?"

"नाहीं. तसा किंवा तितका विचार करण्याचा माझ्यावर केव्हांहि प्रसंगच आला नाहीं. पण आज तुम्ही मला असें कां विचारतां?"

"कारण तसा प्रसंग आतां आला आहे म्हणून! तुला तुझ्या स्वतःविषयीं फार थोडी माहिती आहे हें मी जाणून आहें. ती सर्व माहिती तुला आज करून देऊन मीं तुझ्याबद्दल जो एक विचार करून ठेविला आहे तोहि आज तुला कळवावा अशी माझी इच्छा आहे." असें म्हणून बापुसाहेबांनीं खुर्ची आणखी जवळ ओढून घेतली व ते पुढें बोलूं लागले, 'तुला तुझ्या वडिलांची चांगलीच आठवण असेल? त्यांना कसा मृत्यु आला तें तुला ठाऊक असेलच! कर्जाचा बोजा अतिशय झाल्यावर कातावून जाऊन त्यांनीं खरो-खरीच आत्महत्या केली. तो प्रसंग टळावा म्हणून मीं त्यांची सर्व इस्टेट

माझ्याकडे गहाण लावून घेऊन किंमतीच्या बाहेर मीं त्यांना रक्कम दिली. वास्तविक तसें करण्याचें मला कांहीं कारण नव्हतें. परंतु केवळ स्नेहसंबंध म्हणून ! शिवाय सोईरसंबंध खरा पण तो फार दुरचाच. मालेगाव—तुझे वडील वारले त्यावेळीं तूं सहा वर्षांचा होतास. बापाच्या मागें तूं अगदीं उघडा झालास. तेव्हांपासून आजदिनपर्यंत एकोणिस वर्षें मीं तुझे संगोपन आणि शिक्षण कसें केलें हें मी सांगायला पाहिजे असें नाहीं. प्रथम दोन वर्षें तुला घरांत मुलासारखा वाढवून तुझें प्राथमिक शिक्षण पूर्ण करून घेतल्यावर मी तुला उच्च शिक्षणाकरितां अलाहाबादेच्या सेंट्रल हिंदु कॉलेजमध्यें घातलें. तेथें दरमहा पन्नास रुपये म्हणजे वर्षाचे सहाशें रुपये, अशा रीतीनें आज दहा अकरा वर्षांत सहा हजार रुपये खर्च केले. आतां सर्व रकमेची गोळा बेरीज केली तर तुझ्या वडिलांना मीं चाळीस हजार रुपये दिले आणि तुझ्या प्रीत्यर्थ हे सहा हजार शिवाय त्या चाळीस हजारांचें आज वीस वर्षांचें व्याज. इतकं असूनहि माझ्याकडे गहाणांत आलेल्या इस्टेटीची वर्षाआड डागडुगी करण्याचा चार पांचशेंचा खर्च. ते सहज पांच हजार तरी होतील. आणि ह्या इतक्या वर्षांत चारवेळां दुष्काळामुळं पीक न येतां तुमच्या शेतजमिनीचा सरकारधारा पांचशें रुपये अंगावर पडला तो निराळा. आतां ही इतकी रक्कम फेडण्याकरितां तूं आपल्या रक्ताचें पाणी केलेंस तरी शक्य आहे काय ? शिवाय आतां थोड्या महिन्यांनीं गहाण इस्टेटीला वीस वर्षें पूर्ण होतील. तेव्हां ह्या थोड्या महिन्यांच्या अवधींत तुला आपली सर्व इस्टेट सोडवून घेणें शक्य आहे काय, याचा तूं विचार कर. आज तुझा माझा लोभ आहे ही गोष्ट तूं जमेस न धरतां मी सावकार आहें आणि ह्या माझ्या सर्व रकमेची मी मागणी करीत आहें. असें गृहीत धरून चाल. तुला ही सहा महिन्यांची मुदत दिली आहे. ह्या मुदतींत तूं इस्टेट सोडवून घेतली नाहींस, तर सर्व इस्टेटीचा जाहीर लिलाव करून रक्कम वसूल केली जाईल. लिलाव करूनहि रक्कम पूर्ण झाली नाहीं तर ती तुला इतर साधनांनीं पूर्ण करून द्यावी लागेल. अशा रीतीनें सर्व इस्टेट जाऊनहि बरेंच कर्ज बाकी राहील. तेव्हां आतां पुढें काय करायचें तूं योजिलें आहेस तें मला सांग. ''

नरसिंगरावानें इतका वेळ बापुसाहेबांच्या चेहऱ्यावर स्थिर केलेली आपली दृष्टि फिरविली आणि वरच्या छताकडे तो पाहूं लागला. आपल्या वडिलांनीं बापुसाहेबाकडून कांहीं रक्कम काढिली आहे, हें त्याला ठाऊक

होतें. परंतु सर्व गोष्टी आहाराच्या बाहेर गेल्या आहेत ही त्याला कल्पनाहि नव्हती. आपण हल्लीं [illegible] मेहेरबानीमुळेंच हे सुखात दिवस घालवीत आहोंत, वास्तविक कोणतीहि गोष्ट सत्तेनें करण्याचा आपणास काडीचाहि अधिकार नाहीं; इतकेंच नव्हे तर त्यांनीं आज आपला आश्रय तोडला तर आपण एका पैलाहि महाग आहोंत, इत्यादि अनेक विचार त्याच्या मनांत येऊन तो म्हणाला, " मामा, मी सांप्रत कोणत्या स्थितींत आहें, हें आपण जाणतच आहांत. माझी एकंदर परिस्थिति ठाऊक असून आपण मजवर जे अनेक उपकार केले आहेत, आणि दिवसेंदिवस त्यांच्यांत जी अधिक भर पडत आहे, त्यांची फेड मजकडून होणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें आपण मला जो हजारों रुपयांचा हिशोब आतां दिला त्याचीही मजकडून फेड होणें शक्य नाहीं. सर्व गोष्टी आपणास माहिती असूनहि आपण मजवर इतका लोभ दाखवितां. तेव्हां माझें पुढील आयुष्य सुखांत जावें अशी आपण कांहीं तरी योजना करून ठेविलीच असेल ? "

" होय. मीं तर तशी योजना करून ठेविलीच आहे. परंतु त्या योजने-प्रमाणें घडवून आणणें सर्वस्वी तुझ्याच हातीं आहे. तुला दिसतेंच आहे कीं, आतां माझं वय झालं आहे. अलीकडे एक वर्ष माझी प्रकृति वरचेवर नादु-रुस्त असते. डॉक्टरांचें मत असें आहे कीं, कांहीं कारणामुळें माझी हृदयक्रिया फार अनियंत्रित चालते. ती केव्हां दगा देईल हें सांगतां येत नाहीं; म्हणून मी फार सावधरीतीनें वागलं पाहिजे. मला जी माझ्या व्यवहारासंबंधीं व्यवस्था करून ठेवावयाची आहे; त्यांत तुझा बराच संबंध आहे, म्हणून मी तुला मुद्दाम घरीं बोलाविलें. तुझा अभ्यास आतां पूर्ण झाला. तूं माझा देणेकरी जरी आहेस तरी पुढें मागें 'मला मामानें शिक्षण दिलें नाहीं.' असें बोलण्यास मीं जागा ठेविली नाहीं. उद्यां जरी एखाद्या गोष्टीवरून तुझें माझें पटलें नाहीं तरी आतांपर्यंत झालेल्या शिक्षणाच्या जोरावर तुला स्वतःच्या पायावर उभें राहतां येईल. पण इतक्या थराला गोष्टी जाणार नाहींत अशी माझी खात्री आहे. मी आतां स्वतःच्या व्यवहाराची निरवानिरव करण्यापूर्वी तुझ्या व्यवहाराचा मला प्रथम विचार कर्तव्य आहे. आणि ह्या तुझ्या व्यवहारावरच माझ्या स्वतःच्या व्यवहाराची निरवानिरव अवलंबून आहे. "

" मग आपण काय योजिलं आहे तें मला सांगा म्हणजे मला विचार करण्यास ठीक पडेल. "

" मी अशी योजना केली आहे कीं, तूं आणि कमलेनं एक व्हावें म्हणजे मग मला तुझ्या आणि माझ्या व्यवहाराची निराळी व्यवस्था करण्याची कांहींच आवश्यकता नाहीं. माझ्या मागें आहे हें सर्व तुमचेंच!"

---

## १६ हक्काची पायमल्ली

एक तर विचारानें विचार वाढतो असें म्हणतात; त्यांतून त्या वाढत्या विचारांत नवीन गोष्टीची भर पडली म्हणजे मग विचाराच्या वाढीचें प्रमाण चक्रवाढ व्याजासारखें वाढू लागतें. नरसिंगरावाच्या विचारांची वाढ अशाच प्रकारची होती. बापुसाहेबांनीं त्याच्याजवळ गोष्ट काढली आणि आपलें मनोगत त्याला कळविलें परंतु त्याच्याकडून तात्काळ उत्तर मिळणार होतें थोडेंच! बापुसाहेबांनीं आपलें मनोगत सांगतांना उत्तराची अपेक्षा केली नव्हती खरी तथापि त्यांना उत्तर हें पाहिजेच होतें. त्यांनीं आतांपर्यंत केलेलें भाषण अगदीं शांतपणानें केलें. नरसिंगरावाचें आणि विमलेचें एकसूत झालेलें आहे याची आपणांस ओळख देखील नाहीं, असें भासवून त्यांनीं आपलें मनोगत प्रगट केलें होतें. वास्तविक त्यावेळीं बापुसाहेब रागांतच होते. कारण नरसिंगरावानें विमलेला लिहिलेलं पत्र त्यांनीं नुकतेंच ओझरतें पाहिलें होतें व त्या पत्रावरून बहुतेक सर्व गोष्टी त्यांच्या लक्षांत आल्या होत्या. परंतु आपण प्रथमच जोरांत येणें चांगलें नाहीं, असा पोक्त विचार करून ते फार सांभाळून बोलत होते.

" हें पहा, मला कांहीं दोन चार मुलं नाहींत, तेव्हां त्यांच्यांत माझ्या इस्टेटीची वाटणी करावयाची आहे! आहे तें सर्व कमलेचें आहे. परंतु तुझं मात्र सर्व भानगडीचं आहे. आतां घटकाभर असंच धरून चाल कीं, तुझी सर्व इस्टेट एका सावकाराकडे आहे. आणि मुदत भरत आली असून ती इस्टेट सोडविणें तुझ्या शक्तीबाहेरचें काम झालें आहे. थोडक्यांत सांगावयाचं म्हणजे जवळ जवळ ती सर्व इस्टेट तुझ्या हातून गेल्यासारखीच आहे. इस्टेटीसंबंधानें तुझी पूर्ण निराशा झाली आहे. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं त्या सावकारानें तुला एक अट सांगितली. ती अट ही कीं, तूं त्या सावकाराच्या मुलीबरोबर लग्न करावें, म्हणजे तुझी सर्व इस्टेट तुझ्या ताब्यांत येईल;

इतकेंच नव्हे तर त्याचीहि इस्टेट पुढें तुलाच मिळेल. तेव्हां मला वाटतं की, अशी जर सर्वतोपरी फायद्याची अट तुझ्यापुढें आली असेल तर तूं त्या अटीला मोठ्या आनंदानें रुकार द्यावा."

"मामा, इतकं सावकाराचं उदाहरण देऊन तुम्हीं ही गोष्ट सांगण्याची जरूरी नव्हती. आपल्या पहिल्या भाषणावरूनच मला आपल्या इच्छित हेतूचा चांगला बोध झाला होता. तुम्ही म्हणतां त्या सर्व गोष्टी खऱ्या. परंतु ह्या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वी मला बराच विचार केला पाहिजे."

"मग तुला माझी कमला आवडत नाहीं काय?"

"मामा, हा आवडण्याचा प्रश्न नाहीं. हा प्रेमाचा प्रश्न आहे."

"हें प्रेमाबद्दल तुम्हा तरुणांचं कांहीं तरी खूळ आहे. पण तें कांहीं असो. मी आजच तुला 'उत्तर दे' म्हणून सांगत नाहीं. केव्हांहि मला उत्तर दे. फक्त दोन्ही बाजू मी तुझ्यापुढें मांडल्या आहेत त्याची आठवण ठेवून मग काय तें उत्तर दे, इतकेंच माझें सांगणें आहे." असें म्हणून बापुसाहेब उठले.

नरसिंगराव प्रेमवेडा नव्हता किंवा त्याची वृत्ति उच्छृंखल नव्हती. बापुसाहेबांनीं विचारलेला प्रश्न आपणास फार विचार करावयास लावणारा आहे, इतकेंच नव्हे तर आपल्या भावी आयुष्यांतील सुखदुःखाची क्रांति घडविणारा आहे; हें तो समजत होता. कोणत्याही गोष्टीचा दोन्हीं बाजूंनीं विचार करण्याचा त्याला अभ्यास असल्यामुळें त्यानें त्या बाबतींत स्वतःच्या मनाला केलेला प्रश्न आणि एखादें उदाहरण सोडवितांना एखादा विद्यार्थी ज्याप्रमाणें पद्धतशीर आंकडेमोड करतो त्याप्रमाणें त्यानें साधकबाधक बाजूंना केलेला पद्धतशीर विचार फार मार्मिक होता. प्रथम त्यानें 'बापुसाहेबांचें कर्ज आपणास थोड्या राहिलेल्या मुदतींत फेडतां येणें शक्य आहे काय?' हा विचार पुढें आणिला. त्याचें 'नाहीं' असें उत्तर मिळतांच 'बापुसाहेबांची अट आपणास मान्य करतां येईल काय?' असा दुसरा प्रश्न पुढें आणिला. त्याचा विचार करतां 'ती अट मान्य करतां येईल पण केव्हां?—विमलेचें प्रेम झिडकारिलें असतां!' असें उत्तर मिळतांच 'विमलेचें प्रेम झिडकारितां येणें शक्य आहे काय?' असा तिसरा पण फार महत्त्वाचा—त्याच्या भावी आयुष्यांतील सर्व सुखाचा निर्णय करणारा प्रश्न त्याच्यापुढें आला. हा एकच प्रश्न 'होय' किंवा 'नाहीं' ह्या शेलक्या उत्तरांनीं सुटणारा नव्हता. ह्या एका प्रश्नावर त्याच्या सर्व सुखाची मदार अवलंबून होती. तेव्हां अशा या महत्त्वाच्या प्रश्नावर त्यानें विचार

करकरून सर्व रात्र जागून काढली असल्यास त्यांत नवल मानण्याचें कांहींच कारण नाहीं. त्यानें विमलेच्या प्रेमाची आणि सर्व इस्टेटीची तुलना केली. त्यांत प्रेमाचीच टाळी वाजली. विमलेच्या प्रेमापुढें त्याला सर्व इस्टेट क:पदार्थ वाटूं लागली. वास्तविक इतकेंच त्याचे विचार थांबावयास पाहिजे होते. परंतु ह्या विचारांची वाढ चक्रवाढव्याजाप्रमाणें असल्यामुळें मुद्दल विचारांना घेऊन ज्याजी असलेल्या विचारांसह ते वाढूं लागले.

कमलेबरोबर लग्न करण्याची कल्पना त्याला किती तरी चमत्कारिक वाटली. कमलेच्या आणि विमलेच्या स्वरूपांत त्याला पुष्कळसें साम्य जरी दिसत होतें. तरी इतर बाबतींत—विमलेचा आचार, विचार आणि स्वभाव यांचा विचार मनांत येतांच कमलेविषयीं सर्व विचार त्याच्या मनांतून हद्दपार होत असत. अशा रीतीनें विचारांत ती सर्व रात्र गेली. दुसरा दिवस देखील अशाच रीतीनें गेला. ह्या दिवशीं बापुसाहेबांची प्रकृति थोडी नादुरुस्त झाल्यामुळें ते आपल्या दिवाणखान्यांतून बाहेर आले नाहींत. परंतु सर्व दिवस त्याची मनःस्थिति फारच चमत्कारिक झाली होती, त्यांनीं सर्व दिवसांत कैक वेळां तरी मोठमोठ्यानें उश्वास सोडले; कैक वेळां तरी त्यांच्या मुखांतून विमलेच्या आणि नरसिंगरावाच्या नांवाचा अर्धवट उच्चार झाला. एकंदरीनें सर्व दिवस त्यांच्याहि मनाला स्वास्थ्य नव्हतें. आपण सर्व गोष्टी नरसिंगरावाला सांगितल्या परंतु त्याच्याकडून आपणास उत्तर मिळालें नाहीं. या गोष्टीची त्यांना आठवण झाली म्हणजे त्यांचें मन अस्वस्थ होई. आपल्या मनांत विमलेसंबंधानें जें कांहीं घोळत आहे तें त्याला सांगावें असेंहि त्यांना वाटे. परंतु लगेच त्यांचा विचार बदलत असे. आपण कोणत्याच गोष्टीची ओळख न देतां आपल्या प्रश्नाला उत्तर काय येतें तें पहावें आणि आपल्या मनासारखें झाल्यास ठीकच आहे, नाहींतर मग जे कांहीं आपणास कडक उपाय योजणें असतील त्यांचा विचार करूं असें त्यांनीं ठरविलें.

आणखी दोन दिवस गेले. नरसिंगराव भिंतीच्या किंवा इतर आधारानें आतां उभा राहूं लागला. त्याचा हातहि पुष्कळ बरा होता. कपाळावरील जखम बहुतेक बरी झाली होती. त्याला आजच डॉक्टरानें उभें राहण्याची व थोडें थोडें चालण्याची परवानगी दिली होती. जवळ जवळ दोन महिन्यांनीं आज तो उभा राहिला. बापूसाहेब, कमला आणि एक नोकर इतकी मंडळी त्याच्याजवळ होती. थोड्या वेळानें तो एक एक पाऊल टाकूं लागला.

तें पाहून कमला हलक्या आवाजांतच म्हणाली, "आतां कुठें बाळ एक एक पाऊल चालूं लागलं!"

कमलेचा हा विनोद ऐकून बापुसाहेब आणि नरसिंगराव हंसूं लागले. परंतु क्षणभरानें त्या दोघांनाहि कमलेच्या विनोदाचें आश्चर्य वाटलें. वास्तविक ती तिच्या स्वभावानुसार इतक्या मोकळ्या मनानें बोलली म्हणजे नवल तर खरेंच; परंतु आठ दहा दिवसांच्या परिचयानें नरसिंगराव आपल्या घरांतीलच एक आहे अशी आतां तिची समजूत झाली होती. ती आतां त्याच्याजवळ बसून गप्पा गोष्टीहि करूं लागली होती. आपले वडील आपणास नरसिंगरावाच्या पुढें पुढें करण्यास सांगतात, यांत कांहीं तरी विशेष अर्थ असेल अशी तिला अद्यापि कल्पना देखील झाली नव्हती. केवळ आपल्या वागण्यानें त्याला परकेपणा वाटूं नये म्हणून आपणांस ते असें सांगत असतील अशी तिनें स्वतःची समजूत करून घेतली होती. असें जरी होतें तरी तिचा हूड स्वभाव मधून मधून दृग्गोचर होत असे. तिच्या स्वभावांतील गोमही नरसिंगरावांच्या तेव्हांच लक्षांत आली होती. आणि ही वाईट खोड तिनें टाकावी म्हणून प्रसंगानुसार प्रयत्न करण्याचा त्यानें विचार करून ठेविला होता. तो तिच्या बरोबर प्रेमानें व मोकळ्या मनानें वागत असे. गेल्या दोन दिवसांत त्याच्या मनावर विचारांचें दडपण जास्त पडल्यामुळें तो बहुतेक सर्व वेळ गप्पच होता. ही स्थिति कमलेच्या लक्षांत यावयाला फारसें कठीण नव्हतें. जगांत आपणांस असें दिसून येतें कीं, एकाद्या कुर्रेबाज मनुष्याबरोबर दुसरा एखादा साधा मनुष्य प्रेमानें मिळून मिसळून वागूं लागला म्हणजे तो कुर्रेबाज मनुष्य मोठ्या तोऱ्यानें आणि आढ्यतेनें वागतो. जणुं काय आपण म्हणजे कोणी तरी 'बडे' असेंच त्याला वाटत असतें. परंतु पुढें त्या दुसऱ्या साध्या मनुष्यानें त्याच्याबरोबर मिळून मिसळून वागण्याचें सोडलें म्हणजे मग वस्तुस्थिति बदलते. तो दुसरा मनुष्य आपली हांजी हांजी करीत नाहीं असें त्या मिजासखोर मनुष्याच्या लक्षांत आलें म्हणजे मग तो स्वतःच पुढें पुढें करूं लागतो. असाच प्रकार कमलेच्या बाबतींत झाला. नरसिंगराव त्यांच्या घरीं आल्यापासून तो तिच्याबरोबर प्रेमानें आणि मिळून मिसळून वागत असतां ती त्याच्याबरोबर श्रीमंती डौलानें व चढेलपणानें वागत असे. परंतु गेल्या दोन दिवसांत नरसिंगराव स्वतःच्या विचारांत अगदीं गढून गेल्यामुळें तोहि कमला त्याच्या खोलींत आली किंवा गेली तरी सहसा

तिच्याबरोबर बोलला नाहीं. ही स्थिति तिच्या लक्षांत येतांच त्यानें आपणाबरोबर दोन शब्द तरी बोलावे असें तिला वाटूं लागलें. ती कांहीं तरी निमित्त काढून आज सकाळपासून त्याच्या खोलींत सत्रादां गेली. शेवटीं वर लिहिल्याप्रमाणें प्रकार घडला. तिचा विनोद ऐकून बापुसाहेबांस आश्चर्य तर वाटलेंच परंतु त्याबरोबरच त्यांना फार समाधान झालें. अशा रीतीनें आपली मुलगी उघड आणि प्रेमानें वागूं लागल्यास आज नाहीं उद्यां नरसिंगरावाचें मन वळेल असेंहि त्यांना वाटलें.

सायंकाळीं बापुसाहेब जवळ बसले असतां नरसिंगरावानें शंकराचार्यांच्या अर्जाची गोष्ट काढिली. बापुसाहेब थोडेसे गडबडले. 'खाई त्याला खवखवे!' अशी त्यांची स्थिति झाली. त्यांनीं अद्यापि तो अर्ज शंकराचार्यांकडे पाठविला नव्हता आणि न पाठविण्याचें कारण वाचकांना ठाऊकच आहे. नरसिंगरावाच्या प्रश्नाला उडवाउडवीचें उत्तर देत ते म्हणाले, "पण नरसिगा आपण खटपट करून त्या मुलीच्या नांवाला लागलेला कलंक धुवून निघाला तरी लोक तिच्याबरोबर व्यवहार करण्यास माघारच घेतील."

"पण विमलेनें लोकांच्या म्हणण्याकडे लक्ष देण्याचें काय कारण आहे? किंवा तिला लोकांशीं तरी काय कर्तव्य आहे?"

"असं का म्हणतोस? ती अद्यापि अविवाहित आहे. तेव्हां लोकांशीं तिला कर्तव्य नाहीं असें म्हणून कसें चालेल?"

"कसें चालेल तें मी सांगतों. समजा कीं, विमलेविषयीं सर्व वस्तुस्थिति चांगल्याप्रकारें माहित आहे. आणि ज्याचें तिच्यावर निस्सिम प्रेम आहे असा एखादा तरुण जर तिच्याबरोबर लग्न करण्यास तयार झाला तर?"

"तर मग लोक तिच्याप्रमाणें त्याच्याबरोबरहि आपला व्यवहार बंद करतील. म्हणजे जवळजवळ त्या जोडप्याला बहिष्कृत स्थितींतच आपला पुढला काळ कंठावा लागेल."

"इतकेंहि सर्व आपल्या प्रेमाच्या जोरावर तें जोडपें सोसण्यास तयार असल्यास मग?"

"मग काय त्यांच्या प्रेमाचें कौतुकच केलें पाहिजे दुसरें काय? पण त्या मुलीबरोबर लग्न करण्यास असा कोणता तरुण आज तयार आहे, तें तरी मला कळूं दे! अशा रीतीनें का होईना पण त्या मुलीचें लग्न झालेलें ऐकून मला आनंदच होईल."

ह्या बापुसाहेबांच्या प्रश्नाचें उत्तर त्याच्या अगदीं ओंठावर आलें होतें. परंतु त्यानें जीभ चावली. तरी देखील एकदांचें उत्तर देऊन आपण मोकळें व्हावें, असेंच त्याला वाटूं लागलें. तो म्हणाला, "मामा, मी तुम्हाला असं विचारतों कीं, समजा, एखादा तुमच्या पूर्ण परिचयांतील मनुष्य विमलेबरोबर विवाह करण्यास तयार झाला, तर तुम्ही त्यांच्याबरोबर कसे वागाल ?"

"इतर लोक त्याच्याबरोबर जसे वागतील तसाच मी देखील वागेन."

"मग यांत तुम्ही विशेष तें काय करणार ? विमलेविषयीं सर्व खरीखरी हकीकत तुम्हाला माहित आहे. तिनें बाप्तिस्मा घेतला नाहीं हें देखील तुम्ही प्रतिज्ञेनें सांगतां, असें असूनहि जर तुम्ही इतरांप्रमाणेंच वागणार असाल तर मग मोठेंच आश्चर्य म्हणावयाचें !"

"अरे, पण पुढल्या गोष्टीबद्दल ही काथ्याकूट आतांच कशाला हवी आहे ! तिच्याबरोबर लग्न करण्यास कोण तयार आहे, हें कळलें म्हणजे मग पुढें कसें वागावयाचें तें सांगतां येईल."

"असं का ?—मग असंच समजा कीं, मी तिजबरोबर—"

"काय—काय—नरसिंगा ! अरे, हें तूं काय बरळतोस ? ती कोण, तूं कोण याचा कांहीं तरी विचार !"

"मामा, आतां मी आपणास खरंच सांगतों कीं, माझं विमलेवर निस्सिम प्रेम आहे आणि तिजबरोबर—"

"लग्न करणार आहेस ? नरसिंगा, तूं इतका पुढें वाहवशील अशी माझी कल्पनासुद्धां नव्हती. आतां तूं जसें खरें सांगितलेंस तसेंच मीहि सांगतों—तूं संतोबाच्या घरीं असतांनाच मला हा तुमच्या प्रेमसंबंधाचा संशय आला आणि तूं जास्त वाहत जाऊं नयेस म्हणून मी तुला इकडे आणण्याची इतकी घाई केली. परंतु इतकें करूनहि जें होऊं नये अशी माझी इच्छा होती, ती गोष्ट झाली असें आतां तुझ्या बोलण्यावरून झालें. तर आतां मीहि तुला स्पष्टच सांगतों कीं, परवां जी गोष्ट मी तुझ्याजवळ काढिली त्याप्रमाणेंच तूं माझ्या कमलेबरोबर लग्न केलें पाहिजे. नाहींतर परिणाम काय होईल तो तुला माहितच आहे. उगाच भलत्याच गोष्टीचा हट्ट धरून तूं आपलें नुकसान करून घेऊं नकोस. प्रेम प्रेम म्हणून तूं जें कांहीं बोलतोस त्यावर माझा काडीइतका देखील विश्वास नाहीं. ह्या सर्व तुम्हां तरुण मंडळीच्या अल्लड कल्पनाच आहेत. त्या पोरीचें प्रेम काय तुला इंद्रपद देणार आहे ? उलट कफल्लक बनून चौपदरी

गळ्यांत अडकवावी लागेल; शिवाय सर्व जग तुला बहिष्कृत करील तें निराळें! विचार कर. माझी कमला सुन्दर नाहीं काय ? तिच्यावर तुला प्रेम करतां येणार नाहीं काय ? पहा—पुनः नीट विचार कर. तूं आतां लहान नाहींस. आपलें कल्याण कशांत आहे हें तूं चांगलें जाणतोस. "

अद्यापि बापुसाहेबांनीं आपलें खरें स्वरूप प्रकट केलें नव्हतें. ते इतका वेळ शांतपणानें जरी बोलत होते, तरी त्यांच्या भाषणांत करारीपणा दिसून येत होता. आजचें त्यांचें भाषणहि उत्तराची अपेक्षा करणारें होतें. परंतु 'मला उत्तर दे' असें मात्र ते स्पष्टपणें म्हणाले नाहींत. नरसिंगराव स्तब्धच होता. बापुसाहेब पुढें कांहीं म्हणणार होते इतक्यांत कमला आंत आली आणि 'बाहेर कोणी मनुष्य आला आहे' अशी तिनें बापुसाहेबांना वर्दी दिली. तेव्हां त्यांनीं खुर्चीवरून उठतांना तिला तेथेंच बसण्याची डोळ्यांनीं खूण केली. ती खूण पाहून कमलेला थोडेंसें चमत्कारिक वाटलें. तिनें एकदां आपल्या पित्याकडे आणि एकदां नरसिंगरावाकडे पाहिलें. त्यांत बापुसाहेबांची मुद्रा तिला गंभीर दिसली. आणि नरसिंगराव कोणत्या तरी खोल विचारांत मग्न असलेला तिला दिसला. आपण येण्यापूर्वी येथें कोणत्या तरी कडाक्याच्या गोष्टी चालल्या होत्या आणि नरसिंगरावाला ते कांहींतरी बोलले असावेत अशी तिनें कांहींतरी अटकळ केली. ती आली आणि जवळ बसली परंतु नरसिंगरावानें तिच्याकडे लक्ष दिलें नाहीं. लक्ष दिलें नाहीं असें म्हणण्यापेक्षां ती आंत आली आणि वडिलांच्या सांगण्यावरून ती तेथें मुद्दाम बसली, या गोष्टीची त्याला जाणीव देखील झाली नाहीं. पुष्कळ वेळ झाला. कमलेला तेथें एखाद्या पुतळ्याप्रमाणें बसण्याचा कंटाळा आला. तेव्हां ती चळवळ करूं लागली. तरी देखील नरसिंगरावानें तिच्याकडे लक्ष दिलें नाहीं. शेवटीं ती म्हणाली, " कायहो नरसिंगराव, मी मघांपासून पहातें आहें, तुम्ही कोणत्या तरी एखाद्या खोल आणि महत्त्वाच्या विचारांत पूर्ण गढलेले दिसतां ! असा कोणता मोठा विचार चालला आहे ? "

एक दीर्घ श्वास सोडून नरसिंगराव कपाळावरून हात फिरवीत म्हणाला, " कमला, मी कोणता विचार करतों हें जाणण्याची तुझी इच्छा आहे काय ? पण तुझ्या अभ्यासांत जसं मला कळत नाहीं, तसंच माझ्या विचारांत तुला काय कळणार आहे ? "

" नरसिंगराव, तुम्ही मोठे हेच आहांत हो! त्या दिवशीं मी बोललें तें लक्षांत वागवून अगदीं ' टिट् फॉर ट्याट् '—' दे वाण घे वाण ' करून मोकळे झालांत! मी त्या दिवशीं तसें बोललें खरी पण मागाहून मला फार वाईट वाटलं. तुम्ही येथें आल्यापासून मला माझ्या स्वभावांतील चुका दिसूं लागल्या आणि त्या मी सुधारण्याचा प्रयत्न करीत आहे."

" कमला, तुझ्या चुका तुला दिसूं लागल्या हीच मोठी महत्त्वाची गोष्ट आहे. तुझ्यासारख्या संपत्तींत लोळणाऱ्या मुलीला प्रथम स्वतःच्या चुका काय आहेत हेंच मुळीं कळतां कळतां मारामार! बरं, त्यांतून एकादी चूक कळलीच तर ती सुधारेल अशी तर मुळींच आशा करायला नको. आतां तुला जिज्ञासा झाली आहे तेव्हां मी काय विचार करतों हें तुला मी अवश्य सांगावयास पाहिजे पण माझे विचार तुला कळतील किंवा नाहीं ह्याबद्दल मला शंका आहे."

" हेंच ते! एवढ्याचकरितां मला तुम्हां पुरुषांचा राग येतो. आम्ही बायका म्हणजे कोणीच नाहीं, आम्हाला डोकंच नाहीं, आम्हाला अंतःकरण नाहीं, अशी का तुम्हा पुरुषांची समजूत आहे?"

नरसिंगराव आश्चर्यानें अगदीं थक्क झाला! कमला म्हणजे एक श्रीमंतींत वाढलेली मिजासखोर अल्लड पोर आहे अशी आतांपर्यंत त्याची समजूत होती. तिची माहिती अथवा ओळख असणारी प्रत्येक व्यक्ति इतकेंच कशाला परंतु खुद्द बापुसाहेब देखील असेंच समजत होते. ती मिजासखोर होती परंतु अल्लड मात्र नव्हती. तिच्या अंगीं एकच मोठा जबरदस्त दुर्गुण होता. आणि तो दुर्गुण म्हणजे आपणापेक्षां स्वरूपानें जास्त सुंदर किंवा पोषाखांत अधिक फॅशनेबल अगर अधिक श्रीमंत अशी एखादी समवयस्क मुलगी तिनें पाहिली कीं तिच्या हेव्याला सुरवात होई. एखाद्या समारंभाच्या ठिकाणीं कमला गेली असतां तेथें तिच्यापेक्षां सुंदर, फॅशनेबल आणि श्रीमंत अशी एखादी मुलगी नसली म्हणजे मग कमलेसारखी आनंदी, बोलकी आणि विनोदी अशी दुसरी एकहि मुलगी त्या ठिकाणीं मिळावयाची नाहीं. परंतु जर कां वर वर्णन केल्याप्रमाणें तेथें एखादी मुलगी तिच्यापेक्षां अधिक सुंदर कां असेना, मग झालें! कमलेच्या कपाळाला आठ्या पडल्याच! मग ती कोणाबरोबर धड बोलायची देखील नाहीं. अशा एका प्रसंगाचें वर्णन वाचकांनीं मागल्या एका प्रकरणांत वाचलेंच आहे.: ती बापुसाहेबांबरोबर

संतोबांच्या घरीं नरसिंगरावाची प्रकृति पाहण्याकरितां आली होती, त्यावेळीं तेथें विमला होती. ती स्वरूपानें कमलेपेक्षां कांकणभर जास्तच असल्यामुळें तिला पाहताच कमलेच्या वर्तनांत काय चमत्कार झाला तो वाचकांना आठवत असेलच! स्वतःच्या घरीं तिला मोकळ्या मनानें वागावयाला वावच नव्हती. कारण घरांत मालकीणीच्या तोऱ्यांत वागण्याची तिला लहानपणापासूनच संवय लागली होती. नोकरांचाकरांवर अधिकार गाजविण्यांत तिला मोठेपणा वाटत असे. आतां नरसिंगराव आल्यापासून आणि त्याचा हळुहळू सहवास होऊं लागल्यापासून ती आपलें मन मोकळें करूं लागली होती. असो.

"कमला, असं मी केव्हांहि म्हणणार नाहीं. मनुष्यजात सर्व सारखीच. परंतु त्यांच्यांत कमी अधिक प्रकार असेल तर तो फक्त बुद्धीच्या बाबतींतच!"

"होय. आणि ह्या बुद्धीच्या बाबतींत तुम्ही पुरुष स्वतःला फार मोठे समजतां खरं ना?"

"असंच कांहीं म्हणतां यावयाचं नाहीं."

"मग मी तुम्हांला विचारलं तेव्हां मला तुमचे विचार कळतील किंवा नाहीं, अशी तुम्हीं शंका कां दर्शविली?"

"कारण, मला तसं वाटलं म्हणून! पण आतां तुला सांगतों, मीं इतका वेळ विचार करतों याचें कारण मामांनीं नुकतीच मजजवळ 'मीं लग्न करावें' अशी गोष्ट काढिली आहे."

"पण कोणत्या मुलीबरोबर लग्न करावयाचें?"

"मुली आहेत दोन."

"असं का? मग तुम्ही विचार करीत आहांत तो ठीक आहे. आतां ह्या दोन मुलींतून तुम्ही आपल्या मताप्रमाणें आणि आवडीप्रमाणें एक मुलगी पास करणार, असंच ना? किती तरी पुरुषांची जात अप्पलपोटी आहे तरी!"

"यांत अप्पलपोटेपणा काय झाला? आपली जन्माची सहचारिणी करावयाची तेव्हां विचार नको का करावयाला?"

"तुम्ही तेवढा विचार करावयाचा आणि आम्ही मुलींनीं! आम्हांला आवडनिवड आणि मतं जशीं काय नाहींतच! तें कांहीं नाहीं. आमच्या हक्काची तुम्ही पायमल्ली करितां दुसरं काय?"

" पण तुम्ही देखील आपली आवड निवड पुढें मांडा ! "

" मांडा म्हणजे कशी ? आणि आमच्या आवडीनिवडीला विचारतो कोण ? आतां असं नाहीं उपयोग ! आम्ही मुलींनीं लग्नच न करण्याचा निश्चय केला पाहिजे म्हणजे तुम्ही पुरुष शुद्धीवर याल. "

" मग तूं देखील लग्न न करण्याचा निश्चय केला आहेस कीं काय ? "

" मग यांत शंका आहे कीं काय ? "

---

## १७ निश्चय केला

" विमला, तो जगाचा तारण करणारा आकाशांतील बाप फार कनवाळु आहे. तो मेंढपाळ आहे. तुझ्यासारखें चुकलेलें कोंकरूं त्याच्या दृष्टीस पडतांच तो तुला मोठ्या ममतेनें आपल्या हृदयाशीं कवटाळून धरील. तो तुला तारण देईल. तो तुझ्यावर ममता करील. तुझ्या प्रीतीची किंमत तो ओळखील. तुझ्या मनाची शांति तो तुला परत देईल. तुझी तळमळ शांत होईल. तुझी सर्व भीति तो दयाळू पिता आपणाकडे घेईल. तुझ्यासारख्या दुःखीकष्टी मुलीकरितांच आकाशांतील बापानें आपला एकुलता एक पुत्र येशूख्रिस्त इकडे पाठविला आहे. तूं आतां याच्यावर विश्वास ठेव. त्याला तूं शरण जा. तुला दिव्य शांतीचा लाभ होईल. "

मिशनरीबाईनें आपलें पुराण चालविलें होतें. विमलेसारखी सोशिक मुलगी मुकाट्यानें तिच्या मुखांतून बाहेर पडणारा एक एक शब्द शांतपणें ऐकत होती. आज इतक्या दिवसांनीं ती बाई विमलेला भेटण्याकरितां आली होती. तिला सर्व गोष्टी कळल्या होत्या. विमलेला हिंदुधर्मानें बहिष्कार घातला आहे. तेव्हां आतां आपण थोडेसे प्रयत्न केले तर आपलें काम खात्रीनें होईल असें वाटून ती मोठ्या आशेनें आज मुद्दाम आली होती. ती येतांच विमलेनें तिचें नेहमींप्रमाणें स्वागत केलें. ती नेहमींप्रमाणें प्रार्थना करण्याकरितां आली असेल असें तिला वाटलें. परंतु इकडल्या तिकडल्या गोष्टी झाल्यावर तिनें जेव्हां आपलें पुराण सुरू केलें, तेव्हां ती कोणता उद्देश धरून आली आहे, हें तिच्या लक्षांत आलें. ती अगदीं मुकाट्यानें बसली होती. बाईचें भाषण संपल्यावर काय उत्तर द्यावयाचें तें तिनें स्वतःशीं ठरवून ठेविलें होतें.

" विमला, छळवाद्यांनीं तुझा छळ चालविला आहे, ही गोष्ट माझ्या कानावर आली तेव्हां मला अतिशय वाईट वाटलें. तूं जर मनावर घेशील तर तुझ्यामागें लागलेला हा छळ आतां बंद होईल. ह्या सर्व छळवाद्यांचीं आतां नाकें कापलीं जातील. पण तूं आतां थोडी कंबर बांध, प्रभु येशुख्रिस्ताला शरण येतांच त्या सर्व छळवाद्यांचीं तोंडें मिटतील. तुझ्याविषयीं एक चकार शब्दही त्यांना काढतां येणार नाहीं. मग विमला, तुझा काय विचार ठरतो ? तुझी मिशनमध्यें अतिशय जरूरी आहे. तूं आमची पहिली मुलगी. तुझ्याबद्दल आम्हां सर्वांना किती प्रेम -- किती अभिमान आहे हें तूं जाणतच आहेस. तुला तेथें फार सुख होईल. तुझें सर्व आयुष्य फार सुखांत आणि आनंदांत जाईल. ह्या छळवाद्यांच्या सहवासांत तुला इतका त्रास होत आहे पण तेथें सर्वच आनंद ! तूं येशुख्रिस्ताची अत्यंत आवडती मुलगी होशील. तुझ्यावर सर्वजण अतिशय प्रेम करतील. तूं आतां अशी वाईट स्थिति प्राप्त झाली असतां दिवस गमविणें चांगलें नाहीं आतां जितकें लवकर तूं बाप्तिस्मा घेशील तितकें तुला सुख आणि समाधान जास्त ! "

" बाई, येथेंहि मला समाधान आहे. बाप्तिस्मा घेण्यांतच जास्त तें काय आहे ? वास्तविक मीं बाप्तिस्मा न घेतां जर मजवर हें वावटळ पसरलं आहे तर प्रत्यक्ष मी बाप्तिस्मा घेईन तर काय होईल ? सर्व जगाचीं सूत्रें सुयंत्रित रीतीनें चालविणाऱ्या त्या जगच्चालक प्रभूच्या ठायीं माझी दृढनिष्ठा असतांना केवळ धर्म बदलण्यांत मला जास्त तें काय सुख मिळणार आहे ? उलट आहे त्यांतच मी सुख मानून रहाणं चांगलं अशी माझी मनोदेवता मला सांगते. बाई, तुमचं आणि सर्व मिशनचं माझ्यावर प्रेम आहे तें प्रेम असेंच कायम ठेवा. मी ह्या धर्माच्या बाबतींत दुःखी आहे अशी तुम्ही कल्पना देखील करूं नका. "

मिशनरीबाईनें पुष्कळ प्रयत्न केला परंतु त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. विमलेने तिला नकार देतांना तिच्या मनांत आपणाविषयीं असलेल्या सहानुभूतीला धक्का बसूं दिला नाहीं. शेवटीं निराश होऊन विमलेचा निरोप घेऊन मिशनरीबाई उठली. विमला तिला दरवाजापर्यंत पोंचविण्याकरितां गेली. बाईची गाडी निघून गेली तरी विमला तेथेंच विचार करीत उभी होती. धर्मांतर करणें किंवा न करणें यांत तिला विशेष कांहींच वाटेना. धर्मांतर केल्यापासून कोणतें सुख आहे आणि धर्मांतर न करण्यामुळें कोणतें

दुःख आहे याचा तिनें पुष्कळ विचार केला. परंतु धर्मावर सुखदुःख अवलंबून नसून तें मनावरच अवलंबून आहे अशी तिची खात्री झाली. अशा रीतीनें ती विचार करीत असतां जिवा पोर रस्त्यानें जोरानें येणाऱ्या एका टांग्याच्या मागून धांवत येत असतांना तिच्या दृष्टीस पडला. विमलेला दरवाजाजवळ उभी असलेली पाहून तो चटकन् तिच्याकडे वळला आणि म्हणाला, " विमलाताई, तुमच्या मडमसाहेब आतां गाडींतून जातांना मी पाहिल्या. मीं त्यांना सलाम केला. त्या इकडे आल्या होत्या वाटतं ?—पण विमलाताई, ते तुमचे नरसिंगराव आतां कसे आहेत ? "

" ह्या आठ दिवसांत मला त्यांची कांहींच खबर कळली नाहीं. तूं त्या दिवशीं गेला होतास तितकाच ! कोण जाणार ? आणि कोण येऊन मला कळविणार ? जिवा, तूं जातोस का पुनः ? "

" हो. आतां जाऊन येतों. "

जिवा दृष्टिआड झाल्यानंतर विमलेचा विचार बदलला. आपण नरसिंगरावाकडे जिवाला पाठविलें ही चुकी केली असें तिला वाटूं लागलें. ह्यापुढें नरसिंगरावाविषयीं विचार करावयाचे नाहींत, असा ती वरचेवर मनाशीं निश्चय करी. परंतु मन मात्र तिचें बिलकुल ऐकत नसे. उलट पुष्कळ प्रसंगीं असें होत असें कीं, बराच वेळ नरसिंगरावाविषयीं विचार केल्यावर तिला नरसिंगरावाविषयीं विचार करावयाचा नाहीं या निश्चयाची आठवण होत असे. आज देखील असाच प्रकार घडला. परंतु आतां आठवण होऊन काय उपयोग ? जिवा उड्या मारीत जवळ जवळ अर्ध्या रस्त्यावर गेला होता. तो बापुसाहेबांच्या घरीं पोंचला त्यावेळीं नरसिंगराव कपडे घालीत होता. आज तो बापुसाहेबांच्या गाडींतून फिरावयास जाणार होता. आणि अपघातानंतर घराबाहेर पडण्याची ही त्याची पहिलीच खेप होती. जिवा खिडकींतून डोकावूं लागतांच नरसिंगरावांचें त्याच्याकडे लक्ष गेलें. तेव्हां त्यानें जिवाला आंत बोलाविलें आणि चौकशी केली. आज त्यानें फिरावयास जाण्याच्या निमित्तानें विमलेची भेट घेण्याचा विचार केला होता. परंतु ' मीहि तुमच्याबरोबर फिरावयास येतें ' असें कमलेनें त्याला सांगितल्यामुळें तो मोठ्या विचारांत पडला. आपल्याबरोबर कमलेला विमलेकडे नेणें केव्हांहि श्रेयस्कर नाहीं, हें तो समजत होता. शिवाय विमलेला भेटण्याची त्याची उत्कट इच्छा होती, तरी विमला कुठें रहाते हें अद्यापि त्याला माहित नव्हतें.

परंतु आतां जिवाला पाहिल्यामुळें त्याचें मन चलबिचल झालें. कमलेला टाळून आपणास विमलेची भेट कशी घेतां येईल, हा त्याला विचार पडला.

" चला नरसिंगराव, झालांत का तुम्ही तयार ? " आंत येऊन कमला म्हणाली, " हा पोर कोण ? कायरे, पोरा, तुला काय पाहिजे ? "

" त्याला कांहीं नको—" नरसिंगरावानें उत्तर दिलें. " माझी चौकशी करण्याकरितां मोठ्या आस्थेनें तो आला आहे. ह्या मुलाला तूं ओळखलं नाहींस असं दिसतं. मला झालेला अपघात ह्याच मुलानें प्रथम पाहिला. "

" असं का ? मग ह्या पोराची आणि तुमची फार जुनी ओळख आहे म्हणायची ! " हंसत हंसत कमला म्हणाली, " बरं चला, येतां ना आतां तुम्ही ? "

" चला—मी तयार आहें. " असें म्हणून डाव्या हातानें भिंतीचा नेट धरून आणि उजव्या हातानें काठी टेकीत नरसिंगराव हळुहळू बाहेर आला. अद्यापि त्याला आधाराशिवाय चालतां येत नव्हतें. बाहेर येतांच गाडीवान पुढें होऊन त्यानें नरसिंगरावाला आधार दिला. तो गाडींत बसल्यावर कमला त्याच्या बाजूला गाडींत बसली. जिवा गाडीजवळच उभा होता. त्याच्याकडे पहात विचार करीत नरसिंगराव म्हणाला, " जिवा तूं देखील बैस कीं वर ! "

पडत्या फळाची आज्ञा ! जिवा चटकन् उडी मारून गाडीवानाच्या शेजारीं बसला. गाडींत त्यांच्या विशेष कांहीं गोष्टी झाल्या नाहींत. गाडी मंगळवार दरवाजांतून किल्ल्याकडे जाणार होती. परंतु अर्ध्या वाटेंतच एका मैत्रिणीचें घर येतांच कमलेचा पुढें जाण्याचा विचार बदलला. गाडी उभी करण्यास सांगून ती नरसिंगरावाला म्हणाली, " तुम्ही फिरून या, मी आहें इथें. आज दोन दिवस मला ह्या मैत्रिणीची भेट घ्यावयाची होती. पण तें कांहीं जुळलं नाहीं, आतां अनायासें आपण ह्या बाजूला आलों, तेव्हां मी तिला जाऊन भेटतें. पण नरसिंगराव तुमची कांहीं हरकत नाहीं ना ! नाहीं तर म्हणाल—"

" छे छे ! माझी कशाची हरकत ? " नरसिंगरावाच्या अगदीं मनाप्रमाणें घडलें. कमला खालीं उतरतांच आपल्या छातीवर ठेवलेली मोठी धोंड दूर झाली असें त्याला वाटलें. थोड्या वेळानें गाडीवानानें गाडी हांकली. तेव्हां नरसिंगरावानें त्याला थांबण्यास सांगून जिवाला विचारलें, " जिवा येथून विमला किती लांब रहाते ? "

"तें पहा—तें त्या बोळाच्या टोंकावर घर दिसतं तें—" बोटानें दाखवीत जिवानें उत्तर दिलें.

"मग तिकडे वळवूं का गाडी?" गाडीवानानें विचारतांच नरसिंगरावानें मान हालविली. गाडी अर्ध्या वाटेंत जातांच खिडकींत उभी असलेल्या विमलेला कोचबॉक्सवर बसलेला जिवा दिसला. नरसिंगरावहि वर मान करून जिवानें दाखविलेल्या घराकडे पहात होता. गाडी थोडी पुढें जातांच त्याची दृष्टि विमलेकडे गेली आणि दोघांची दृष्टादृष्ट झाली.

गाडी दरवाजाजवळ येऊन उभी राहिली. विमलाही दरवाजाजवळ येऊन उभी राहिली. जिवानें खालीं उतरून गाडीचा दरवाजा उघडला आणि गाडीवानाच्या सहाय्यानें नरसिंगराव हळूच खालीं उतरला. विमलेनें लवकर लवकर एक खुर्ची आणून ती पुढच्या खोलींत ठेविली. तिची छाती धडधडत होती. हात थरथरत होते. आतां काय बोलावें हेंच तिला सुचेना. शेवटीं ती खालीं पहात म्हणाली, "अझून आपल्या पायाचा पट्टा सोडला नाहीं का? हात कसा आहे?"

"एक दोन दिवसांत डॉक्टर पायाचा पट्टा सोडणार आहे. हात मात्र साफ बरा झाला. त्या दिवशीं मी तें शंकराचार्यांना पत्र लिहिलें त्यामुळें दुसऱ्या दिवशीं हात फारच दुखला.

मजकरितां इतका त्रास करून घेण्याची काय आवश्यकता होती. मला आचार्यांनीं बहिष्कार घातला म्हणून मला कांहींच वाईट वाटत नाहीं. कारण मुळांतच मला माझी जात माहिती नाहीं आणि पुढें कळण्याची आशाहि नाहीं. तेव्हां मला बहिष्कार घातला काय आणि न घातला काय सारखेंच!"

"विमले, बहिष्कारामुळें तुझ्यांत कोणत्याही प्रकारचा फरक होणार नाहीं, ही माझी खात्री आहे. आचार्यच नव्हे तर त्यांचे आचार्य जरी झाले तरी तुझ्या निर्मल मनांत आणि पवित्र आचरणांत काडीचाहि फरक होणार नाहीं; हें मी जाणत नाहीं काय? पण लौकिकदृष्ट्या हा तुझ्या नांवाला व्यर्थ लागलेला कलंक धुवून निघालाच पाहिजे. आणि त्याबद्दल मला जें कांहीं करावें लागेल तें मी माझें कर्तव्य समजून करीन. विमला, तुझ्या नांवाला लौकिकदृष्ट्या कां होईना पण हा व्यर्थ लागलेला कलंक मला कधीं तरी सहन होईल काय?"

"आपण मजकरितां कां उगाच कष्टी होतां? मी आजपासूनच हतभागी

आणि दुर्दैवी आहें. ईश्वरानें माझ्या जन्माबरोबरच जर हें दुर्दैव मजबरोबर दिलं असेल तर मीं त्यांतच आनंद मानून राहिलं पाहिजे. पूर्वजन्मीं जर कांहींच पुण्यसंचय मीं करून ठेविला नसेल तर मग आतां—ह्या जन्मीं मी सुखाची तरी कां आशा करावी ? आहे त्यांतच सुख मानून आनंदानें राहणें हेंच मी कर्तव्य समजतें. तुम्ही हे श्रम उगाच घेत आहांत. ह्यापासून कांहींएक उपयोग व्हावयाचा नाहीं ! ”

“ असं कां बरं म्हणतेस विमले ? तुझ्या सुखाकरितां मी जर खटपट करावयाची नाहीं तर मग—”

“ आपण खटपटच करूं नये हें चांगलं ? बरं, आणि खटपट करूनहि आपण म्हणतां त्याप्रयाणें माझ्या नांवाला लागलेला हा कलंक धुवून निघाला तरी त्यापासून मला असं काय मोठं नांव मिळणार आहे ? किंवा माझ्या आहे ह्या स्थितींत काय फरक पडणार आहे ? ”

“ कांहीं फरक पडणार नाहीं हें मी जाणतों. तरी देखील प्रयत्न करणें हें माझें कर्तव्य आहे. पण तुझ्या सुखाकरितां मी झटूं नये असं म्हणतेस याचा अर्थ काय ? ”

“ कारण त्यापासून शेवटीं आपणास दुःख होईल. आणि आपणांस दुःख झालेलं मला केव्हांहि सहन होणार नाहीं. आपल्या मामासाहेबांनीं आपल्या सुखाची रूपरेखा आंखून ठेविली आहे. आणि त्याप्रमाणेंच झालं पाहिजे. ”

“ विमले, तुला देखील ही कळली काय ? मामांनीं मला अशा रीतीनें पेंचांत पकडून शह देण्याचा विचार केला आहे. पण संपत्तीच्या मोहाला बळी पडून खऱ्या सुखाला दूर करण्याइतका मी मूर्ख नाहीं. विमले, तुझ्यापुढें मला त्या संपत्तीची कांहींच किंमत नाही. ”

विमला उत्तर देणार इतक्यांत कमला दरवाजाजवळ येऊन दत्त म्हणून उभी राहिली.

“ वा: नरसिंगराव, मी समजत होतें कीं, तुम्हीं फिरावयाला गेलां म्हणून ! मी सहज बाहेर आलें तों आपली गाडी येथें उभी असलेली दिसली. पण तुम्हीं येथें काय करतां ? हें कोणाचं घर ? ”

“ तूं ह्या विमलेला ओळखलं नाहींस वाटतं ? ”

कमलेनें फक्त तिच्याकडे पाहिलें आणि तोंड फिरविलें. इतका वेळ ती बरी होती. परंतु इतक्यांतच तिच्या अंगात भुताचा संचार झाला. विमलेकडे

पाहतांच तिच्या कपाळाला आंठ्या पडल्या. ती नरसिंगरावाकडे पहात म्हणाली. "नरसिंगराव, तुमचं येथें कांहीं काम आहे काय ?—नाहीं ना ?—मग चला तर ?"

"थांबा— कमलाबाई, थोडा चहा घेऊन जा—" विमला पुढें होऊन म्हणाली.

"इश्श—! मी नाहीं तुमच्या घरचा चहा घ्यायची !" असें म्हणून कमला झणकाऱ्यानें बाहेर पडली आणि एकदम गाडींत जाऊन बसली. कमलेचें हें वर्तन नरसिंगरावाला बिलकूल खपलें नाहीं. परंतु त्याला कांहींच बोलतां येईना. ती निघून गेल्यावर नरसिंगराव म्हणाला, "विमला, तिच्या बोलण्याचा तुला राग तर नाहीं ना आला ?"

"मला कां राग यावा ? बोलून चालून मी बहिष्कृत झालेली ! मीच प्रथम तिला चहा घेण्याचा आग्रह कां करावा ?"

"तिचा स्वभावच तसा आहे—"

"पण तो आपल्या सहवासानें लवकरच सुधारेल, अशी माझी पूर्ण खात्री आहे. कमलाबाई मोठी भाग्याची आहे. पण आपण घ्याल का थोडा चहा ? अडचण असेल तर मात्र आग्रह नाहीं."

"विमले, कां उगाच मला टोंचून बोलतेस ? उलट तुझ्या पवित्र हातचा चहा मिळण्याइतकें माझें भाग्य आहे कुठें ?"

विमला हास्य मुद्रा करून उत्तर न देतां आंत गेली आणि थोड्या वेळानें चहाचा कप घेऊन बाहेर आली. नरसिंगरावानें मुकाट्यानें चहा घेतला आणि उठतां उठतां तो म्हणाला, "विमला, आतां मी रोज सायंकाळीं चहा घेण्याकरितां येथें येईन. येऊं ना ?"

"घर आपलें आहे; अवश्य या."

नरसिंगराव गाडींत जाऊन बसला. गाडी चालू झाली. जातांना त्यानें मान वांकडी करून हास्य मुद्रेनें दरवाजांत उभी असलेल्या विमलेचा निरोप घेतला. परंतु कमलेनें चुकूनसुद्धां मागें पाहिलें नाहीं. विमला तेथेंच उभी होती. नरसिंगरावाचें शेवटचें वाक्य तिच्या मनांत घोळत होतें आणि तिचें मन उत्तेजित करीत होतें. आपणावर नरसिंगरावाचें प्रेम आहे, हें पाहून तिचें अंतःकरण उचंबळून तिच्या सर्वांगावर रोमांच उभे रहात. थोडा वेळ ती आपल्या सुखमय मनोराज्यांत दंग झाली होती. थोडा वेळ ती आपलीं सर्व

दुःखें विसरली होती. परंतु किती झालें तरी तें मनोराज्यच! त्या राज्याची मर्यादा ओलांडून मन सत्यसृष्टींत पाऊल टाकतांच त्या राज्यांत मनानें अनुभविलेलीं सुखें एकदम यक्षिणीनें कांडी फिरविल्याप्रमाणें स्वप्नवत् ठरतात, तशीच स्थिति विमलेची झाली. नरसिंगरावाच्या शेजारीं फ्याशनेबल कपडे घालून मोठ्या थाटांत बसलेल्या कमलेची मूर्ति तिच्या डोळ्यापुढें येतांच तिचे विचार बदलले. तिच्याकरितां बापुसाहेबांचे प्रयत्न चालू आहेत आणि तीहि नरसिंगरावाला योग्य पत्नी असून त्या सर्व वैभवाला साजेसारखी आहे. तिच्याबरोबर विवाह केल्यास गाडीघोड्यांचें, नोकराचाकरांचें सर्व ऐश्वर्य नरसिंगरावालां उपभोगितां येईल आणि आपला विचार करतांच तें सर्व ऐश्वर्य, तें सर्व सुख एकदम बदलून निष्कांचन स्थिति, भिकार रहाणी आणि हरघडीस लोकांकडून होणारा उपहास इत्यादि दुःखद स्थितीचें चित्र तिच्या डोळ्यापुढें उभें राहिलें. आपणाकरितां नरसिंगरावानें अशा स्थितींत कां येऊन पडावें? तो सुखांत जन्म पावलेला सुखी प्राणी आपणाकरितां दुःखांत कां पडावा? आपल्यासाठीं त्यानें आपली सर्व मिळकत, शेत जमीन, घरदार आणि थोर नांव या सर्वांचा होम कां करावा? इत्यादि गोष्टींचा एका मागून एक विचार तिच्या डोक्यांत येऊं लागला. कमलेचा स्वभाव मिजासखोर आहे याचा तिला अनुभव आला होता. परंतु नरसिंगराव तो स्वभाव सहज बदलूं शकतील अशी तिला पूर्ण खात्री होती. एकंदरीनें आपण कोणत्याही प्रकारें त्यांच्या मार्गांत आड न जातां दूर रहाणें हेंच चांगलें, असें ती स्वतःशीं ठरविते इतक्यांत समोरून येणाऱ्या मनोहराकडे तिची दृष्टि गेली. स्वारीनें आज देखील विशेष भपक्यांत पोषाख केला होता. जवळ येतांच त्यानें हास्यमुद्रा करून टोपी काढिली, तेव्हां सुवासिक तेलाचा घमघमाट सुटला. लगेच त्यानें त्यानें खिशांतून हातरुमाल काढला. त्याबरोबर सेंटचा वास सुटला. विमलेच्या मनांत त्याला घरांत येऊं द्यावें किंवा नाहीं याचा विचार चालला होता. तिचें त्याकडे लक्षहि नव्हतें. आपण दरवाजांतच उभें रहावें म्हणजे बाहेर उभे राहून कंटाळून तो लवकरच जाईल, असें ठरवून ती दरवाजांतच उभी राहिली.

"मिस विमला, मग काय ठरलं? मिशनच्या बाई येऊन गेल्या ना? मग बाप्तिस्मा घेण्याचा केव्हां विचार ठरतो? आतां कां उगाच आढेवेढे घेतेस? सध्यां तुझी स्थिती पहा कशी चमत्कारिक झाली आहे ती! ना धड इकडे

ना घड तिकडे ! अशी मधल्या मध्येंच अडकून राहिली आहेस? स्वतःला हिंदु म्हणविशील तर तेंही नाहीं. आणि ख्रिश्चन म्हणविशील तर तेंही नाहीं. दोन्ही जातींत तुला उघड माथ्यानें जातां येत नाहीं."

"मला दोन्ही जातींची जरूरी नाहीं. परमेश्वरावर माझी पूर्ण भक्ति असल्यावर मला ह्या निव्वळ नांवानें असणाऱ्या जातींशीं करावयाचें आहे काय ? मी ह्या जातींची मुळींच क्षिति बाळगीत नाहीं."

"नाहीं तरी तुला मुळांत जात आहे तरी कुठें ? आहे तो सगळा घोंटाळाच आहे!"

मनोहराच्या ह्या एका वाक्यानें विमलेची चर्या खर्रकन् उतरली. तें पाहून मनोहराला जोर आला. तो पुढें म्हणाला, "तुझ्या जातीबद्दल कांहीं जरी गोंधळ असला तरी मला चालेल. त्याविषयीं मीं तुला एका चकार शब्दानेंहि विचारणार नाहीं. त्या दारूबाज संतोबानें आजपर्यंत तुझ्यासाठीं पैसा खर्च केला व तोच अद्यापि खर्च करतो असें तुला वाटतें. पण मुळांत सर्वच घोंटाळा आहे. तुझ्या पोटगीचे पैसे बापुसाहेबाकडून येतात, हें कुठें तुला ठाऊक आहे. बरं बापुसाहेब तरी हा खर्च कां करितात ? त्यांना काय एवढी जरूरी ! कांहीं तरी भानगड असल्याशिवाय आज इतकीं वर्षें ते बिनबोभाट हा खर्च कशाला करतील ! म्हणून म्हणतों, तूं माझ्या म्हणण्याप्रमाणें वाग. माझं तुझ्यावर किती प्रेम आहे हें मी तुला काय सांगूं ! तूं माझ्याबरोबर लग्न करतांच हा तुझ्या जातीपातीचा सर्व गोंधळ आपोआप मिटेल. मी तुला गुलाबाच्या फुलाप्रमाणें वागवीन. पहा–असा उगाच हेका धरूं नकोस ! अग, हे संतोबा झाले काय आणि बापुसाहेब झाले काय, सर्व सारखेच ! तुला पैसे द्यावयालाही तयार आणि शंकराचार्यांकडून बहिष्कार घालायलाहि तयार !—पहा विचार कर—"

"मी तुम्हाला एकदांच उत्तर दिलं आहे. आतां कां उगाच तुम्ही माझ्या मागें लागला आहांत ? मला जातीचाहि विचार कर्तव्य नाहीं आणि लग्नाचाही विचार कर्तव्य नाहीं. आतां तुम्हाला मी शेवटचें सांगतें; तुम्ही मला ह्यापुढें केव्हांहि त्रास देण्यास येऊं नका. जा—" असें म्हणून विमला आंत गेली.

"असं काय ! पाहून घेईन !"

---

"अग ए इमला, किती वखुत तूं उभी ऱ्हाशील भाईर ?"

म्हाताऱ्या जयेचा शब्द ऐकून विमला आपल्या विचारांतून जागी झाली. मनोहर मिसाळ गेल्यानंतर तिचे ते विचार चालले होते. ती अद्यापि दरवाजांतच उभी होती आणि तेथेंच तिच्या डोक्याचें विचारयंत्र सुरू होतें. आज त्याच्याकडून तिला एक नवीन गोष्ट कळली. आपला सर्व खर्च बापुसाहेब चालवीत आहेत, तेव्हां आपल्या बाबतीत बापुसाहेबांचा काय संबंध असावा, याचा उलगडा करण्याकरितां तिच्या डोक्यांतील विचारयंत्र काम करीत होतें. आपलें लालनपालन आणि शिक्षण संतोबांनीं केलें आणि आतां देखील तेच खर्च देत आहेत तो केवळ परोपकार या दृष्टीनें देत आहेत अशी तिची ठाम समजूत होती. परंतु मनोहराच्या बोलण्यावरून आपलीं सर्व सूत्रें बापुसाहेबांकडून हालतात हें तिला कळतांच त्यांचा आणि आपला असा काय लागाबांधा असावा याचा विचार करतां करतां त्यांची आणि आपली संतोबांच्या घरीं पहिली भेट झाली त्यावेळीं त्यांचें वर्तन, परस्परांची एकदृष्टी होतांच आपल्या मनांत आलेल्या चमत्कारिक भावना, या सर्व गोष्टींची तिला आठवण झाली. नरसिंगरावाच्या शुश्रुषेंत आपण असतांना बापुसाहेब कैक वेळां संतोबांच्या घरीं आले होते. परतु एक दोन प्रसंग सोडून ते आपणाबरोबर मोजक्या शब्दांपेक्षां जास्त बोललेले तिला आठवेना. त्यांच्या ह्या वर्तनाबद्दल ह्यापूर्वी तिनें पुष्कळदां विचार केला होता. तेव्हां 'ते श्रीमंत आणि गर्विष्ट आहेत; आपल्या साख्या कमी दर्जाच्या माणसाबरोबर बोलण्यास त्यांना कमीपणा वाटत असेल,' असा बापुसाहेबांविषयीं तिच्या मनानें कल दिला होता.

अशा रीतीनें विचार करीत असतां बाहेर काळोख पडला. तेव्हां 'इमला' कुठं गेली हें पाहण्याकरितां म्हातारी जया बाहेर आली. आणि तिनें वर लिहिल्याप्रमाणें तिला विचारसृष्टींतून जागें केलें. त्या म्हातारीची विमलेवर अगदीं पोटच्या मुलीप्रमाणें ममता जडली. ती म्हातारीच्या घरीं रहावयास आल्यापासून म्हातारीचें दळणकांडण करण्याचे कष्ट वांचून आतां घरीं बसून तिला ओली भाकर मिळूं लागली, हे विमलेचे उपकार ती क्षणोक्षणीं स्मरत असे. विमलेविषयीं जनमत काय आहे, ती कोण आहे, ती आपल्याच घरीं कां रहावयास आली, इत्यादि गोष्टींबद्दल म्हातारीनें ह्यापूर्वी कधींच चौकशी

केली नाहीं. आणि चौकशी करण्याचें तिला कारणहि पडलें नाहीं. परंतु अलीकडे ती सदा सर्वकाळ विचारांत मग्न असलेली पाहून तिला एकदां विचारावें असें तिला वाटूं लागलें होतें. त्याप्रमाणें रात्रीं जेवण झाल्यावर तिला म्हातारीनें प्रश्न केला. तेव्हां विमला म्हणाली, "जये, तुला मी काय सांगूं? माझी एकच गोष्ट असती तर ती मला नीट सांगतां आली असती. परंतु माझ्या संबंधानें इतक्या गोष्टी आहेत कीं, त्यांची मला देखील आठवण नाहीं. मी कोण आहे, हें मला माहित नाहीं. मला जातपात नाहीं. गणगोत नाहीं, माझ्या आईबापांचा पत्ता नाहीं. दुष्काळांत संतोबांच्या मी हातीं लागलें. त्यानीं इतकीं वर्षं माझा प्रतिपाळ केला. मी त्यांना पित्याच्या ठिकाणीं मानतें." याप्रमाणें तिनें आपल्या आयुष्याची रूपरेखा म्हातारीला थोडक्यांत सांगितली. आणि शेवटीं ती म्हणाली, "आतां मला आज एक नवी गोष्ट कळली. ह्या गोष्टींत कितपत सत्यता आहे हें विचारण्याकरितां मी उद्यां संतोबांच्या घरीं जाणार आहे."

ती सर्व रात्र विमलेला झोंप लागली नाहीं. विचार कर करून तिचें डोकें अगदीं कावून गेलें. आपणाविषयीं काय खरी हकीकत आहे ती कळावी म्हणून क्षणोक्षणीं तिची जिज्ञासा वाढत होती. शेवटीं दुपारीं जाण्याचा बेत रहित करून ती सकाळींच संतोबांच्या घरीं जाण्यास निघाली. रस्त्यानें जात असतां लोक तिच्याकडे पाहून कुचेष्टा करूं लागले. प्रथम तें तिच्या लक्षांत आलें नाहीं. ती आपल्या विचारांत, खालीं पाहून चालली होती. एक दोनदां लोकांनीं तिच्याकडे बोट दाखविलेलें तिच्या प्रथम लक्षांत आलें नाहीं. परंतु पुढें त्यांनीं चालविलेल्या कुचेष्टांतील कांहीं शब्द तिच्या कानांवर पडतांच मात्र तिची गाळण उडाली. ती झप् झप् पावलं टाकीत चालूं लागली. आपण संतोबाच्या घरीं जाऊन केव्हां पोंचतों असें तिला झालें. शेवटीं एकदांची ती संतोबांच्या घरीं पोंचली. तेव्हां तिच्या जिवांत जीव आला. तिच्या कपाळा-वरून घामाच्या धारा चालल्या होत्या. ती घरांत शिरते न शिरते तों आंतून भवानीबाई बाहेर आली. संतोबा घरांत नव्हते. सूत आणण्याकरितां बाजा-रांत गेले होते. दरवाजा वाजतांच बाहेर कोण आलें आहे तें पाहण्याकरितां भवानीबाई बाहेर आली तों समोर तिला विमला दिसली. मग काय? तात्काळ तेचा तोंडाचा पटा सुरू झाला.

"कां—आलीस का बया परत? नाहीं का तुला चैन पडत?—बया, का

आतां उगाच आमचा पिच्छा पुरविला आहेस ? हडळीसारखी हात धुवून पाठीस लागली आहेस तो आहे तरी काय तुझा विचार ?—उभी काय राहिलीस दगडासारखी ? बोल, नाहींतर घरतें झिंज्या आणि आपटतें पायरीवर—अग सटवे, दूर हो—हो मागें ! त्या मागाला शिवशील ! सटवीनें भ्रष्टाकार मांडला आहे. उच्छाद आणला आहे या ×××—रडतेस काय ? कोण मेलं तुझं, बाप—का आई !—खबरदार—माझ्या घरांत सकाळच्या रामपारी रडशील तर ! अभद्र ×× ! आलीस कशाला येथें उलथून पडायला ? कोणी बोलावलं तुला ? काय तुझ्या बापाचं पुरलं आहे इथं गाठोडं !—नीघ माझ्या घरांतून ! बाटगी ×× कुठली ?—"

आतां त्या घरांत क्षणभर देखील उभें राहण्याची सोय नव्हती. विमला डोळे पुशीत म्हणाली, "मी येथें राहण्याकरितां आलें नाहीं—आई ! फक्त बाबांना—"

"सटवे, कुणाला ग आईन् बाबा म्हणतेस ?—तुझे आईन् बाबा गेले मसणांत !"

"असं काय बरं म्हणतेस ! आजपर्यंत तुम्हीच माझं लालनपालन केलं, तुम्हीच मला आईबापाच्या ठिकाणीं आहांत. तुम्ही मला वाटेल तें बोललां, वाटेल तें केलं तरी तुमचे उपकार—"

"जा बया आतां ! पुष्कळ केले आम्ही उपकार आणि तूंहि पुष्कळ फेडलेस उपकार बरं ! आतां जा कशी माझ्या आई !—जा—बाहेर हो. होतेस कीं नाहीं मागें ? सटवे धुळधाण केलीस आमच्या अब्रूची !" असें म्हणून भवानीबाई जोरांत रागानें पुढें झाली. त्यामुळें नाइलाजस्तव विमलेला बाहेर पडावें लागलें. भवानीबाईनें तात्काळ धाडकन् दरवाजा बंद करून घेतला. विमला दुःखित मनानें डोळे पुसून दरवाजाजवळ संतोबांची वाट पहात उभी राहिली. थोड्या वेळानें शेजारच्या घरांतील एका बाईनें तिला पाहिलें. तोंच तिनें आंत जाऊन वर्दी दिली. तेव्हां त्या घरांतील दोन बायका व कांहीं मुलें बाहेर आलीं. हळुहळु त्या घराच्या पलीकडे असलेल्या घरांत ही बातमी पोंचली. तेथील कांहीं बायकामुलें बाहेर आलीं. अशा रीतीनें विमलेला—त्यांच्या दृष्टीनें येशूच्या कळपांत जाऊन बाटलेल्या विमलेला—पाहण्याकरितां आजूबाजूच्या दहापांच घरांतील बायका, मुलें आणि पुरुष बाहेर येऊन कुजबुज करूं लागले. तो प्रकार काय आहे, ही मंडळी आपणाकडे कोणत्या

दृष्टीनें पाहून कुचेष्टा करीत आहेत हें सर्व विमलेला कळलें. तिला अगदीं मृतप्राय वाटूं लागलें. शेवटीं पंधरा मिनिटें संतोबा येण्याची वाट पाहून ती खालच्या मानेनें पुनः परत घरीं जाण्याकरितां निघाली. ती रस्त्यांत येऊन थोडी पुढें गेली नाहीं तोंच मागून सर्व आळींतील मुलें 'संतोबाची पोर, बाटलेली विमला!' असें मोठमोठ्यानें ओरडूं लागलीं. बिचाऱ्या विमलेला काय वाटलें असेल?

जातां येतांना झालेला हा उपहास आणि लोकांनीं केलेली कुचेष्टा विमलेला अगदीं असह्य झाली. ती एकदांची घरीं येऊन पोंचली. परंतु तिची स्थिति अगदीं वेड्यासारखी झाली. संतोबांच्या घरून म्हाताऱ्या जयेकडे आल्यापासून ती आजच प्रथम घराहेर पडली आणि हा पहिल्याच दिवसाचा तिला भ्रमिष्ट होण्यासारखा अनुभव मिळाला. घरीं आल्यानंतर अंग धुणें, जेवण इत्यादि गोष्टी तिनें कोणत्या मनःस्थितींत केल्या असतील याची फक्त कल्पनाच केलेली चांगली! दोन प्रहरीं ती विचार करीत बसली असतां बापुसाहेबांना जाऊन भेटण्याचा विचार तिच्या डोक्यांत आला. त्याबरोबर ती उठली आणि जयेला सांगून घराबाहेर पडली. बापुसाहेबांचें घर जवळ येऊं लागतांच तिच्या मनाची तळमळ जास्त वाढूं लागली. प्रवेशद्वाराजवळ तिला एक नोकर भेटला. त्याच्याजवळ तिनें बापुसाहेबांची चौकशी केली तेव्हां 'मी बापुसाहेबांना सांगून येतों,' असें म्हणून तो वर निघून गेला. ती उभी होती त्या पलीकडच्या खोलींत नरसिंगराव होता. परंतु त्यावेळीं तो आराम खुर्चीवर बसून विचार करीत होता. त्याच्या हातांत एक पुस्तक होतें परंतु तें मिटलेलें होतें. विमला आपल्या खोलीजवळ उभी आहे, ही त्याला कल्पनाहि नव्हती. ती आल्याची वर्दी पोंचविण्याकरितां नोकर वर गेला. त्यावेळीं बापुसाहेब नुकतेच झोंपून उठले होते. नोकर दिवाणखान्यांत येऊन उभा राहिल्यावर त्यांनीं 'काय पाहिजे?' म्हणून विचारलें.

"संतोबा कोष्ट्याची विमला आली आहे,"

"कोण विमला? आणि ती कशाला आली इकडे?" एकदम आश्चर्यानें बापुसाहेबांनीं विचारलें.

"तें कांहीं ती बोलली नाहीं. पण तिनें तुमची चौकशी केली."

"कुठें आहे ती? नरसिंगरावानें तिला पाहिलं का?"

"नाहीं. ती बाहेर उभी आहे."

" जा, तिला मागच्या जिन्यानें वर आण. पण, हें पहा ती येथें आली आहे ही गोष्ट नरसिंगाला कळवूं नकोस, जा. " नोकर निघून गेल्यावर बापुसाहेबांनीं एकदां आपल्या कपाळावरून हात फिरविला. त्यांच्या मनांत क्षणांत अनेक विचार येऊन गेले, त्यांची चर्या अनेक वेळां पालटली. आणि त्या थोड्या अवधींत त्यांनीं दिवाणखान्यांत दोनदां येरझारा घातल्या, मनाशीं विचार करतां करतां 'ती इकडे कां आली ?' 'ती कशाला आली ?' 'तिचें माझ्या-जवळ काय काम ?' 'हिला संतोबानें मजकडे कशाला येऊं दिलं ?' असे कित्येक शेलके प्रश्न त्यांनीं मोठ्यानें सुद्धां उच्चारले. थोड्या वेळानें दरवाजा वाजला. त्याबरोबर त्यांच्या छातींत एक प्रकारचा भीतीचा धक्का बसला. त्यांनीं दरवाजाकडे पाहिलें. विमला दरवाजांतून आंत येत होती. बापुसाहेबांनीं तात्काळ आपले मनोविकार दाबून सौम्य मुद्रा धारण केली आणि टेबलाजवळ असलेल्या खुर्चीकडे बोट दाखवून ते म्हणाले, " विमला, बैस, कां आलीस ?"

" मला येथें बसायला कांहीं हरकत नाहीं ना ? "

" कां—असा प्रश्न कां विचारलास ? "

" कारण, शंकराचार्यांनीं मला बहिष्कार घातला आहे. आणि त्यांची अंमलबजावणी करण्याचें काम तुमच्याकडे आहे. तेव्हां तुमच्याच घरांत तुम्हीं मला एखाद्या वस्तूला शिवूं दिल्यास कदाचित् अधर्म वाढण्याचा संभव आहे. " ह्या भाषणावर बापुसाहेबांना उत्तर देतां येईना. शेवटीं कांहीं तरी बोललें पाहिजे म्हणून ते म्हणाले, " त्या खुर्चीला कांहीं दोष नाहीं. बैस तूं ! "

विमला खुर्चीवर बसली. आणि आपल्या सभोंवतीं दृष्टी फेंकून म्हणाली, " मी आपल्या भेटीकरितां आलें असतां आपण मजबरोबर बोलून मला बसायला खुर्ची दिली याचें मला आश्चर्य वाटतें ! "

" कां बरें ? "

" कारण संतोबांच्या घरीं आपण येत होतां, त्यावेळीं मजबरोबर बोलण्याचा प्रसंग आपण टाळत असा. आणि चुकून प्रसंग तसा आलाच तर मोठ्या कष्टानें दोनच मोजके शब्द बोलत होतां ! मी गरीब आणि तुम्ही श्रीमंत म्हणूनच तुम्ही मजबरोबर बोलण्यास टाळाटाळ करीत असाल. "

" छे ! छे ! हा तुझा भलताच समज झाला. त्यावेळीं नर—नरसिंग तशा स्थितींत पडल्यामुळें काळजीनें मीं अगदीं बावरलों होतों. " स्पष्टवक्त्या

विमलेला कांहींतरी जुळवाजुळवीचें उत्तर देऊन बापुसाहेबांनीं वेळ मारून नेली. " तूं माझ्याकडे कां आलीस ? "

" मी आपणास कांहीं विचारण्याकरितां आलें आहे. येथें येतांना वाटेंत मला असं वाटत होतं कीं, तुम्ही मजबरोबर बोलणारसुद्धां नाहीं. पण तुमचें हें उत्तर ऐकून मला आतां धीर आला. मी तुम्हांला कांहीं माहिती विचारण्याकरितां आलें आहें. "

" विचार—मला जें कांहीं सांगतां येईल तें मी मोठ्या आनंदानें सांगेन. "

" बापुसाहेब, गेल्या थोड्या दिवसांत मला स्वतःविषयीं बऱ्याच गोष्टी कळल्या, त्यांत आज इतकीं वर्षें तुम्ही माझ्या पालनपोषणाचा, शिक्षणाचा सर्व खर्च देतां असं मला कळलं—"

" कोणीं सांगितलं ? " एकदम बापुसाहेबांनीं विचारलें, " मी हा खर्च देतों असं तुला सांगितलं कुणीं ? "

" कोणीं जरी सांगितलं असलं, तरी ही गोष्ट खरी आहे. तेव्हां तुम्हीं हा खर्च कां देतां हें विचारण्याकरितां आणि दुसरी कांहीं माहिती विचारण्याकरितां मी मुद्दाम आलें आहें. "

" ह्या गोष्टी कळून घेऊन तुला काय करावयाचें आहे. तुला मिळत असलेला खर्च—रुपये पुरत नाहींत का ?—तसं जर कांहीं असेल तर मला सांग; मी त्याची व्यवस्था करतों. "

" पण हा पैसा तुम्ही कां देतां ? आज इतकीं वर्षें तुम्ही हा खर्च करीत आहांत तेव्हां तुमचा माझा असा काय संबंध ? "

बापुसाहेब एकदम दचकले. इतक्यांत दरवाजा उघडून कमला चहाचा कप घेऊन आंत आली. तेव्हां बापुसाहेबांना आपली गोंधळलेली वृत्ति ताळ्यावर आणण्यास अवधी सांपडली. त्यांनीं विमलेकरितां आणखी एक कप चहा आणण्यास सांगितलें. बापानें सांगितलेलें हें काम ऐकून कमलेच्या कपाळाला आंठ्या चढल्या. ती तशीच बाहेर निघून गेली. विमलेनें ती आंत येतांच एकदां तिच्याकडे पाहिलें, त्याबरोबर तिच्या मनांतहि एक हेवायुक्त तिरस्काराचा विकार उत्पन्न झाला. आपल्या प्रियकराबरोबर हिचा विवाह घडवून आणावा म्हणून बापुसाहेबांनीं कारस्थान केलें. आतां हिच्यामुळें आपणास नरसिंगराव दुर्लभ झाले, असा विचार तिच्या मनांत येऊन तिला हेवा वाटावा हें मनुष्य स्वभावाला अनुसरूनच आहे क्षणभर हिच्याहि चर्येवर

त्या विकाराचें चिन्ह दिसलें. परंतु कोणत्याहि विकाराला वश होण्याइतकी ती मनाची दुर्बल नव्हती. मनोहरानें तिचें मन कलुषित करण्याचा प्रयत्न केला होता खरा! ती आपणास मिळावी म्हणून नरसिंगरावाच्या विरुद्ध कांहीं तरी खोटें सांगून तो तिच्या मनांतून उतरावा अशी त्यानें कळ लाविली होती. परंतु विमलेनें मात्र आपलें मन एकदम भडकूं दिलें नाहीं. मनोहरानें सांगितलेल्या सर्व गोष्टीचा तिनें स्वतःशीं पुष्कळ विचार केला होता. आणि आपल्या मुलीचें कल्याण करण्याकरतांच बापुसाहेबांनीं तिला शंकराचार्यांकडून बहिष्कार घालविला अशी जरी मनोहरानें तिच्या मनाची समजूत केली होती तरी बापुसाहेबांचें तें कृत्य तिला क्षम्यच वाटलें. शिवाय आपली बरोबरी नरसिंगरावाबरोबर कोणत्याहि गोष्टींत होणें शक्य नाहीं, तेव्हां आपणहि भलत्याच गोष्टीचा नाद धरणें चांगलें नाहीं असा पूर्ण विचार करून तिनें आपलें मन चळूं न देण्याची खबरदारी घेतली होती. असो. थोड्या वेळानें बापुसाहेबांनीं सांगितल्याप्रमाणें कमलेनें स्वतः चहा न आणतां एका नोकराबरोबर आंत पाठविला.

" मी या कपाला शिवूं कशी ? " चहा पुढें आल्यावर विमलेनें विचारलें.

" त्याला कांही हरकत नाहीं, तूं चहा घे. मग नोकर तो कप धुवून घेईल. "



## १९ शपथ घेतली

" **बापुसाहेब**, मग सांगाना, तुम्ही हा माझ्याप्रीत्यर्थ इतका खर्च करीत आहांत याचें कारण काय ? " चहा घेऊन झाल्यावर पुनः विमलेनें विचारलें.

" तुला ह्या गोष्टी कळून काय करायचं आहे ? तुला आणखी कांहीं पाहिजे असेल तर सांग. मी त्याची व्यवस्था करतों. "

" आपले आजपर्यंत मजवर झालेले उपकार कांहीं थोडे नाहींत. परंतु हे उपकार तुम्ही मजवर कां करीत आहांत तें मला कळलं पाहिजे. आणि याचं योग्य कारण जर आपण मला सांगितलं नाहीं तर मी ह्यापुढें आपल्याकडून—"

" विमले, तूं फार हट्टी दिसतेस ? अग, हे पैसे मी स्वतःच्या पदरचे देत नाहीं. तेव्हां यांत माझे उपकार ते कसले ? "

" आपण देत नाहीं ? मग हे पैसे येतात कुठून ?—ही आणखी काय

नवी भानगड आहे ? इतके दिवस संतोबांकडून पैसे मिळत होते अशी माझी समजूत होती. पुढें ते पैसे व माझा सर्व खर्च आपण देतां असं मला कळलं. आतां तुम्ही तिसऱ्याचा उल्लेख करतां ! तेव्हां ही काय भानगड आहे ? हे पैसे तुमचे नाहींत मग कुणाचे ?"

"हे पैसे तुझ्या वडिलांनीं मरतांना—"

"माझ्या वडिलांनीं ?" एकदम उत्सुकतेनें विमलेनें विचारलें. "सांगा–बापुसाहेब, माझे वडील कोण, माझी आई–माझी आई कोण सांगा–सांगा ?"

"तें मात्र मला विचारूं नकोस."

"म्हणजे ? माझे वडील कोण, आणि आई कोण, हें विचारूं नको म्हणजे काय ?"

"त्याला तसेंच कारण आहे !" कपाळावरून हात फिरवीत बापुसाहेब म्हणाले

"कोणतं कारण ? सांगा—सांगा ?"

"तुझ्या वडिलांनीं मरतांना तुला माझ्या स्वाधीन केलें आणि तुझ्याकरितां कांहीं रक्कमहि माझ्या हवालीं केली. त्यांतूनच मी हा खर्च करीत आहें. यांत माझें स्वतःचें कांहीं नाहीं."

"पण माझ्या वडिलांचं, माझ्या आईचं नांव न सांगण्याचं काय कारण ?"

"तुझ्या बापाची तशी इच्छा आहे. त्यांनीं मरतांना मजजवळून वचन घेतलें आहे. आणि 'तुमचीं नांवें कोणालाहि—प्रत्यक्ष तुमच्या मुलीलाहि मी सांगणार नाहीं.' असें मीं त्यांना वचन दिलें तेव्हां त्यांनीं सुखानें प्राण सोडला."

"आणि माझ्या आईचें नांव काय ? ती कुठें आहे ?"

"तुझा जन्म होतांच दोन महिन्यांनीं ती निवर्तली. तिचेंहि—"

"अरेरे !—आ—ई ! " इतकें बोलून विमलेच्या डोळयांत खळकन् पाणी आलें. "आई ! ह्या हतभागी विमलेला जन्म देऊन तुझा अंत व्हावा हेंच माझ्या दुर्दैवाचें पहिलें सूचक तूं मला दाखविलेंस ! आई—"

"विमले, हें काय वेड्यासारखं करतेस ? आतां झाल्या गेल्या गोष्टी, त्यांचा शोक करून काय मिळणार आहे ?"

"बापुसाहेब, माझ्या आईचं नांव सांगा ? मला जन्म देणाऱ्या मातेचं पवित्र नांव मला सांगा ?"

"छे ! तें देखील मला सांगतां येणार नाहीं. मी वचनबद्ध आहें."

"पण मला—प्रत्यक्ष आपल्या पोटच्या गोळयाला नांव कळूं नये अशी

माझ्या वडिलांची कां इच्छा असावी?—बापुसाहेब, आतां ते मरून गेले, आतां त्यांचं काय राहिलं आहे?"

"हें पहा विमले, आतां तूं जास्त विचारूं नकोस आणि मलाहि जास्त कांहीं सांगतां येणार नाहीं. मी माझ्या मित्राला, तो मृत्युशय्येवर असतांना दिलेलं वचन पाळणं हें माझं कर्तव्य आहे."

विमला बराच वेळ गप्प होती. ती स्वतःशीं विचार करीत होती. आपल्या पित्यानें मृत्यूसमयीं आपलें नांव कळूं न देण्याची कां अट ठेवावी, हें तिच्या लक्षांत येईना. पुष्कळ वेळ विचार केल्यावर कांहीं चमत्कारिक विचार तिच्या मनांत येऊं लागले. त्याबरोबर तिची चर्या पालटूं लागली. ती म्हणाली, "बापुसाहेब, माझ्या वडिलांनीं जरी तुमच्याकडून वचन घेतलें असलें तरी आतां त्याबद्दल तुम्हांला कांहींसुद्धां दोष लागणार नाहीं. कारण माझ्या वडिलांचं नांव कळतांच माझ्यावरील पुष्कळ आरोप दूर होतील. मला उघड नांवानें जगांत वावरतां येत नसल्यामुळें किती दुःख आणि हालअपेष्टा सहन कराव्या लागत आहेत याची तुम्हाला कल्पना देखील होणार नाहीं. बापुसाहेब, मी रस्त्यानें जात असतां मजकडे लोकांनीं बोटें दाखवून माझी कुचेष्टा करावी, मला वेड्यावांकड्या नांवानें हांक मारावी, मला अगदीं तुच्छ समजून लोकांनीं झिडकारावें, इतकंच नव्हे तर माझा स्पर्श—माझी सावली घेण्यांतहिं त्यांना पाप वाटावें, हा सर्व प्रकार तुम्हाला कसा कळणार? मला माझी जातपात माहित नाहीं, माझे आईबाप कोण हें माहित नाहीं. त्यामुळेंच माझे हे हाल होतात; मला दुःखें भोगावीं लागतात; लोकांची निंदा ऐकावी लागते! बापुसाहेब, सांगाहो सांगा! तुम्ही तरी असे निष्ठुर कां होतां?"

"विमले, माझा नाइलाज आहे त्याला मी काय करूं?"

यांत नाइलाज कसला? मला—प्रत्यक्ष आपल्या मुलीला आपलं नांव कळविण्याबद्दल माझ्या पित्याला असं संकट कां वाटावं?—छे! हें संकट नाहीं पण यांत कांहींतरी गूढ आहे हेंच खरं! मला त्यांचं नांव कळूं नये अशी माझ्या पित्याची इच्छा आहे—पण ही इच्छा कसली?—त्यांना लाज वाटत आहे त्याअर्थी माझ्या जन्माबद्दल कांहींतरी घोटाळा असला पाहिजे. —होय. असंच कांहींतरी असल्याशिवाय कोणत्याहि बापाला आपलें नांव चोरून ठेवण्याचें कारण नाहीं. माझा जन्म—माझा जन्म खात्रीनें त्यांच्या पापाचरणापासूनच झाला असला पाहिजे. होय—खात्रीनें अशीच कांहींतरी

दुराचरणाची भानगड असल्याशिवाय त्यांनीं आपलं नांव लपविलं नाहीं. ”

“ विमले, तूं हीं कांहीं तरी विधानें करीत आहेस हें चांगलें नाहीं. स्वतःचें नांव गुप्त ठेवण्यांत तुझ्या पित्याचा दुसरा कांहींतरी विशेष हेतु असेल, नाहीं कोणी म्हणावं ? आणि तूं हा असा कांहींतरी विपर्यास करीत आहेस ! त्यांचा कोणताहि हेतु असो अगर नसो, तथापि तूं आपल्या जन्मदात्या पित्याविषयीं असं भलतं सलतंच बोलणं चांगलं नाहीं. त्यानें तुला जन्म दिला, तुझ्या पालन-पोषणाची तजवीज करून ठेविली हें तूं विसरतां कामा नये. ”

“ बापुसाहेब, तुम्ही आतां माझ्या पित्याच्या वतीनें कितीहि रदबदली केली, त्यांची चांगली बाजू माझ्यापुढें मांडण्याचा कितीहि प्रयत्न केला तरी त्याचा कांहींच उपयोग होणार नाहीं. मी केलेला तर्क खरा असला पाहिजे. माझ्या आईला—माझ्या भोळ्या आईला फसवून त्यांनीं तिला वाईट मार्गाला नेली असली पाहिजे आणि पुढला हा प्रकार असला पाहिजे. माझा पिता त्याला आतां पिता म्हणून म्हणण्यासहि मला लाज वाटते, इतकंच नाहीं तर त्याच्या विषयीं माझ्या मनांत त्वेषहि उत्पन्न होतो. तो माझा पिता खात्रीनें नीच प्रवृत्तीचा मनुष्य असला पाहिजे. त्यानें माझ्या आईला फशी पाडलं यांत तिळमात्र शंका नाहीं. अशा रीतीनें माझा जन्म झाला काय ? देवा—अशा नीचांना तूं कांहींच शासन करीत नाहींस कारे. ”

“ विमले तूं आतां जास्त बहकूं लागलीस. तूं हें काय बोलत आहेस याचा विचार केलास काय ? ”

“ त्यांत विचार काय करायचा बापुसाहेब ? आहेत ह्या गोष्टी अगदीं उघड आहेत. तुमचा मित्र असेल पण तो नीच प्रवृत्तीचा मनुष्य होता असें मी आतां बोलतें, याची तुम्हांला अनुभवावरून खात्री असेलच !—आई, हे माझ्या जन्मदात्या आई, तूं मला ह्या जगांत कशाला आणलेंस ? माझा जन्म होतांच माझ्या गळ्याला नख लावून ह्या दुष्ट जगाचा वारा लागूं न देतां मला तशींच परत कां पाठविली नाहींस ? तूं एका दुष्ट चांडाळ मनुष्याच्या भुलथापांना बळी पडलीस पण तुझ्या या निर्दोष मुलीला आतां त्याचं प्रायश्चित भोगावं लागत आहे ! आई आज जर तूं जिवंत असतीस तर तुझ्या ह्या मुलीवर आलेली हीं संकटं, तिला रात्रंदिवस भोगाव्या लागणाऱ्या ह्या हालअपेष्टा, लोकांकडून होत असलेला तिचा हा छळ पाहून तुझें अंतः-करण फाटून गेलं असतं. आई, आज जर तूं जिवंत असतीस तर तुझा ह्यानें

असा घात केला, तुझ्या अब्रूचे ज्यानें हे धिंडवडे केले त्याचा तूं सूडच घेतला असतास! आणि मला जर त्याचं नांव कळतं आणि तो दुष्ट मनुष्य आज जर जिवंत असता तर मीं देखील तुझ्याबद्दल त्याचा सूडच घेतला असता!"

"विमले—विमले, तूं आतां फार बोलूं लागलीस!"

"कां—बापूसाहेब, तुम्हाला त्याचं कां इतकं वाईट वाटतं? तुम्हाला कां इतका राग आला? तुम्ही जर माझ्या ठिकाणीं असतां तर तुमची काय स्थिति झाली असती याचा विचार करा!"

विमले जरा शांत हो! तुझ्या पित्यानें काय केलें आणि काय नाहीं केलें हें जरी मला माहित नाहीं, तरी त्याचे तुझ्यावर अगणित उपकार आहेत. त्या उपकाराची तूं अशी फेड करणें चांगलें नाहीं."

"बापुसाहेब, मला जर ही गोष्ट पूर्वीच कळती तर त्यानें ठेवलेल्या पैशा-पैकीं एका कवडीलाही मी शिवलें नसतें. आणि ह्यापुढें शिवणारहि नाहीं. माझ्यामागें आतां ही ग्रहदशा लागलीच आहे. पण हेंहि आपण लक्षांत ठेवा कीं मला जरी भिक्षा मागावी लागली तरी मी मोठ्या आनंदानें भिक्षा मागेन पण त्याच्या पैशाला स्पर्शही करणार नाहीं."

"विमले, तूं आतां माझं ऐकशील का?—हो पाहूं जरा शांत, आणि मी काय सांगतों तें नीट ऐकून घे."

"सांगा—मी अगदीं शांत आहें. बापुसाहेब, तुम्ही मला माझ्या पित्याचं नांव सांगितलं नाहीं हें उत्तम केलं. ईश्वरानें आतां मजवर इतकीच दया करावी कीं, मला त्या मनुष्याचं नांव मी मरेपर्यंत कळूं नये."

"बरं बरं, आतां तें जाऊं दे आणि मी काय सांगतों तें ऐक." बापुसाहेब म्हणाले, "हें पहा, सांप्रत तुझ्यावर चारी बाजूनीं बिकट प्रसंग आले आहेत. तेव्हां तूं येथें नगरात रहाण्यापेक्षां दुसरीकडे कुठंतरी जावंस हें चांगलें! माझी पुण्यामुंबईला ओळख आहे, तेथें मीं तुझी चांगली व्यवस्था लावून देतों. तुझ्या मनांतून आणखी शिकावयाचें असेल तर तशी व्यवस्था ट्रेनिंगस्कूलमध्यें करतों; तुला नर्स किंवा मिडवाईफ व्हावयाचें असेल तर तसें सांग. मीं तीहि व्यवस्था करतों. पण तूं आतां नगरांत राहूं नयेस हें चांगलं!"

"बापुसाहेब, तुमचं सर्व भाषण मी ऐकलं. मी येथें राहूं नये असं जें

तुम्ही मला सांगतां तें कोणत्या अर्थानें सांगतां? माझ्यावर संकटं आलीं आहेत, माझी ग्रहदशा फिरली आहे म्हणून किंवा त्यांत तुमचा कांहीं अंतस्थ हेतु आहे?"

"माझा त्यांत अंतस्थ हेतु काय असणार?"

"मी सांगतें---आणि आतां मीहि तुमच्याबरोबर अगदीं उघड बोलतें. आतांपर्यंत जें केलंत तें सर्व एक विशिष्ट हेतु मनांत धरून केलं आहे. परंतु त्याबद्दल मी तुम्हाला कांहींच दोष देत नाहीं. कांहीं झालं तरी तुम्ही आपल्या मुलीचं कल्याणच पहाल—कां असे दचकलां कां?"

"ना—हीं. मी—मी—तूं काय बोलतेस तें मी नीट समजलों नाहीं."

"मी उघड करून सांगतें. नरसिंगरावांचं मजवर प्रेम आहे. आणि माझंहि त्यांच्यावर प्रेम आहे. हें आमचं प्रेम तुमच्या मुलीच्या आड येत आहे हेंहि मी जाणून आहें. आणि इतक्याच करितां मी हें नगर सोडून जावं अशी तुमची इच्छा आहे. परंतु बापुसाहेब, तुम्हाला भिण्याचं कांहींच कारण नाहीं. माझं नरसिंगरावावर असलेलं प्रेम स्वार्थी नाहीं. माझ्याकरितां त्यांना जर सर्वस्वाला मुकावं लागेल, त्यांच्या पवित्र नांवाची लोकांत बदनामी होत असेल, तर तें माझ्या प्रेमाला केव्हांहि सहन व्हावयाचं नाहीं. माझ्यांत आणि त्यांच्यांत किती अंतर आहे हें मी चांगल्या प्रकारें जाणून आहें. तुम्ही त्याना घातलेली अट मला माहित आहे. माझ्यामुळे ते निर्धन होऊ जगांत त्याच्या नांवाला बट्टा लागणार असें कळूनहि जर मीं त्यांच्याबरोबर लग्न केलें तर तें माझें प्रेम अगदीं हीन प्रतीचें समजलें पाहिजे. पण त्यांच्याविषयीं माझ्या अंतःकरणांत वसत असलेलें प्रेम फार उच्च प्रकारचें आहे; हें मी तुमच्याजवळ मोठ्या अभिमानानें कबूल करतें. आणि म्हणूनच सांगतें कीं, माझ्याविषयीं तुम्ही अगदीं निष्काळजी रहा. मी तुम्हाला शपथ घेऊन सांगतें कीं, त्यांच्याबरोबर मी लग्न करणार नाहीं इतकंच नव्हे तर त्यांच्याबरोबर कोणताहि प्रेमसंबंधहि ठेवणार नाहीं."

"मग आतां नगर सोडून जाण्याचा तूं केव्हां विचार करणार?" थोड्या वेळानें बापुसाहेब म्हणाले, "कुठं जायचं आणि पुढें काय करायचं तें मला कळलं म्हणजे मला तशी व्यवस्था करण्यास ठीक पडेल."

"मी येथें राहिल्यानें तुम्हाला जी भीती होती ती दूर झाली. आतां मी नगर सोडलेंच पाहिजे असें कांहीं नाहीं. कांहीं झालें तरी नगर ही माझी

जन्मभूमि आहे. कितीहि संकटें आलीं तरी नगर सोडण्यापूर्वी मला चांगलाच विचार केला पाहिजे. आणि यदाकदाचित् मला नगर सोडावेंच लागलें तरी मला संकटं थोडींच सोडणार आहेत! माझ्या मागें ग्रहदशा लागलीच आहे आणि ही ग्रहदशा मी मरेपर्यंत सुटेल असेंहि कांहीं दिसत नाहीं!"

"बरें जशी तुझी मर्जी! पण आतां तूं ह्यापुढें नरसिंगाला भेटणार का?"

"कां बरं?—कां भेटूं नये? मला त्यांच्याबरोबर इतर कोणताहि व्यवहार कर्तव्य नसलं तरी तें माझं आराध्य दैवत आहे. ते मला पूज्य आहेत. त्यांच्याविषयीं माझ्या अंतःकरणांतलें प्रेम केव्हांहि कमी व्हावयाचें नाहीं. मला त्यांना भेटण्याला काय हरकत आहे!"

"हरकत हरकत नाहीं. प—ण—"

"आतां तुम्हाला शंका घेण्याचं कांहींच कारण नाहीं." असें म्हणून विमला उठली आणि पुढें म्हणाली, "बापुसाहेब, आतां मी जातें. तुम्ही मजबरोबर इतका वेळ मोकळ्या मनानें बोललां याबद्दल मी तुमची आभारी आहें."

विमला दिवाणखान्यांतून बाहेर पडली. बापुसाहेब तिच्याकडे पहातच राहिले. ती दरवाजांतून बाहेर पडतांच त्यांनीं एक मोठ्यानें श्वास सोडला. क्षणभरानें ते स्वतःशी म्हणाले, "विमले, पोरी, तूं खरोखरीच दुर्दैवी आहेस तुझ्याबद्दल माझ्या अंतःकरणाला भयंकर पीळ पडतो! पण काय करूं! माझ्या तोंडाला कुलुप लागलें अहे ना! अहाहा! पोरी! ह्या एका गोष्टीमुळं तुझं जन्माचं नुकसान झालं! ह्या एका गोष्टीमुळें तुला सर्व जन्म दुःखांत काढावा लागणार! ह्या एका गोष्टीमुळें तूं हीन जातीची ठरणार! पण काय करूं?—विमले, तूं आपल्या आईची निव्वळ दुसरी प्रतिमाच आहेस! तिचा करारी आणि बाणेदारपणा तुझ्या अंगांत अगदीं तंतोतंत उतरला आहे. तुझी आई! जशी एका गोष्टींत फसली तशी पोरी, तूं मात्र फसूं नकोस! तुझ्यावरील सर्व संकटं मला दिसत असून त्याचा मजकडून प्रतिकार होत नाहीं. मला डोळे असून आंधळ्याचं सोंग घ्यावं लागत आहे. पण काय करूं?—"

इतक्यांत दरवाजा वाजला आणि कमला आंत आली

"बापुसाहेब, ती आली होती, तिच्याबरोबर इतका वेळ कशाच्या एवढ्या गोष्टी चालल्या होत्या? दोन तास झाले तुमच्या गोष्टी चालल्या होत्या. कां

बरं ? ती कांहीं मिशनऱ्यांकरितां फंड मागायला आली होती वाटतं ? ”

“ तसंच कांहीं नाहीं. प-ण—तूं कुठें फिरायला कां निघालीस ? नरसिंग येणार ना तुझ्याबरोबर ? ”

“ होय. ”



## २० संकटाचा आरंभ

**विमला** तडक खालीं उतरून रस्त्याला लागली. जिन्यावरून उतरत असतां खोलींत उभा असलेला नरसिंगराव तिला दिसला. परंतु त्याची पाठ खिडकीच्या बाजूला होती. त्यामुळें त्यानें विमलेला पाहिलें नाहीं. तो दृष्टीस पडतांच विमलेचे पाय जिन्यांतच क्षणभर अडखळले. परंतु पुनः विचार करून ती तशीच खालीं उतरली. रस्त्यानें चालत असतां तिच्या गतीवरून तिचा कोणता तरी एक निश्चय कायम झालेला तिच्या चर्येवरून दिसत होता. ती घरीं आली तेव्हां म्हातारी जया तिची वाटच पहात होती.

“ जये, आजपासून मला संतोबाकडून खर्चाला मिळणारे पैसे बंद झाले. ” विमला घरांत आल्यावर म्हणाली.

“ कां—असं झालं ? मग आतां पुढें—”

“ पुढें आतां कांहीं तरी उद्योग करून मला स्वतःचा आणि तुझा देखील खर्च चालविला पाहिजे. मला मिळत असणाऱ्या पैशाबद्दचा सर्व उलगडा आतां बापुसाहिबांकडे झाला. ती हकीकत फार मोठी आहे. मी तुला ती सर्व कर्मकहाणी एकदां स्वस्थ चित्तानें सांगेन. ” असें बोलून विमला खोलींत गेली आणि पुढें काय करावयाचें याचा विचार करीत बसली. आतां स्वतःचा चरितार्थ चालविण्याकरितां आपणास काय केलें पाहिजे, हा तिच्यापुढें प्रश्न होता. कशिद्याचें काम, लोकरीच्या टोप्या, पायमोजे, गळपट्टे इत्यादि विणकाम तिला चांगलें येत होतें. हें काम जर आपणास मिळालें तर महिन्याच्या कांठीं आपणास कांहीं प्राप्ति होईल. त्याचप्रमाणें मुलींना घरीं जाऊन शिकविण्याच्या एक दोन शिकवण्या धरल्या तर सहज दहा बारा रुपये आपणास मिळतील, असेंहि तिला वाटूं लागलें. तिला पहिल्या विचारापेक्षां दुसरा विचारच जास्त पसंत पडला. आपणास शिकविण्याकरितां कोण कोणत्या मुली मिळतील,

कोण कोणती मंडळी आपल्या ओळखीची आहेत, म्हणून ती विचार करूं लागली. तेव्हां तिच्या ओळखीपैकीं फक्त एक दोनच घरीं मुली असून प्रयत्न केल्यास त्या मुलींच्या शिकवण्या आपणास मिळतील असें तिला वाटूं लागलें. शिकवण्या करून राहिलेल्या वेळांत कशिद्याचें आणि लोकरीचें काम करावें असा विचार करून दुसऱ्या दिवशीं सकाळीं शिकवण्या मिळविण्याच्या खटपटीला लागावें असा तिनें निश्चय केला. अशा रीतीनें संध्याकाळ होई-पर्यंत ती खोलींत बसून विचार करीत होती. ती अशा रीतीनें खोलींत बसली होती कीं, खिडकींतून रस्त्यावरील सर्व देखावा तिला स्पष्ट दिसत होता. थोड्या वेळानें रस्त्यावरून बापुसाहेबांची गाडी येत असतांना तिला दिसली. त्याबरोबर चटकन् उठून ती खिडकीजवळ उभी राहिली. गाडींत नरसिंगराव आणि समोरच्या बाजूला कमला बसली होती. कमला फिरावयास निघाली तेव्हां वाटेंत तिनें नरसिंगरावाबरोबर गोष्टी करतांना विमला आपल्या घरीं आली होती आणि बापुसाहेबांजवळ दोन तास गोष्टी बोलत बसली होती, असें सांगितलें. नरसिंगरावाला ती थट्टाच वाटली. कारण विमला आली असतां ती आपणास भेटल्याशिवाय जाईल हें त्याला संभवनीय वाटेना! परंतु मनाची खात्री करून घेण्याकरितां त्यानें फिरून परत येतांना गाडी मुद्दाम विमलेच्या घराकडे वळविण्यास सांगितलें. तेव्हां कमलेनें विचारलें, " तिला आतांच भेटलं पाहिजे ? काय इतकं काम आहे ? तिच्या मनांतून भेटावयाचें असतें तर ती होऊनच भेटली असती. ती मोठी मिजासी आणि चढेल दिसते ! "

" कमला, तूं अगदीं चुकतेस ! तिचा तुला जास्त परिचय नाहीं म्हणून तिचा स्वभाव तुला माहित नाहीं. विमला म्हणजे खरोखरच विमला आहे. तिचा स्वभाव इतका गोड आणि प्रेमळ आहे कीं, मी कितीहि वर्णन केलं तरी तें अपुरेंच होईल. माझ्या आजारीपणांत तिच्या सहवासामुळें माझें अर्धें दुःख कमी झालें होतें. तिची आणि तुझी चांगली ओळख झाल्यावर तिच्याजवळून एक मिनिटभरहि हालूं नये असें तुला वाटेल. "

गाडी उभी राहिली. नरसिंगराव गाडीवानाच्या खांद्यावर हात ठेवून खालीं उतरला. विमला दरवाजाजवळ उभी होती. नरसिंगराव घराची पायरी चढत असतांना म्हणाला, " विमला, तूं आतां संध्याकाळीं आमच्या घरीं आली होतीस ही गोष्ट खरी काय ? "

" होय आलें होतें. पण आतां आपली प्रकृति कशी आहे ?"

" आतां बरी आहे. पायांत थोडी कसर आहे पण आणखी आठचार दिवसात मला काठीशिवाय चालतां येईल असं वाटतं ! पण विमला, तूं आली होतीस आणि मला भेटल्याशिवाय राहिलीस हें तुला बरं दिसलं का ?"

" चला, आंत चला—किती वेळ येथें उभे राहणार ?" विमला पुढें झाली. तिच्यामागून नरसिंगरावहि हळुहळू आंत जाऊं लागला. कमला मात्र गाडींतून खाली उतरली नाहीं. परंतु त्याबद्दल विमलेला कांहींच वाटलें नाहीं. तिचें आतांचें वर्तन फारच गंभीरपणाचें होतें. आपल्या प्रियकराला भेटण्याची, त्याच्याशीं बोलण्याची तिच्या मनाला जरी उत्सुकता होती; तथापि आतांच्या तिच्या वर्तनांत प्रेमीजनांत दिसून येणारी प्रेमजिज्ञासा दिसत नव्हती.

" तूं बापुसाहेबांजवळ दोन तास बोलत होतीस ही गोष्ट खरी कां ?—" खुर्चीवर बसल्यानंतर नरसिंगरावानें विचारलें.

" होय. मला कांहीं गोष्टींचा उलगडा करून घ्यावयाचा होता, म्हणून मी मुद्दाम आलें होतें. मी परत यावयाला निघालें तेव्हां तुम्ही खोलींत फिरायला जाण्याच्या तयारींत होतां."

" मग केला कां त्यांनी उलगडा ? कोणत्या त्या गोष्टी ?"

" मी माझ्या स्वतःविषयीं कांहीं माहिती विचारली आणि त्यांनीं ती सरळ मनानें मला सांगितली."

" पण ती कोणती माहिती ?"

" ती माहिती अति क्षुद्र आहे. ती आपणास समजल्यानें वाईट वाटेल."

विमले, असं कां बरं म्हणतेस ? तुझ्या सुखदुःखाची जर मी सर्वस्वी हमी घेतली—"

" थांबा—मला आज तुमच्याजवळ एक विनंति करावयाची आहे. तुमचं माझ्यावर प्रेम आहे, त्याचप्रमाणें माझं—पण आतां काय सांगूं !—तें कांहीं जरी असलं तरी आपण म्हणतों त्याप्रमाणें गोष्टी घडून येणें अगदीं अशक्य आहे. माझी जात काय, माझे आईबाप कोण याबद्दल मला किंवा तुम्हांला कांहींच माहिती नाहीं. तरी देखील—"

" विमले, तुझ्या सर्व शंका मला माहित आहेत. मला त्या गोष्टींशी कांहीं एक कर्तव्य नाहीं. शील हें जातींत किंवा आईबापामुळें बनत नाहीं. शील हें ज्याचें त्यानें स्वतःच बनवायचें असतें. तुझ्या शीलाविषयीं मला

स्वप्नांतहि शंका येणार नाहीं. तुझ्या जातीबद्दल किंवा तुझ्या मातापित्याबद्दल पुढें जरी कांहीं खात्रीलायक कळलें आणि तें असमाधानकारक असलें तरी माझ्या प्रेमांत किंचितही फरक पडणार नाहीं. मी जातीबद्दल क्षिति बाळगणारा नाहीं. मला तूं—विमला पाहिजे आहेस ! ”

“ थांबा, अशी एकदम घाई करूं नका. तुम्ही काय बोलतां याचा विचार करा. माझ्यामुळें तुमचें किती भयंकर अहित होणार आहे हें तुमच्या लक्षांत आहे ना ? ”

“ बापुसाहेबांनीं सांगितलें त्याच वेळीं मीं ह्या सर्व गोष्टींचा चांगला विचार केला आहे. आणि तोच तुला आतां सांगतों. तुझ्याबरोबर लग्न करण्यानें माझी सर्व इस्टेट जरी गेली तरी त्याबद्दल मला काडीइतकेंहि दुःख होणार नाहीं. मला लोकांनीं बहिष्कार घातला तरी त्याची मला पर्वा नाहीं. आपलें परस्परांवर एकनिष्ठ प्रेम असल्यावर आपण जगाच्या दुसऱ्या टोंकाला एखाद्या खोंपटांत एकत्र राहून आनंदानें दिवस घालवूं. पण विमले, अशा एखाद्या खोंपटांत माझ्या सहवासांत दिवस घालविण्याची तुझी इच्छा आहे काय ? ”

विमला उत्तर देण्यास गोंधळली. इतक्यांत दरवाजा वाजला आणि कमला दरवाजांत येऊन उभी राहिली.

“ नरसिंगराव, चला उठा—किती वेळ झाला ! रात्र होईल ना आतां. घरीं बापुसाहेब रागें भरतील. उठा—धरा माझा हात—हं उठा—”

विमलेच्या तोंडांतून काय उत्तर येतें तें ऐकण्यास अत्यंत उत्सुक झालेले कान आणि तळमळणारें मन अतृप्त स्थितींत ठेवून नरसिंगरावाला उठणें भाग पडलें. तो हळुहळू बाहेर गेला आणि गाडींत बसला. विमला दरवाजाजवळ उभी राहून त्यांची गाडी दृष्टीआड होईपर्यंत पहात होती. नरसिंगरावानें विचारलेला शेवटचा प्रश्न तिच्या मनांत घोळत होता. आपली सर्व बाजूंनीं नाडलेली अवस्था झाली आहे. मग ह्या एका बाबतींत तरी आपण सुखी कां होऊं नये, असें तिला वाटूं लागलें. ती स्वतःशीं म्हणाली, ‘ मी बापुसाहेबांना वचन कां दिलें ? आणि आपल्या मुलीकरितां मला अशा रीतीनें अडविण्याचा त्यांना काय अधिकार ? मी स्वतंत्र असतांना त्यांच्या मताप्रमाणें, इच्छेप्रमाणें आणि त्यांच्या सांगण्याप्रमाणें तरी वागावें ? नरसिंगरावांचें मजवर प्रेम आहे. ते मजबरोबर लग्न करण्यास तयार आहेत. मग मी

तरी त्यांच्याबरोबर लग्न करून सुखी कां होऊं नये ? माझ्या प्रेमापुढें ते माझ्या जातीची किंवा इतर लोकांची पर्वा करीत नाहींत. मग मीं त्यांना 'नाहीं' कां म्हणावें ? आम्ही दोघे एखाद्या झोंपडींत जरी राहिलों तरी आम्ही सुखी होऊं ! मला तरी आतां नरसिंगरावांच्याशिवाय इतर लोकांशीं काय कर्तव्य आहे ?' असा विचार करीत असतां थोड्यावेळापूर्वी नरसिंगरावानीं विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर आपण चटकन् 'होय' म्हणून दिलें असतें म्हणजे त्याना किती तरी आनंद झाला असता हा विचार मनांत येऊन तिनें स्वतःला दूषण दिलें.

परंतु विमलेचें दुसरें मन जागृत होतांच पुनः तिचे सर्व विचार बदलले. 'अरेरे ! माझें मन किती स्वार्थी आहे ! मी तर जन्माची दुर्दैवी आहेंच पण माझ्या स्वार्थामुळें मी किती जणांना दुःखी करीन ? शिवाय ज्यांच्या प्राप्तीमुळें मी स्वतः सुखी होणार ते माझ्यामुळें सुखी होतील काय ? उलट माझ्याशीं लग्न करतांच ते निष्कांचन होतील, त्यांच्या थोर घराण्याला बट्टा लागेल, त्यांच्या नांवाला कमीपणा येईल, त्यांचे स्वजन त्यांच्याकडे तिरस्कारानें पाहतील, त्यांची जेथें तेथें मानखंडणा होईल, हें सर्व मला सहन होईल काय ? आणि असा प्रकार झाल्यावर ते स्वतःतरी सुखी होतील काय ?— नाहीं अशी स्थिति प्राप्त झाल्यावर मला जरी कळूं दिलें नाहीं तरी ते अंतर्यामी दुःखीच असणार ! आणि बापुसाहेबांच्या इच्छेप्रमाणें त्यांनीं कमलेबरोबर लग्न केल्यास प्रथम जरी त्यांना थोडें वाईट वाटलें तरी ते सुखीच होतील. विमले, तुझें त्यांच्यावर प्रेम आहे ना ? मग तूं त्यांना दुःखी करणं चांगलं का ?—नाहीं. तिच्या मनानें हें शेवटचें उत्तर दिलें. हा तिच्या निर्मल मनानें दिलेला शेवटचा निकालच होता. आणि ह्या निकालाप्रमाणें वागण्याचा तिनें निश्चय केला. आतां आपण होतां होईल तों नरसिंगरावाला भेटूं नये हेंच चांगलें असें तिनें ठरविलें.

विमलेला आतां स्वतःच्या चरितार्थाकरितां कांहीं तरी उद्योग केल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. ती दुसऱ्या दिवशीं सकाळीं शिकवण्या मिळविण्याची खटपट करण्याकरितां आपल्या ओळखीच्या ठिकाणी जाण्याकरितां निघाली. मिशनमध्यें असतांना प्रसंगविशेषीं तिला मधून मधून 'पवित्र मॉनिकाच्या शाळेंत' शिकविण्याकरितां जावें लागे. त्यावेळीं त्या शाळेंत येणाऱ्या कांहीं धानेक पांढरपेशा मुलींची व त्यांच्या घरच्या मंडळीशीं ओळख झाली होती.

त्यांच्या घरीं जाऊन विचारल्यास आपणास शिकवण्या सहज मिळतील अशी तिची खात्री होती. प्रथम ती एका घरीं गेली. तेथें घरांतील बायकांना भेटल्यावर त्यांनीं पुरुष मंडळींना विचारून मग काय तें सांगूं, असें तिला सांगितलें. दुसऱ्या घरीं गेल्यावर तेथें तिच्या ओळखीच्या मुलीचे वडीलच तिला भेटले. तेव्हां त्यांनीं 'मला माझ्या मुलीला ह्यापुढें मिशनऱ्यांच्या शाळेंत घालावयाची नाहीं. कारण पुढें फार भानगडी उपस्थित होतात.' असें सांगून विमलेला वाटेला लावलें. तेथून ती तिसऱ्या ठिकाणीं गेली, तेथें तर ती मंडळी तिच्यावर उलटूनच पडली. 'तूं एक बाटलीस तर बाटलीस; पण आमच्या मुलीवर तुझा कां डोळा ? ह्या शिकविण्याच्या निमित्तानें तू आमच्या घरांत साखर पेरण्याकरितां आली आहेस, हें आम्ही जाणून आहोंत पण त्याचा कांहींसुद्धां उपयोग होणार नाहीं. तूं स्वतः खड्डयांत पडली आहेस तर एकटीच त्या खड्डयांत मर; दुसऱ्या मुलींना कशाला आणखी त्या खड्डयांत ओढतेस ? जा—मुकाट्यानें आलीस तशी चालती हो. आणि पुनः आमच्या घराची पायरी चढूं नकोस !' असा हा तिसऱ्या ठिकाणीं प्रकार झाला तरी ती आणखी एका ठिकाणीं गेली. आपणाविषयीं लोकांचा गैर-समज झालेला आहे हें तिला माहित होतें म्हणून वरील प्रकाराबद्दल तिला विशेष वाईट वाटलें नाहीं. परंतु चौथ्या ठिकाणीं गेल्यावर मात्र सर्व गोष्टीचा कळस झाला. तेथील लोकांनीं तिला विचारलें कीं, आमच्या मुली बाटविण्या-बद्दल तुला काय पगार देण्याचं मिशनऱ्यांनीं ठरविलं आहे. तुम्ही मिशनरी लोक फार पाताळयंत्री असतां. आमच्या मुलींना फुकट शिकविण्याकरितां याल, त्यांना कशिदा शिकवाल, स्वतःच्या पैशांची लोंकर आणि सूत आणून द्याल, त्यांना चांगलीं चांगलीं पुस्तकं, सुंदर वस्तु आणून द्याल आणि शेवटीं एखादे दिवशीं त्यांच्या गळ्याभोंवतीं आपला पाश टाकाल. प्रथम प्रथम हा तुमचा कावा लोकांच्या लक्षांत आला नाहीं. पण आतां आम्हीं चांगले हुशार झालों आहोंत. तुमचा वारासुद्धां आतां आम्ही घेणार नाहीं. चला निघा—आमच्या घरांतून प्रथम खालीं उतरा.' अशा रीतीनें विमलेची संभावना करूनच ती मंडळी गप्प राहिली नाहीं. त्यांनीं ती रस्त्यानें जाऊं लागतांच आळींतील कांहीं टारगट पोरें चिथवून तिच्या मागून पाठविलीं. त्या पोरांनीं तिला सर्व रस्ताभर अगदीं सळो कीं पळो करून सोडलें.

शिकवण्या मिळण्याची सर्व आशा पार लयाला गेली. घरीं येईपर्यंत ती

अगदीं रडकुंडीस आली. आपणास सहज दोनचार शिकवण्या मिळतील अशी तिला खात्री होती. परंतु अनुभव मात्र विपरित आला. मनुष्यप्राणी नेहमीं फसतो तो असाच ! 'आपण असं केल्यावर असं होईल' असं तो मनाशीं योजून ठेवतो परंतु घडून येतें भलतेंच ! तथापि आशाही विलक्षण वस्तु आहे. ही वस्तु दुर्लभ जरी असली तरी मनुष्य समजून उमजून तिच्यांत आपलें मन गुंतवून ठेवतो. त्याला एकदोनच नव्हे तर पांच पन्नास ठेंचा लागल्या तरी तो कस्तुरीमृगाप्रमाणें आशारूपी कस्तुरीच्या प्राप्तीकरीतां रानोमाळ भटकत असतो. एकाद्या बाबतींत पूर्ण निराशा झाली तरी मन पुन्हा त्याच गोष्टीच्या प्राप्तीकरीतां कांहीं काळानें आशा करूं लागतें. विमला ह्या गोष्टीला अपवाद होती असें नाहीं. ती पुन्हा सायंकाळीं शिकवण्या मिळविण्याची खटपट करण्याकरीतां घराबाहेर पडली. ह्यावेळीं मात्र तिला अगदींच निराळा अनुभव आला. ती ज्या घरीं गेली तेथील मंडळीनीं तिला बाहेरच उभें राहण्यास सांगितलें. 'तूं आमच्या घरांत आल्यापासून सर्व भ्रष्टाकार होईल. आजच कांहीं आम्हीं धर्म गुंडाळून ठेविला नाहीं' इ० धर्माच्या आणि अधर्माच्या लांबलांब गोष्टी सांगून त्यांनीं विमलेची बोळवण केली. तेथून ती दुसऱ्या घरीं गेली. त्या मंडळींनीं तिला येण्याचें कारण विचारून सांगितलें कीं, 'तूं जर आमच्या मुलींना शिकवण्याकरिता येत असलीस तर आम्ही मुलींनां शाळेंतून काढूं. मात्र तुला सकाळीं ११ पासून ४ वाजेपर्यंत मुलींना शिकवावें लागेल. आणि त्याबद्दल आम्ही जी फी शाळेंत देतों ती तुला देऊं. आमच्या चार मुली शिकवशील तर प्रत्येकी चार आण्याप्रमाणें महिन्याला तुला एक रुपया देऊं !'

अगदीं शिकस्त झाली ! आपला चरितार्थ चालविण्याकरितां तिची शिकवण्यावर जी मोठी भिस्त होती ती सर्व नाहींशी झाली. आतां लोकरीचें व सुताचें काम आणि कशिद्याचें रुमालकाम यावर आपणास जें कांहीं मिळेल त्यावरच आपणास चरितार्थ चालवावा लागेल, हें तिला आतां स्पष्ट दिसूं लागलें. आणि त्यांतून तो दिवस असा चमत्कारिक होता कीं, संतोबाकडून मिळालेले सर्व पैसे संपले होते. शिवाय घरांतील धान्य व इतर आवश्यक जिनसाहि संपल्या होत्या.



गेल्या वर्ष दोन वर्षांत कालच्या रात्रीसारखी स्वस्थ झोंप बापुसाहेबांना केव्हांच लागली नव्हती. विमला आपणास भेटण्याकरितां आली आहे असें कळतांच त्यांना जी एक प्रकारची भीति वाटली आणि ते ज्या भीतिकरितां तिच्याशीं बोलण्यास किंवा तिच्या दृष्टीला दृष्टि देण्यास कचरत असत ती सर्व भीति कालच्या भेटीमुळें पार नाहींशी झाली. इतकेंच नव्हे तर जी गोष्ट घडून यावी म्हणून ते अलिकडे सारखे प्रयत्न करीत होते ती गोष्ट सुद्धां अगदीं सहजासहजीं घडून आली. तेव्हां त्यांचें मन कां बरें स्वस्थ होणार नाहीं? विमलेनें शपथ घेऊन त्यांना सांगितलें तेव्हां आतां ती येथें नगरांत राहिली तरी त्यांना काळजी करण्याचें कारणच राहिलें नाहीं. त्यांतून अलीकडे चार आठ दिवस त्यांच्या मनाप्रमाणें कमला आणि नरसिंगराव दिवसांतील कांहीं भाग परस्परांच्या सहवासांत गप्पा गोष्टी करण्यांत घालवूं लागले होते. शिवाय दोन दिवस संध्याकाळीं ते एकत्र गाडींत बसून फिरावयासहि जाऊं लागले होते. हा सर्व प्रकार त्या दोघांच्या पुढें जुळून येणाऱ्या संबंधाबद्दल सूचक आहे असें त्यांना वाटूं लागलें, नरसिंगरावानें जरी त्यांना अद्यापि कांहींच निश्चयात्मक उत्तर दिलें नव्हतें तरी त्याचें कमलेबरोबर अगदीं उघड आणि मोकळें वर्तन पाहून त्याची आपल्या मुलीबरोबर लग्नाला संमति आहे असेंच त्यांनीं गृहित धरलें.

परंतु त्यांत बापुसाहेबांची चुकी तर होत नव्हती ना? आपल्या इच्छेला नरसिंगरावाची संमति आहे असें ते समजत होते परंतु खरा प्रकार कसा होता? नरसिंगराव फिरून घरीं आला परंतु त्याला कांहीं सुचेना! आपण विचारलेल्या प्रश्नाला उत्तर देण्यास विमलेला इतका विचार कां करावा लागला याचें कांहींच कारण त्याच्या लक्षांत येईना! कदाचित् आपणास कमलेबरोबर पाहून व तिचें आपणाबरोबर मोकळ्या मनाचें वर्तन पाहून स्त्रिस्वभावाला अनुसरून तिच्या मनांत हेवा उत्पन्न झाला असावा, अशी त्याला क्षणभर शंका आली; परंतु लगेच विमलेच्या उदात्त, प्रेमळ आणि मोकळ्या मनाची आठवण होतांच आपणांस आलेली शंका अगदीं अस्थानीं आहे असें त्याचें त्यालाच वाटूं लागलें. परंतु त्याच्या मनाची तळमळ मात्र थांबेना!

त्या दि[illegible] संध्याकाळीं तो आणि कमला, फिरावयास गाडींतून निघाली

असतां वाटेंत नरसिंगराव तिला म्हणाला, " कमला, आज देखील परत घरीं जातांना मला विमलेला भेटावयाचें आहे. तर गाडी त्या बाजूला वळविण्यास सांग. "

" रोज रोज काय आहे तिच्याकडे ? काल इतका वेळ तुम्हीं बोलत होतां, मग नाहीं का संपल्या तुमच्या गोष्टी ? "

" परस्परांची ओळख असणाऱ्या दोन व्यक्ति बोलूं लागल्या म्हणजे त्यांच्या गोष्टी वाढतच जाणार. रात्रंदिवस जरी ते दोघे बोलत बसले तरी त्यांच्या गोष्टी संपावयाच्या नाहींत. आतां हेंच पहा—तूं प्रथम मजबरोबर कशी तुटक रीतीनें वागत होतीस. पण आतां एकमेकांचा जास्त परिचय होतांच आपण नाहीं का तासन्तास बोलत ? मग आपल्या गोष्टी नाहींत त्या संपत ? तशीच ही गोष्ट ! त्यांतून विमलेचे मजवर किती तरी उपकार आहेत. रात्रंदिवस तिनें जिवापाड मेहनत करून माझी सेवाशुश्रूषा केली आहे. आतां जर तिला मी भेटण्याची टाळाटाळ करूं लागलों तर ती काय बरें म्हणेल ? गरज सरतांच हे माझी ओळखसुद्धां विसरले असेंच ती म्हणेल ! " अशा रीतीनें कमलेची समजूत करून परत येतांना त्यानें जयेच्या घराजवळ गाडी थांबविण्यास तिला भाग पाडलें. परंतु चौकशी केल्यावर विमला बाहेर गेली आहे, असें त्याला कळलें. तेव्हां मात्र त्याला फार वाईट वाटलें.

त्यांची गाडी निघून गेल्यावर थोड्या वेळानें विमला परत आली. तिची चर्या अगदीं उतरलेली होती. शिकवण्या मिळविण्याच्या बाबतींत तिची अगदीं निराशा झाली होती. घरीं येतांच नरसिंगराव आला होता असें तिला जयानें सांगितलें; आणि शिकवण्या मिळाल्या काय असा प्रश्न केला. विमलेनें झालेला सर्व प्रकार तिला सांगितला तेव्हां म्हातारी दुःखित स्वरानें म्हणाली, " मग आतां पुढें कसं करायचं ! उद्यां न्हाई घरांत दाना !—"

विमलेनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. आणि ती उत्तर तरी काय देणार ? खोलींत जाऊन तिनें पुष्कळ विचार केला परंतु पुढें काय करावें हेंच तिला सुचेना. शेवटीं उद्यांच्या स्थितीचा विचार करतां करतां तिची छाती भरून आली. संकट पुढें उभें आहे असें तिला स्पष्ट दिसूं लागलें. आणि त्या विचारानें गोंधळून तिच्या नेत्रांतून हळुहळू अश्रु गळूं लागले. पुष्कळ अश्र[illegible] केल्यावर ती उठली आणि आपली लहानशी पेटी उ[illegible] तींतून [illegible]र्वीं मिशनमध्यें असतांना केलेले लोंकरीचे व सुताचे रुमाल, मोजे, टोप्या

आणि कशिद्याचे रुमाल बाहेर काढूं लागली. त्या सर्वांचा हिशेब केल्यावर कमींत कमी दहा रुपये तरी येतील असा तिनें अंदाज केला. नंतर तिनें त्या सर्व जिनसा एका रुमालांत बांधल्या आणि थोडा वेळ विचार करून ती बाहेर पडली. बाजारांत तिच्या ओळखीचीं दोन दुकानें होतीं. मिशनमध्यें असतांना ती त्या दुकानावरून लोंकर, सूत, सुया इत्यादि जिनसा विकत घेत असे. त्या दुकानांत लोंकरी आणि सुती कापड मिळतें हें तिला माहित होतें. त्या दुकानीं आपण ह्या जिनसा नेल्यास ते दुकानदार विकत घेतील असें गृहित धरूनच ती त्या दुकानावर गेली. ती वेळ दुकान बंद करण्याची होती. तेव्हां घाई-घाईनें दुकानदारानें काय पाहिजे असें तिला विचारलें.

" मी कांहीं लोंकरीच्या आणि सुती वस्तु आणल्या आहेत. आपल्या दुकानावर खपण्यासारखा माल आहे. " विमला रुमालांतील जिनसा सोडून म्हणाली.

" ह्यांचा आतां आम्हाला कांहीं उपयोग नाहीं. ह्या जिनसा आतां कोणी विकत घेत नाहीं. आमच्या दुकानीं असलेला असा माल धूळ खात पडला आहे. उगाच त्यांत भांडवल मात्र अडकून राहिलं आहे. "

विमला मुकाट्यानें खालीं उतरून दुसऱ्या दुकानीं गेली. तेथेंहि तोच प्रकार ! परंतु शेवटीं तो दुकानदार इतकें मात्र म्हणाला कीं, " आतां आम्हांला ह्या वस्तूंची मुळींच जरूरी नाहीं. परंतु तुम्ही आतां आला आहांत आणि तुम्हाला पैशाचीही निकड दिसते तर ठेवून द्या त्या वस्तू मी देतों त्या सर्वांचे तीन रुपये !

जवळ जवळ सातआठ रुपयांची लोंकर आणि सूत ! शिवाय रात्रीं अप-रात्रीं बसून त्यावर केलेली मेहनत ! अशा त्या जिनसांची तो दुकानदार तीन रुपये किंमत देऊं लागला, हें पाहून विमला अगदीं चकित झाली. तिला कांहींच बोलतां येईना. ती तेथेंच विचार करीत उभी राहिली. तें पाहून तो दुकानदार म्हणाला, " अहो बाई. मी तीन रुपये देतों हे फारच झाले ! मारवाड्याकडे गेलांत तर तो ह्या जिनसावर एक रुपया देखील देणार नाहीं. पहा बुवा आपला विचार ! "

विमला कांहीं एक उत्तर न देतां मागें फिरली आणि दुकानांतून बाहेर पडली. [illegible] डोकें भणभणूं लागलें. ती घरून जिनसा घेऊन [illegible]घाली त्यावेळीं तिच्या डोक्यांत कोणते विचार होते आणि आतां कोणते विचार

येत होते ! आतां घरीं जाऊन जयेला काय सांगावें, हाच तिला मोठा बिकट प्रश्न पडला. बापुसाहेबांकडून एक कवडीही घ्यावयाची नाहीं असा तर तिनें ठाम निश्चय केला होता. परंतु आतां पुढें काय करावें ? ह्या विचारांत ती खालीं पहात झप् झप् चालली होती. त्यावेळीं आठाचा सुमार झाला होता. सर्व रस्त्यांत काळोख पडला होता. दुकानें बहुतेक बंद झालीं होतीं. विमल रस्त्याच्या कडेनें जात होती. इतक्यांत 'अग—ए—× × !' असें एका गलिच्छ नांवानें संबोधून दोन मनुष्यें पुढें आलीं. विमलेनें बाजूला वळून पाहिलें तों पलीकडे एक दारूचा गुत्ता होता. आणि तेथें असणाऱ्या हलकट मंडळींतील ते दोघेजण आहेत, असें तिच्या लक्षांत आलें. विमलेनें त्यांच्याकडे दुर्लक्ष करून ती बाजूनें जाऊं लागली. तेव्हां त्यापैकीं एकानें चटकन् पुढें होऊन तिचा हात धरला. त्याबरोबर तिनें मोठ्यानें किंकाळी फोडली.

"बोंब कशाला मारतेस × × !—आणि हें काय ?—पळून जातेस काय × × !" तिच्या हातांतील बोचकें हिसकावून घेऊन तो मनुष्य तिच्याशीं लगट करीत म्हणाला. तितक्या अवधींत विमलेनें दोन चार किंकाळ्या फोडल्या. गुत्यांतील बरीच मंडळीं तेथें गोळा झाली. तेव्हां तो मनुष्य म्हणाला, "ही माझी बायको—× × कपडे घेऊन माझ्या नकळत पळून जात होती पण कशी अचुक सांपडली ?" इतक्यांत काय दंगा आहे ?—कोण बोंब मारतोय ?' अशी चौकशी करीत एक व्यक्ति गुत्याच्या बाजूला असलेल्या दरवाजांतून बाहेर आली. तिला पाहतांच 'मास्तर आले—मास्तर आले ! असें म्हणून तेथें जमलेली मंडळी दूर झाली. तेव्हां त्यापैकीं एकाला त्या मास्तरानें 'काय दंगा आहे ?' असें विचारलें.

"त्यो गनबा नव्ह का ? त्येची आवा पलुनशानी जात व्हती बगा मास्तर त्या मनुष्याचें हें उत्तर ऐकत असतांना त्या व्यक्तीचें लक्ष विमलेकडे गेलें. त्याबरोबर आश्चर्यानें ती व्यक्ति एकदम म्हणाली, "अरे—ही तर विमला !"

"अहो मनोहरराव, मला सोडवाहो ह्या चांडाळांच्या हातून—"

तो मनोहर मिसाळ होता. तो दारूचा गुत्ता त्याच्या डेपोंतीलच होता. त्याच कंपौंडमध्यें तो रहात असे. त्यावेळीं त्याचें नुकतेंच जेवण होऊन तो थोडावेळ शतपावली करण्याच्या उद्देशानें कंपौंडमध्यें आला होता. इतक्यांत रस्त्यावरील दंगा आणि विमलेनें मारलेल्या किंकाळ्या त्याला ऐकूं गेल्या. असो, ती विमला आहे असें पाहून मनोहरानें पुढें होऊन प्रथम गणबाच्या कमरेंत

एक जोरानें लाथ हाणली. तितक्या अवकाशांत त्याच्या बरोबर असलेल्या दुसऱ्या मनुष्यानें त्याच्या हातांतील गाठोडें हिसकावून घेऊन तेथून पलायन केलें.

" सुव्वर, ही तुझी आई आणि तिला तूं बायको म्हणतोस मादरचोद !—" असें म्हणून मनोहरानें गणबाला आणखी एक लाथ हाणली. हा प्रकार पाहतांच इतर मंडळींनीं मुकाट्यानें तेथून पाय काढला.

" विमला, तूं इतक्या रात्रीं येथें कशी आलीस ? " असें पुढें होऊन मनोहरानें विचारलें; परंतु विमलेनें उत्तराऐवजीं आपल्या दोन्ही हातांनीं तोंड झांकून स्फुंदण्यास सुरवात केली. ती ह्या अकल्पित प्रसंगामुळें अगदीं घाबरून गेली होती. " विमला, तूं आतां घाबरूं नकोस. तुला आतां कशाचीही भीति नाहीं. चल—प्रथम माझ्या घरीं चल. माझें घर येथें हें जवळच आहे. तेथें थोडी बैस आणि मग मी तुला स्वतः घरीं पोंचवितों. चल—"

" नको. मला आतां घरींच जाऊं द्या. घरीं जया वाट पहात असेल. " डोळे पुसून विमलेनें उत्तर दिलें.

" आतां नाहीं म्हणूं नकोस. हें माझं घर अगदीं जवळ आहे. थोडा चहा घे आणि मग आपण जाऊं. मीं तुला फार वेळ खोळंबून ठेवीत नाहीं चल—"

" नाहीं नाहीं. मनोहरराव, मला घरीं गेलं पाहिजे. तुमचे मात्र मजवर आतां अगणित उपकार—"

" त्या उपकाराच्या गोष्टी मागाहून ! पण तूं माझ्या घरीं यावेंस अशी माझी इच्छा आहे. नाहीं म्हणूं नकोस विमले ! "

" नका—नका मला उगाच आग्रह करूं नका ! मी आज कोणत्या संकटांत आहे यासी तुम्हांला काय कल्पना ? "

" आणखी कांहीं संकट आहे कीं काय ? सांग—सांग—विमले एवढ्याच-करितां मी तुझी विनवणी करतों. पण तूं अगदीं कठोर मन केलं आहेस. मी तुला आतां जास्त काय सांगूं ? विमले, मी आतां कांहीं बोललों तर तूं म्हणशील कीं, मी ह्या उपकाराचा आतां फायदा घेत आहें. पण तसं बिल-कुल नाहीं. माझं मन तुझ्यासाठीं रात्रंदिवस तळमळत आहे. असा एक क्षणहि जात नाहीं कीं, मला तुझी आठवण होत नाहीं. पण तुला सांगून काय उपयोग !—मग नाहीं ना तूं येत ?—बरं तुझी मर्जी. पण जरा थांब. मी

इतक्यांत कोट टोपी घालून येतों.—" असें म्हणून तो घाईनें आपल्या घरीं गेला व त्याच पावलीं अंगांत कोट चढवीत बाहेर आला. वाटेंत त्यानें विमलेला जास्त कांहीं न विचारतां फक्त इतक्या रात्रीं घराबाहेर पडण्याचें कारण मात्र विचारलें. परंतु आपण कशाकरितां आलों होतों हें सांगण्याचें जिवावर येऊन विमलेनें तो सर्व प्रकार संदिग्ध ठेवून 'मी बाजारांतून कांहीं जिन्नस आणण्याकरितां आलें होतें' असें उत्तर दिलें.

विमला इतकी हातांत आली असतां मनोहरानें इतकी साधुवृत्ति कशी धरली याचें वाचकांना आश्चर्य वाटेल. वास्तविक तो वेळ असा होता कीं, त्यानें विमलेला थोडा जास्त आग्रह केला असता म्हणजे तिला त्याच्या घरीं जाण्याचें नाकारतां आलें नसतें. परंतु मनोहर मोठा पाताळयंत्री होता. त्यानें तात्काळ पुढलें धोरण बांधून त्यावेळीं तसें वर्तन केलें. आणि त्याच्या त्या वर्तनाचा विमलेच्याहि मनावर थोडा बहुत परिणाम झाला. मनोहरनें तिला जेव्हां प्रथम घरीं चल असें म्हटलें, तेव्हां तर तिची नुकत्याच अनुभविलेल्या प्रसंगाच्या भीतीपेक्षां जास्त भीतीनें गाळण उडाली. आतां हा आपणास उपकाराच्या पेंचांत पकडून घरीं नेईल आणि तेथें आपली विटंबना करील असें तिला प्रथम वाटलें. परंतु तसा प्रकार न होतां सर्व गोष्टी सरळ घडत आहेत हें पाहून तिला त्यांतल्या त्यांत समाधान झालें.

विमला घरीं आली, त्यावेळीं नऊ वाजून गेले होते. जया बाहेर बसून तिची वाटच पहात होती. विमला आलेली पाहून तिनें काय आणलें आहे, हें ती मोठ्या उत्सुकतेनें पाहूं लागली. परंतु विमलेजवळ काय होतें ? तिचें स्वतःचेंच गाठोडें त्या हलकट लोकांनीं लांबविलें होतें. परंतु ही गोष्ट जयेला काय माहित ? तिनें स्वाभाविक विमलेला वेळ कां लागला आणि बाजारांतून काय घेऊन आलीस, असा एकच प्रश्न केला. परंतु त्याबरोबर विमलेला आपल्या गाठोड्याची आठवण झाली. ती एकदम म्हणाली, "अररे ! माझं सामानाचं गाठोडं गेलं ! त्या मेल्या चांडाळांनीं तें माझ्या हातून हिसकावून घेतलं !—पण आतां काय गेलं तें !" असें म्हणून ती आपल्या खोलींत गेली. मनोहर अद्यापि बाहेरच होता. त्यानें क्षणभरानें जयेजवळ चौकशी करण्यास सुरवात केली. तेव्हां त्या दिवशीं बापुसाहेबांच्या घरीं काय काय प्रकार झाला तो तिनें भाबड्या मनानें त्याला सांगितला. शिवाय विमला शिकवण्या मिळविण्याकरितां गेली असतांना तेथें काय झालें तें सांगून दुसऱ्या

दिवशीं घरांत धान्य नसल्यामुळें ती बाजारांत कशाकारितां गेली होती तींहि सांगितलें. मनोहरानें सर्व गोष्टी मुकाट्यानें ऐकून घेतल्या. आणि थोडावेळ विचार करून तो जयेला म्हणाला, "म्हातारे, आतां तू विमलेला त्रास देऊं नकोस किंवा तिला कांहीं विचारूं नकोस. आतां बाजारांत तिला कांहीं पाजी लोकांनीं अडविलें होतें. त्यामुळें ती अगदीं घाबरून गेली आहे. दैवयोगानें मी तेथें जवळ होतों म्हणून बरें झालें—पण आतां तुम्हाला बाजारांतून काय काय आणलें पाहिजे तें मला सांग ?"

म्हाताऱ्या जयेनें तांदुळ, डाळ बाजरी मसाला अशीं चार सहा जिन-सांचीं पटापट नावें घेतलीं. तेव्हां मनोहर जास्त कांहींएक न बोलतां तेथून निघाला. परंतु जातांना त्याच्या चर्येवर हास्य दिसूं लागलें. तो रस्त्यानें जात असतां स्वगत म्हणाला, 'हें फार चांगलं झालं! मीं तिला त्या दारूबाज संतोबाच्या घरून मोठ्या युक्तीनें काढलं तेव्हां ती माझ्या हातांत येईल असं मला वाटलं होतं; ' परंतु तेव्हां तिनें मला दाद दिली नाहीं. पण आतां मात्र माझ्या मनासारखं घडून येईल अशी खात्री वाटूं लागली आहे. येईल—हळुहळूं माझ्याच हातांत येईल. आतां घाई करून उपयोग नाहीं. खरोखरीच प्रेमानें मी वेडा झालों आहें अशी नक्कल करून तिचा ग्रह बदलून घेतला पाहिजे. आणि त्याबरोबरच तिला उपकारबद्ध करून ठेविलें पाहिजिजे. अशी जोडगोळी सोडल्यावर मग पहातों कशी वश होत नाहीं ती !'

मनोहरानें तितक्या रात्रीं बाजारांतून जयेनें सांगितलेलें धान्य विकत घेतलें आणि आपल्या डेपोंतील हमालाबरोबर तें विमलेकडे आणलें. म्हातारीनें तें धान्य घेतलें. विमला आपल्या खोलींतच शून्य मानानें विचार करीत बसली होती. बाहेर मनोहर पुनः आला हें देखील तिला कळलें नाहीं. आणि मनोहरानेंहि तिची चौकशी केली नाहीं. फक्त धान्य दिल्यावर 'मी उद्यां सकाळीं येईन' एवढेंच म्हातारीला सांगून तो निघून गेला.



## २२ वचन दिलें

जग दुष्ट आहे, असें म्हणतात. परंतु, अनुभवाशिवाय त्याची खात्री पटत नाहीं. मनुष्यावर प्रसंग पडल्याशिवाय त्याला जगाची ओळख होत

नाहीं. आणि ओळख झाल्याशिवाय अनुभव येत नाहीं. आमच्या कथा-नायिकेला नुकतीच जगाची ओळख होण्यास सुरवात झाली होती. आदल्या दिवशीं रात्रीं बाजारांतून परत येत असतां वाटेंत तिच्यावर प्रसंग आला आणि त्या प्रसंगांतून मनोहरानें तिला सोडविलें. नंतर त्यानें आपल्या मनोदयाच्या पूर्ततेकरितां जयेला विचारून आणि विमलेला न कळतां धान्य आणून दिलें. आणि पुनः रात्रीं विमलेची भेट न घेतां तो निघून गेला. विमला सकाळीं उठली त्यावेळीं तिची चर्या उतरलेली दिसली त्यावरून रात्रीं तिला झोंप लागली नसावी असें दिसत होतें. ती खोलींतून बाहेर आली तेव्हां जया आदल्या दिवशीं रात्रीं मनोहरानें आणलेली बाजरी दळण्याच्या विचारांत होती. तिला जात्याजवळ बसलेली पाहून विमलेनें ' काय करतेस ' म्हणून तिला विचारलें. म्हातारी रात्रींचा वृत्तांत सांगत असतां दरवाजा उघडून संतोबा आंत आले. विमलेनें त्यांना मोठ्या आदरानें बसावयास सांगितलें. नंतर थोडा वेळ इतर गोष्टी झाल्यावर संतोबा म्हणाले, " विमला, तूं परवां स्वतः बापूसाहेबांकडे गेली होतीस असें कळलें. "

" होय. पण मला ज्या गोष्टी त्यांच्याकडून कळतील अशी आशा होती; त्या गोष्टी मात्र कळल्या नाहींत. "

" त्यांना माहित नाहींत त्या गोष्टी जर तूं त्यांना विचारल्यास तर ते तरी काय सांगतील ? "

" त्यांना सर्व माहित आहे. पण त्या गोष्टी मला कळूं नयेत अशी त्यांची इच्छा आहे. मीं नाना रीतीनें त्यांचीं आर्जवें केलीं; परंतु त्यांना माझी करुणा आली नाहीं. त्यांना माझ्या आईबापाविषयीं चांगली माहिती आहे. पण ते सांगत नाहींत. आणि आतां मला तें कळण्याची इच्छाहि नाहीं. "

" बरं आतां पुढें काय ? तूं तर मोठ्या रागानें त्यांचा निरोप घेऊन तेथून आलीस. "

" त्यांच्यावर मीं कां रागवावें ? त्यांना माझ्याविषयीं ज्या गोष्टी माहित आहेत त्या जर त्यांनीं मला सांगितल्या असत्या तर माझ्या आयुष्याचें सर्व रहस्य उलगडलें असतें. "

संतोबांनीं बराच वेळ उत्तर दिलें नाहीं. ते कांहीं बोलत नाहींत असें पाहून त्यांना येण्याचें कारण विचारावें असें विमलेला वाटूं लागलें. इतक्यांत त्यानींच खिशांत हात घातला आणि दहा रुपयांची नोट काढून ती विमलेच्या

पुढें केली. परंतु ती घेण्याकरितां विमला आपला हात पुढें करीना. तेव्हां संतोबा म्हणाले, " विमला, हे तुझ्या खर्चाकरितां रुपये. "

" बाबा, मी आतां ह्या रुपयांना स्पर्शही करणार नाहीं. इतके दिवस माझा असा समज होता कीं, तुम्ही केवळ भूतदयेनें प्रेरित होऊन माझा सांभाळ करतां; पण मला आतां ज्या गोष्टी कळल्या त्यावरून मी मनाचा अगदीं ठाम निश्चय केला आहे. आजपर्यंत तुम्ही माझ्यावर अगणित उपकार केले आहेत. त्यांतून मी केव्हांच मुक्त होणार नाहीं. परंतु आतां आपण जे हे रुपये मला देत आहांत ते बापूसाहेबांकडून आले आहेत. आणि मीं तर असा निश्चय केला आहे कीं ह्यापुढें बापूसाहेबांकडून मी एक पैहि घेणार नाही. "

" मग तुझा चरितार्थ कसा चालणार ? "

" मी ह्यापुढें अंगमेहनत करून माझा चरितार्थ चालवीन; परंतु बापुसाहेबांकडून मिळणाऱ्या पैशावर मेलेलें अन्न खाण्याची माझी इच्छा नाहीं. त्यांच्या पैशावर मला विद्या मिळाली तीच पुष्कळ आहे. "

" मग तूं पुढें काय करणार ? तूं ह्यापुढें नगरांत रहाणार नाहींस असें मला बापूसाहेब म्हणत होते. "

" अद्यापि त्याबद्दल माझा पक्का विचार झाला नाहीं. तरी ह्या आठ पंधरा दिवसांत मला जो लोकांकडून त्रास होत आहे, त्यामुळें मला लवकरच नगर सोडण्याचा विचार करावा लागेल. बाबा, तुम्ही मजवर आजपर्यंत जशी माया ठेवली तशीच शेवटपर्यंत कायम ठेवा. " असें बोलत असतां विमलेच्या डोळ्यांतून अश्रुप्रवाह सुरू झाला. संतोबांनीं तिची समजूत करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु विमलेच्या दुःखी मनाला आळा पडला नाहीं. शेवटीं कशीबशी तिची समजूत करून संतोबा आपल्या घरीं गेले. त्यांच्या मागून कांहीं वेळानें मनोहराची स्वारी आली. त्यानें विमलेच्या मुखाकडे पहातांच ती रडत असावी असा सहज तर्क केला आणि आपल्या नाटकी वेषाला सुरुवात केली. तो म्हणाला, " विमला, तुला अशी दुःखी पाहून माझ्या अंतःकरणांत कशी कालवाकालव चालली आहे, त्याची तुला कल्पनाहि होणार नाहीं. तुला सुखी होण्याचा हक्क असतांना तू अशी दुःखी कां रहावेंस ? आतां तुझ्यासाठीं मी काय करूं तें मला सांग ? आजपासून तुझे दुःखाचे दिवस संपले असें समज. आणि मनांत कांहीं एक न ठेवतां तुझें

जें कांहीं काम असेल तें मला सांग. मी तुझ्या कामाकरितां रक्ताचें पाणी करीन. मी तुझ्या—"

"मनोहरराव, काल रात्रीं तुमचे मजवर पुष्कळ उपकार झाले आहेत. आणखी तुमचे उपकार शिरावर चढवून घ्यावेत अशी माझी इच्छा नाहीं. शिवाय रात्रीं तुम्ही जयेच्या सांगण्यावरून कांहीं धान्यही आणून दिलें. त्याचे पैसे मी तुम्हाला—"

"अगदीं बोलूं नकोस! विमला, कालच्या गोष्टींचा तूं आतां उच्चारही करूं नकोस. मी तुझ्यावर उपकारबिपकार कांहीं सुद्धां केले नाहींत. आणि पुनः असं बोलू लागशील तर मीं येथून उठून जाईन. आतां फक्त मी काय करूं तें मला सांग. मला तुझ्या तोंडांतून फक्त आज्ञा ऐकण्याची माझी इच्छा आहे. बोल—मी तुझ्या करितां काय करूं!—कां बरं असा संकोच धरतेस? तुझ्या-करितां मी वाटेल तें करीन. बोल—"

विमला कांहींच बोलेना. आजपर्यंत तिनें मनोहरला 'जा—मला त्रास देऊं नकोस!' अशा अर्थानें पुष्कळ वेळां सांगितलें होतें. परंतु आतां मात्र तिला तसें तोडून बोलवेना. आतां ती त्याची मिंधी होती. त्यानें आणून दिलेल्या धान्याचे पैसे देऊन आपण त्याच्या उपकारांतून मोकळें व्हावें असें तिला वाटत होतें. परंतु पैसे देणार कोठून? संतोबा देत होते ते पैसेहि तिनें अभिमानाला पेटून घेतले नाहींत. नाहींतर त्या रुपयांचा आतां तिला उपयोग करतां आला असता. तिनें अभिमानाच्या इरेस पडून बापुसाहेबांच्या उपका-रांतून स्वतःची सुटका करून घेतली तो इकडे मनोहरच्या उपकारांत ती येऊन अडकली. तिची अगदीं भांबावल्यासारखी स्थिति झाली. मनोहर पुष्कळ वेळ तिच्याजवळ बसला होता. तोंपयत तिला त्याच्याजवळून उठतां येईना किंवा त्याला 'जा' म्हणूनहि सांगतां येईना. शेवटीं डेपोंत जाण्याची वेळ भरत आल्यामुळें त्याला उठावेंच लागलें. तो गेल्यावर विमलेनें आपला नित्यक्रम आटोपला. तिच्या डोक्यांत अनेक विचार चालू होते. आतां पुढें काय करावें, हेंच तिला सुचेना. संध्याकाळपर्यंत विचार करकरून तिची अगदीं भ्रमिष्ट होण्यापर्यंत स्थिति झाली. संध्याकाळीं तिला एक विचार सुचला. आपण मिशनच्या बाईला जाऊन भेटावें म्हणजे एक दोन शिकवण्या मिळवून देण्यांत ती आपणास खात्रीनें मदत करील असें तिला वाटूं लागलें. त्या विचारांत ती कपडे घालून तयार झाली. परंतु घराबाहेर पडण्यास तिला

धैर्य होईना. आदल्या दिवसाच्या प्रसंगानें तिला पक्की दहशत बसली. ती दरवाजाजवळ बराच वेळ विचार करीत उभी राहिली. इतक्यांत बापुसाहेबांची गाडी येऊन दरवाजाजवळ उभी राहिली. आज एकटाच नरसिंगराव गाडींत होता. नरसिंगराव दृष्टीस पडतांच क्षणभर तिचें मन विचाररहित होऊन एक प्रकारचा तिला अननुभूत आनंद झाला. विचारांच्या असह्य ओझ्यानें तिचें मन दडपून गेलें होतें, तें आतां हलकें होऊं लागलें. आपल्या मनाची अशी स्थिति कां झाली, याबद्दल तिला निराळा विचार करण्याची जरूरीच नव्हती. नरसिंगरावाच्या केवळ दर्शनानें आपणास इतका आनंद होत आहे, हें तिला समजलें नाहीं असें नाहीं. परंतु इतकें समजूनहि ती आपल्या सर्व सुखावर पाणी सोडण्यास तयार झाली होती. तिनें बापुसाहेबांजवळ म्हटल्याप्रमाणें तिच्या प्रेमाचा दर्जा फार उच्च प्रतीचा होता. विमलेच्या जागीं जर दुसरी एखादी मुलगी असती तर तिनें इतका खोल विचार करून स्वतःला दुःखी करून घेतलें असतें किंवा नाहीं, हा प्रश्न आहे.

" काल मी आलों होतों परंतु तुझी भेट झाली नाहीं. तूं बाहेर गेली होतीस—गाडींतून उतरल्यावर नरसिंगराव म्हणाला. " म्हणून मी आज मुद्दाम लवकर आलों. आज कमलाहि बरोबर नाहीं; तेव्हां आतां आपणाला स्वस्थ चित्तानें बोलत बसायला कांहीं हरकत नाहीं. " हळुहळू काठी टेकीत नरसिंगराव आंत आला. तेव्हां विमलेनें विचारलें, " आज कमलाबाई कां नाहीं तुमच्याबरोबर आल्या ? "

" आज तिला येतां आलें नाहीं. पण विमला, तूं काल कुठें गेली होतीस ? मी येथें आल्यावर तूं घरांत नाहींस असें कळल्यानें माझी किती तरी निराशा झाली ! "

" आतां घरांत बसून माझं कसं चालेल ? मला आतां कांहीं तरी पोटाचा उद्योग केलाच पाहिजे. आतां मीं मिशनमध्येंच जाण्याकरितां निघालें होतें. परंतु, इतक्यांत तुम्ही आलांत. "

" मिशन्‌मध्यें !—कशाला ? छे ! विमला, तूं आतां पुनः मिशन्‌मध्यें जाऊं नयेस अशी माझी इच्छा आहे. "

" माझीहि तशीच इच्छा आहे. पण काय करणार ? शंकराचार्यांनीं मला बहिष्कार घातल्यामुळें माझी सांवली सुद्धां घेण्यास कोणी तयार नाहीं. अशा स्थितींत मी तरी काय करावें ? कालच्या एका दिवसांत मी किती तरी

प्रयत्न केले. परंतु शेवटीं मला आज हा असा विचार करावा लागला. काल माझ्यावर कोणकोणता प्रसंग आला आणि मला कसकसा अनुभव आला ती सर्व हकीकत तुम्हाला कळली तर तुम्हीहि मला मिशनमध्येंच जा असें सांगाल. ''

" काल काय काय झालं तें तरी मला कळूं दे. "

विमलेनें आधल्या दिवसाची सर्व हकीकत क्रमवार नरसिंगरावाला सांगितली. तेव्हां तो म्हणाला, " विमला, त्या मनोहरानें काल धान्य आणलें, त्याबद्दल त्याचे जे कांहीं पैसे झाले असतील ते त्याला पोंचते कर आणि तूं हा मिशनमध्यें जाण्याचा केलेला विचार मनांतून घालवून दे. मी तुला पैसे पाठवून—" इतकें बोलून नरसिंगराव अडखळला. ' देतों ' हा एकच शब्द उच्चारतांना स्वतःची स्थिति त्याच्यापुढें एकदम चित्रासारखी उभी राहिली. आज त्याला दोन पैसे पाहिजे असले तरी ते त्यानें बापुसाहेबांजवळ मागितल्याशिवाय त्याला गत्यंतर नव्हतें.

" तुम्हीं पैसे देणार म्हणजे बापूसाहेबांकडून मागूनच देणार ना ? मग मजला ते नको ! मीं बापुसाहेबांकडून येणाऱ्या पैशांना न शिवण्याचा निश्चय केला आहे. आणि एवढ्याचकरितां मी मिशनमध्यें जाऊन बाईंना विचारणार आहें. "

" नाहीं. विमला, मी तुला मिशनमध्यें जाऊं देणार नाहीं. तुला बापुसाहेबांच्या पैशाचा वीट आला आहे तर मलाहि त्यांच्याकडून मिळणाऱ्या संपत्तीची जरूर नाहीं. चल—तूं आणि मी असेंच निष्कांचन स्थितींत बाहेर पडूं मला तुझ्यापुढें माझी सर्व इस्टेट तृणवत् आहे. "

" पण असं कां ? तुमची इस्टेट हक्काची आहे माझ्याकरितां तुम्ही असा व्यर्थ त्रागा कां करतां ? हा केवळ इस्टेटीचा प्रश्न असता तर कदाचित् मी ' हो ' म्हटलं असतं. परंतु माझ्यामुळें तुमच्यावर किती तरी दुःखाचे डोंगर कोसळतील. पण तें कांहीं असो. तुम्ही माझा नाद सोडावा हेंच चांगलं ! तुम्हीं बापुसाहेबांच्या इच्छेप्रमाणें त्यांच्या कमलाबाईबरोबर विवाह करून आनंदानं रहावं यांतच मी सुख मानून राहीन. आपल्या निर्मल नांवाला माझ्यामुळें थोडासाहि कलंक लागलेला मला खपणार नाहीं. मी आतां मिशनमध्यें जातें त्याचें कारण केवळ बाईकडून शिकविण्या मिळण्याच्या उद्देशानें जातें. आतां मी धर्मांतर करीन अशी तुम्हाला भीति बाळगण्याचें कारण नाहीं.

मला शंकराचार्यांनीं बहिष्कार घातला तरी मी मनानें हिंदूच आहें, आणि मरेपर्यंत हिंदूच राहीन. तुम्ही माझ्याविषयीं कांहीं काळजी करूं नका. मी दुर्दैवी, जन्मापासून दुःखी आहें आणि मरेपर्यंत दुःखीच राहणार. मग तुम्ही तरी आपल्या सुखांतला जीव दुःखांत घालून माझ्यासाठीं कां उगाच दुःखी होतां ? तुम्ही दुःखी झालेले पाहून मी सध्यां आहें त्यापेक्षां सहस्रपटीनें जास्त दुःखी होईन. ”

“ विमला, तुझ्यामुळें मला कमीपणा येईल असें जें तुला वाटतें तें कां ? माझें तुझ्यावर प्रेम नाहीं का ?”

“ असं मी केव्हांही म्हणणार नाहीं. आपणांतील परस्परांच्या प्रेमाविषयीं स्वप्नांत देखील शंका घ्यावयास नको. परंतु मी जी कांहीं निराशावादी बनलें आहें याचें कारण मला शंकराचार्यांनीं जातिबहिष्कार घातला आहे म्हणून ! माझ्यामुळें तुम्हालाही जातिबहिष्कारकृत व्हावें लागेल. हा माझ्यामुळें तुमच्या निर्मल नांवाला लागणारा बट्टा मला कसा सहन व्हावा ? ”

“ एकूण ही एकच अडचण आहे ना ?—ठीक आहे. मी शंकराचार्यांना एक अर्ज पाठवलाच आहे. आतां दुसरा अर्ज पाठवतों. वास्तविक इतक्या दिवसांत मला त्यांचें उत्तर यावयास पाहिजे होतें. पण कांहीं हरकत नाहीं. मी आतां ह्याच उद्योगाला लागतों. शंकराचार्यांच्या दुसऱ्या मठाकडे एक अर्ज करतों आणि तुझ्या बाबतींत किती अन्याय होत आहे, हें त्यांच्याही नजरेस आणतों. ”

याप्रमाणें त्यांच्या पुष्कळ वेळ गोष्टी झाल्या परंतु त्या सर्वांतून जर कांहीं सार निघालें असेल तर तें ‘ तुम्ही माझा नाद सोडून बापुसाहेबांच्या इच्छेप्रमाणें त्यांच्या मुलीबरोबर लग्न करून सुखी व्हा ’ असेंच निघालें. नरसिंगरावाला अतिशय वाईट वाटूं लागलें. त्याची निराशा होऊं लागली. परंतु त्याच्या संगतींत विमलेनें ते तास दोन तास सुखांत घालविले. तितका वेळ तिच्या मनाला बराच उल्हास वाटूं लागला. आपण करतों हेंच योग्य आहे असें तिचें सात्विक प्रेम तिला सांगत होतें. त्यामुळें तिला नरसिंगरावाची प्रेमनिराशा करण्याबद्दल वाईट वाटण्याचें कारण नव्हतें. तो निघून गेल्यावर तिनें पुनः त्याच्या भाषणावर पुष्कळ विचार केला. तरीही तिला आपण करतों तेंच बरोबर आहे असें वाटूं लागलें. रात्रीं ती आपल्या बिछान्यावर पडून इतर गोष्टींचा विचार करीत असतां तिला मनोहराची आठवण झाली.

त्याच्याविषयीं पहिल्यापासून तिच्या मनांत तिट्कारा उत्पन्न झाला होता. तो तिला भेटण्याकरितां आला म्हणजे तिला एकप्रकारची भीति वाटत असे. तो चांगल्या वर्तनाचा आणि स्वभावाचा मनुष्य नाहीं असा तिचा पहिल्यापासून ग्रह झाला होता. परंतु आतां तिच्या मनांत त्याच्याविषयीं विचार येतांच पूर्वग्रह बदलण्यास सुरवात झाली. आपण त्याचा तिट्कारा करतों तो कां? असा तिनें प्रथम मनाला प्रश्न केला. परंतु त्याचें उत्तर तिला मिळेना. त्यानें आपणाजवळ लग्नाची गोष्ट काढिली, यांत त्याचा कांहींच दोष नसून त्यांच्या—ख्रिश्चन लोकांच्या चालीरीती—प्रमाणें उपवर मुलीला लग्नाची संमति विचारणें कोणत्याही प्रकारें गैर नाहीं हें तिला चांगलें माहित होतें. मग त्यानें आपणास लग्नाची संमति विचारिली यांत कांहींसुद्धां तिला गैर दिसेना. चांगली वस्तु दृष्टीस पडतांच तिच्याविषयीं मनांत सहजच प्रेम उत्पन्न व्हावयाचें, त्याचप्रमाणें त्यानें आपणावर प्रेम करणें साहजिकच आहे. अशा रीतीनें तिच्या मनाची समजूत पटतांच त्याच्याविषयीं भीति वाटत होती ती जाऊन उलट रात्रीं त्यानें आपलें भीतीपासून रक्षण केलें म्हणून तिला त्याच्याबद्दल आदर वाटूं लागला. शिवाय रात्रीं त्यानें धान्य आणून देऊन आपणास उपकारबद्ध केलें त्यावरून व त्याच्या एकंदर वर्तनावरून तो चांगल्या स्वभावाचा आहे असें आतां तिला वाटूं लागलें. याप्रमाणें जवळ जवळ दोन तास ती मनोहराविषयीं विचार करीत होती. तितक्या अवधींत त्याच्याबद्दल तिचा पूर्वीचा झालेला वाईट ग्रह आतां पूर्ण पालटला तरी तो जी गोष्ट तिला प्रथमपासून विचारीत होता त्या गोष्टीला मात्र तिचें मन संमति देईना. तो आपणावर प्रेम करतो हें त्याच्या भाषणावरून तिला कळलें होतें. तो आपणाकरितां वाटेल तें करण्यास तयार आहे असेंही तिला वाटत होतें. परंतु तिचें प्रेम त्याच्यावर कुठें होतें? तिच्या सर्व प्रेमाचा खजिना नरसिगरावानें आपल्या ताब्यांत ठेविला होता. आतां तिच्याजवळ प्रेमच राहिलें नव्हतें. अशा रीतीनें विचार करतां करतां तिला झोंप लागली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठतांच तिनें आपला प्रातर्विधी आटोपून मिशनमध्यें जाण्याची तयारी केली. रात्रीं मनोहर आला नाहीं तो आतां येईल असें वाटून त्याला टाळण्याकरितां ती घरांतून लवकरच बाहेर पडली. तरी वाटेंत त्याची भेट झालीच. सायंकाळीं नरसिंगराव येत असतो असें कळल्यापासून विमलेला भेटण्याकरितां सकाळचाच वेळ चांगला असें त्यानें

ठरविलें होतें. आणि त्याप्रमाणें आतां तो सकाळींच येत असे. आतां त्याला नरसिंगरावाची भिती बाळगण्याचें कारण उरलें नव्हतें. कारण बापुसाहेबांकडे काय काय गोष्टी झाल्या त्या सर्व त्याला संतोबाकडून कळल्या होत्या. संतोबाला त्यानें आपल्या डेपोंत नेऊन दोनचारदां दारू पाजली खरी, परंतु त्याचा त्याला चांगलाच उपयोग होऊं लागला. जवळ जवळ आतां संतोबा त्याचा हस्तकच बनला होता. आपल्या मुलीबरोबर लग्न करावें म्हणून बापुसाहेबांनीं नरसिंगरावाला कसें पेचांत पकडलें आहे, हें मनोहराला कळल्यापासून विमला आपलीच झाली असें त्याला खात्रीनें वाटूं लागलें होतें. परंतु त्यानें विमलेजवळ नरसिंगरावाच्या विरुद्ध एकही शब्द उच्चारावयाचा नाहीं असा निश्चय केला होता. ती आपल्या पूर्णपणें हातांत आल्यावर मग तिला नरसिंगरावाच्या प्रेमाची ओळख द्यावयाची. तोपर्यंत कांहीं बोलावयाचें नाहीं अशा निश्चयानेंच तो वागत होता. आतां त्याला विमला वाटेंत भेटतांच ‘ तूं कुठें जात आहेस ? ’ असें विचारून तो तिच्या बरोबर मिशनमध्यें निघाला. तो बरोबर असल्यामुळें विमलेला संकोच वाटूं लागला; परंतु त्याला आपणाबरोबर येऊं नको असें म्हणण्याचें तिला धैर्य होईना. मिशनमध्यें जावयास आल्यावर विमलेबरोबर त्याला पाहून बाईंना देखील आश्चर्य वाटलें. कारण विमला आपणास मिळावी म्हणून त्याचे प्रयत्न चालू आहेत हें मिशनमध्यें सर्वांना माहित होतें आणि विमलेनें त्याची मागणी नाकारली आहे ही गोष्ट देखील तेथें सर्वांना कळली होती. परंतु, इतक्या दिवसांनी विमला स्वतः होऊन मिशनमध्यें आली आणि ती देखील मनोहराबरोबर आली त्याअर्थी त्या दोघांचें एकमत झालें असावें असा बाईंनीं साहजिकच तर्क बांधला. आपल्या बरोबर विमला आहे तेव्हां बाईंचा व मिशनच्या इतर मंडळींचा तसाच समज व्हावा अशी मनोहराची देखील इच्छा होती. म्हणून तो मिशनच्या आवारांत शिरतांच तिच्या बरोबर अगदीं खेटून आणि मोकळेपणानें चालूं लागला. विमलेच्या तें लक्षांत येऊन तिनें आंत येतांच ‘ मनोहरराव, तुम्ही आतां जा. मला बाईबरोबर कांहीं बोलावयाचें आहे ’ असें म्हणून झपूझप् जिना चढण्यास आरंभ केला. ती आंत येतांच मिशनरी बाईनें हास्यमुद्रा करून तिला बसावयास सांगितलें आणि येण्याचें करण विचारलें. तेव्हां थोडक्यांत विमलेनें आपली हकिगत सांगून म्हटलें, “ आतां ह्यापुढें येथें रहाण्याची माझी इच्छा नाहीं. मी स्वतःच्या

चरितार्थाकरितां येथें करावयाची तितकी खटपट केली परंतु त्यांत मला यश आलें नाहीं. तेव्हां येथून पुण्यास जावें आणि तेथेंच कांहीं तरी उद्योग करून रहावें असा मी निश्चय केला आहे. पुण्यांत माझी कोणाचीही ओळख नाहीं. आपण माझी कांहींतरी व्यवस्था कराल अशा उमेदीनेंच मी आपणाकडे आलें आहे. शिवाय मला कांहीं पैशांची जरूरी आहे. माझं पुण्यांत जुळतांच मी तत्काळ आपल्या पैशाची फेड करीन." विमलेचें भाषण ऐकून बराच वेळ बाईनीं उत्तर दिलें नाहीं.

"मनोहर तुला कांहीं मदत नाहीं कां करीत?" बऱ्याच वेळानें बाईनें विचारलें.

"त्यानें मला थोडी मदत केली आहे पण त्याच्या उपकारांत रहाण्याची माझी इच्छा नाहीं. मी आपणाकडे जे कांहीं पैसे मागतें ते तेवढ्याचकरितां. त्यांतून त्याची रक्कम देऊन थोडे पैसे मी जवळ ठेवणार आहें."

"पण तुझी आणि त्याची 'एंगेजमेंट' ( लग्नसंमति ) झाली नाहीं कां? तुम्ही आतां एकत्र येथें आलां त्यावरून मी तर तसेंच समजलें."

"नाहीं आणि लग्न न करण्याचा माझा अगदीं ठाम निश्चय झाला आहे."

"पण असं करण्यापेक्षां आणि इतक्या त्रासांत आणि हालांत रहाण्यापेक्षां तूं आतां बाप्तिस्माच कां घेत नाहींस बरें? मी ही तुझ्या हिताची गोष्ट सांगतें. पहा, आतां जर तूं बाप्तिस्मा घेशील तर तूं खरोखरीच फार सुखी आणि आनंदी होशील. मी तुला फसविलें किंवा यांत माझा कांहीं तरी मतलब आहे असें मात्र तूं समजूं नकोस."

"बाई, तुम्ही इतकें प्रेमानें सांगत आहांत पण मी धर्माच्या बाबतींत पूर्ण सुखी आहें. मला माझ्या धर्मांत कांहींच वाईट दिसत नाहीं किंवा त्यामुळें माझें कांहीं अडतहि नाहीं. पण मी धर्मांतर तरी कां करावें?"

"मग आतां तूं हे हाल आणि दुःख भोगीत आहेस याचें कारण काय?"

"याला कारण धर्म नाहीं. आमचा धर्म माझे हाल करीत नाहीं किंवा मला दुःख देत नाहीं. परंतु मूर्ख लोकांकडून हा सर्व प्रकार होत आहे. आतां ही गोष्ट आमच्याच धर्मांत आहे असें मात्र नाहीं. सर्वत्र हाच प्रकार दृष्टीस पडतो." विमलेचें हें उत्तर ऐकून धर्माच्या बाबतींत तिचा निश्चय अढळ आहे असें मिशनरी बाईला खात्रीपूर्वक वाटलें आणि तिनें शहाणपणानें विषय बदलला. ती म्हणाली "विमला, तूं पुण्याला जाण्याचें म्हण-

तेस पण तेथें सध्यां प्लेग सुरू झाला आहे. तेव्हां तूं तेथें जाऊं नयेस असें मला वाटतें. "

" बाई, आतां मी प्लेगला तरी कां भ्यावें ? मी सुखाकरितांच जर पुण्यास जात असतें तर गोष्ट वेगळी होती. "

" ठीक आहे. जशी तुझी मर्जी ! आतां मी स्वतः संध्याकाळीं तुझ्याकडे येईन आणि पुण्यास पंचहौदमिशनच्या बाईंना पत्र देईन आणि कांहीं पैसेही देईन. पण प्रथम मला साहेबांना विचारावें लागेल. " बाईंनीं आश्वासन देतांच विमलेला आनंद झाला.

संध्याकाळपर्यंत दिवस कसा निघून गेला हें विमलेला कळलें देखील नाहीं. पुण्यांत गेल्यानंतर काय करावयाचें हा एकच विचार तिच्या मनांत घोळत होता. आपण येथून गेल्यावर नरसिंगरावाला वाईट वाटेल हें ती जाणून होती परंतु त्याबद्दल मात्र तिला वाईट वाटलें नाहीं. आपणाकरितां आज जरी त्याला वाईट वाटलें तरी पुढें कमलाबाईबरोबर त्याचें लग्न होऊन तो सुखी होईल, हा विचार तिच्या मनांत येऊन आपण करतों तेंच बरोबर आहे, असें तिचें मन तिला सांगत होतें. अशा रीतीनें ती सर्व दुपार तिनें विचारांत घालविली तथापि तिला उल्हास वाटत होता. आतां सायंकाळ होतांच नरसिंगराव येईल तेव्हां आपण त्यास आपला पुण्याला जाण्याचा विचार कळवावा किंवा नाहीं याबद्दल तिला विचार पडला. एकदां तिला वाटे कीं आपण जाणार हें त्यांस कळवावें, तोंच पुनः तो विचार बदलून आपण कुठें जात आहोंत तें कोणालाच कळूं देऊं नये असेंहि तिला वाटे. असें तिचें मन दोन विचारांत हेलकावे खात असतां दरवाजाजवळ गाडी उभी राहिल्याचा तिला भास झाला. प्रथम तिनें त्याकडे लक्ष दिलें नाहीं. परंतु थोड्या वेळानें दरवाजा वाजतांच ती उठली. वास्तविक त्या वेळीं तिच्या घरीं कोणी येणार नव्हते. नरसिंगराव यावयाचा परंतु अजून त्याला यावयास पुष्कळ अवकाश होता. मग अशा वेळीं कोण आलें आहे हें पहाण्याकरितां ती उठून बाहेर येऊं लागली तों खोलीच्या दरवाजांत बापुसाहेब येऊन उभे राहिले. त्यांना पाहतांच तिला अत्यंत आश्चर्य वाटलें. बापुसाहेब आपण होऊन येतील असें तिला स्वप्नांतहि वाटलें नव्हतें. त्यांना ती जागच्या जागींच थबकली.

" विमला, मला पाहून तुला आश्चर्य वाटलें असेल परंतु मी कांहीं

महत्त्वाच्या कामाकरितां मुद्दाम आलों आहें." इतकें बोलून बापुसाहेब आंत शिरले आणि खुर्चीवर बसून पुढें म्हणाले, "बैस. तूं अशी गोंधळून जाऊं नकोस. मी आतां तुला जें कांहीं सांगणार आहे तें तुझ्या फायद्याचें आहे. परवा तूं मजकडे आली होतीस त्या वेळीं माझी मदत तूं नाकारली परंतु त्यावेळीं तूं रागांत असल्यामुळें आपण काय करीत आहोंत याचा तुला सुमार राहिला नाहीं. पण आतां मी आलों आहे तो केवळ तुझें कांहीं तरी कल्याण करावें याच उद्देशानें आलों आहें. तूं त्यां दिवशीं नगर सोडून जाण्याबद्दल बोलत होतीस त्याप्रमाणें तुझी तयारी असेल तर तूं आज रात्रींच येथून जावेंस हें चांगलें. मी तुला आता हे शंभर रुपये देतों—" असें म्हणून त्यांनीं खिशांतून नोटीचें एक बंडल बाहेर काढलें आणि तें पुढें करून ते पुढें म्हणाले, "तूं कुठेंही जा आणि ज्यावेळीं तुला आणखी रुपयांची जरूरी भासेल त्यावेळीं मला पत्रद्वारें कळीव म्हणजे मी आणखी रुपये पाठवून देईन. घे हे रुपये—"

"मी ह्या रुपयांना स्पर्शही करणार नाहीं. मला त्या रुपयांची जरूरी नाहीं. त्या दिवशीं मी तुम्हांला माझ्या आईबापांविषयीं विचारलें आणि तें तुम्हाला ठाऊक असूनही तुम्हीं मला सांगितलें नाहीं. पण आतां मला स्वतः-बद्दल सर्व गोष्टी कळूं द्या म्हणजे मी त्याचा विचार करीन आणि माझा जन्म मला जन्म देणाऱ्या आईबापांच्या सदाचरणानें झाला आहे अशी माझी खात्री झाल्यावर मी ह्या रुपयांचा स्वीकार करीन."

"विमला, तूं चांगली समजूतदार शहाणी मुलगी आहेस. मग हा असा दुराग्रह धरणं चांगलं का ?"

"हा दुराग्रह नव्हे. सत्यशोधाकरितां सतत प्रयत्न करणें म्हणजे दुराग्रह नव्हे. आणि तुम्ही तरी मला नगर सोडून जाण्याचा आग्रह कां करतां ? नगर सोडणें किंवा न सोडणें हा माझ्या मर्जीचा प्रश्न आहे !"

"मी आग्रह कां करतों याचें कारण तूं येथें राहिल्यामुळें नरसिंगाचें मन चलबिचल होतें. तो येऊन तुला भेटत असतो."

"ते जर आपण होऊन येथें येतात तर त्यांना 'नका येऊं' असें मी कसें सांगूं ? तुम्ही आतां आलां आहांत, तुम्हाला अटकाव करणें माला योग्य दिसेल काय ?"

"पण तूं त्याला उत्तेजन देत असतेस त्यामुळें माझे सर्व बेत ढांसळून पडण्याच्या बेतांत आले आहेत."

" ते येथें येतात खरें; परंतु मी त्यांना उत्तेजन देतें हा आपला समज अगदीं चुकीचा आहे. माझें त्यांच्यावर प्रेम आहे हें आपण जाणतच आहांत परंतु मी आपणाजवळ त्या दिवशीं शपथ वाहिली आहे, हें आपण विसरलांत काय ? "

" तुझ्या शपथेची किंमत काय ? मनुष्य आपल्या स्वार्थाकरितां दिवसांतून शेंकडों शपथा घेतों. पण—"

" बापुसाहेब, आपलें जास्त भाषण ऐकण्याची माझी इच्छा नाहीं. " असें म्हणून विमलेनें रागानें तोंड फिरविलें. तें पाहून बापुसाहेबही क्षणभर चकित झाले. तिचा आवेश पाहून त्यांना तिचें कौतुक वाटलें. क्षणभरानें विमला रागांतच म्हणाली, " प्रत्यक्ष आपल्या मुलीला आपलें नांव कळूं नये म्हणून माझ्या बापानें तुमच्याकडून शपथ घेवविली असें तुम्ही सांगतां आणि ती शपथ तुम्ही पाळतां तेव्हां स्वतःच्या शपथेचें तुम्हाला इतकें महत्त्व वाटतें आणि माझ्या शपथेचें तुम्हाला महत्त्व वाटत नाहीं हें मोठें आश्चर्य आहे ! पण तो शपथेचा वाद आतां कशाला ? तुम्हांला माझ्या शपथेची किंमत वाटो अगर न वाटो पण तुम्हाला मला ' असें कर आणि असें करूं नको ' असें सांगण्याचा अधिकार काय ? मी स्वतंत्र आहें. माझ्यावर कोणाचीच सत्ता नाहीं. मी तुमचें तरी कां ऐकावें ? "

" कां ऐकावें ? कृतघ्न पोरी, कां ऐकावें म्हणून मला विचारतेस ? इतकीं वर्षें मीं तुझा हस्तें परहस्तें सांभाळ केला त्याचे हे उपकार फेडतेस काय ? "

" कां सांभाळ केला तेंच मला कळूं द्या. अर्थाअर्थी तुमचा माझा संबंध नसतां तुम्हीं इतकीं वर्षें माझा जो संभाळ केला त्यांत कांहीं तरी मोठें गूढ आहे. तें गूढ मला कळूं द्या. म्हणजे मला तुमच्या उपकारांची फेड अगदीं बरोबर करता येईल. "

" तूं अशी सर्पासारखी उलटशील असें मला स्वप्नही पडलें नव्हतें. शेवटीं तूं आपल्या आईच्याच वळणावर गेलीस. ती जशी हट्टी आणि हेकेखोर होती तशीच तिचीच तूं प्रतिमा आहेस दुसरें काय ? "

" ह्या बाबतींत मी जर माझ्या आईचीच प्रतिमा असेन तर मात्र मी इतकें सांगतें कीं, माझ्या आईनें जो हट्ट किंवा हेका धरिला असेल तो केवळ सत्याकरितांच धरिला असेल. "

बापुसाहेबांनीं कांहीच उत्तर दिलें नाहीं. फक्त एक दीर्घ श्वास सोडून त्यांनीं

आपल्या खिशांतून रुमाल बाहेर काढला आणि आपल्या कपाळावरील घाम पुसला. विमला त्यांच्या तोंडाकडेच पहात होती. आपल्या उत्तरानें त्यांची चर्या बदलली हें तिच्या लक्षांत आलें आणि तिला वाईट वाटलें. पुढें बराच वेळ बापुसाहेब कांहींच बोलले नाहींत हें पाहून ती म्हणाली, "मग बापुसाहेब, मागें काय काय गोष्टी झाल्या त्या तुमच्या तुम्हालाच ठाऊक! तुम्ही वचनाप्रमाणें त्या गोष्टी मला सांगूं नका आणि त्या ऐकण्याची माझी ह्यापुढें इच्छाही नाहीं. पण आतां ह्यापुढें मीं काय करावें अशी तुमची इच्छा आहे ती सांगा म्हणजे मी तशी वागतें."

"माझी इच्छा अशी आहे कीं, तूं ह्यापुढें नरसिंगाला भेटूं नयेस."

"ठीक आहे."



## २३ नगर सोडलें

विमला आपणाबरोबर अशी कां वागते, याचें कारण नरसिंगरावाच्या लक्षांत येईना. कमला आपणाबरोबर गाडींतून फिरते, त्यामुळें तिच्या मनांत हेवा उत्पन्न झाला असावा अशी एकवेळ त्याच्या मनांत शंका आली, परंतु विचाराअंतीं ती शंका अगदींच गौण ठरली. संतोबाकडे असतांना तिच्या सतत सहवासामुळें त्यानें विमलेचा स्वभाव व वर्तन पूर्णपणें ओळखलें होतें. तिला शंकराचार्यांकडून बहिष्कार झाला म्हणूनच ती निराश झाली असावी आणि अशा स्थितींत आपण तिच्याबरोबर संबंध ठेवल्यास आपल्या नांवाला कलंक लागेल या भीतीनेंच तिचें असें तुटक वर्तन असावें, याशिवाय दुसरें कांहींच कारण त्याच्या लक्षांत येईना. ती स्वतःच्या नांवापेक्षां आपल्या नांवाकरितां आणि लौकिकाकरितां इतकी जपत आहे हे विचार मनांत येऊन नरसिंगरावाला तिच्याविषयीं कितीतरी अभिमान वाटूं लागला. आपणावर तिचें खरें, अकृत्रिम आणि निस्वार्थी प्रेम आहे याबद्दल शंका घेण्यास त्याला जागाच नव्हती. तिच्यांत आणि आपल्या प्रेमांत व्यत्यय आणणारें जर कांहीं असेल तर तें आचार्यांचें बहिष्कारपत्रच आहे असें शेवटीं ठरवून त्या विचाराच्या सपाट्यांत तो आचार्यांना पत्र लिहावयास बसला. दोन तास सतत बसून त्यानें एक लांबलचक मसुदा तयार केला. रात्रीं बारावाजे-

पर्यंत बसून त्यानें संकेश्वरच्या आचार्यांना पत्र लिहून तयार केलें. आणि कोल्हापूरच्या आचार्यांना पत्र लिहिण्याचा विचार दुसऱ्या दिवसावर टाकून तो झोंपी गेला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सर्व वेळ कमला जवळ असल्यामुळें नरसिंगरावाला स्वस्थपणानें पत्र लिहितां आलें नाहीं. ती आतां बहुतेक सर्व वेळ नरसिंगरावाच्या खोलींत घालवीत असे. तिचा पूर्वीचा चढेलपणा आतां पुष्कळ कमी झाला आहे. ती आपला अभ्यास, आपल्या शंका त्याला मोकळ्या मनानें विचारीत असे. शिवाय अलीकडे इतर विषयांवरहि तीं दोघें तासतास बोलत असत. कमला आणि नरसिंगराव एकत्र बसलीं असतां बापुसाहेब सहसा त्या खोलींत जात नसत. त्या उभयतांच्या वर्तनावरून बापुसाहेबांना मोठी आशा वाटूं लागली होती. आपण योजल्याप्रमाणें सर्व गोष्टी हळुहळू घडून येतील अशी आशा करण्यास त्यांना आतां पुष्कळ जागा होती. विमलेविषयीं काळजी करण्याचें आतां त्यांना कांहीं कारण नव्हतें. आज जेवण आटोपून ते माडीवर जात असतां सहज नरसिंगरावाची चौकशी करण्याकरितां त्याच्या खोलींत शिरले, त्यावेळीं तो लिहिण्यांत अगदीं गर्क झालेला त्यांना दिसला. तेव्हां जिज्ञासेनें त्यांनीं विचारलें, "कायरे नरसिंगा, काय लिहीत आहेस ?"

"हें मी आचार्यांना पत्र लिहीत आहें. आपण एक पत्र पाठविलें. परंतु अद्यापि त्याचा जबाब आला नाहीं. म्हणून मी हें दुसरें पत्र त्या आचार्यांना लिहिलें असून ही विमलेची सर्व खरी हकीकत कोल्हापुरच्या आचार्यांनाहि लिहून कळवीत आहें."

"पण आतां तूं ह्या भानगडींत कशाला पडतोस ? जें व्हायचें होतें तें झालें. आतां व्यर्थ पत्रव्यवहार करून नसती ब्याद मागें लावून घेण्यांत काय अर्थ आहे ?"

"असं कां म्हणतां मामा ? आचार्यांच्या ह्या बहिष्कारामुळें विमला तर अगदीं निराश झाली आहे. तिच्या वर्तनावरून तिच्या मनाची झालेली हताश स्थिति कोणाच्याहि सहज लक्षांत येण्यासारखी आहे."

"पण तिच्या मनाची अशी स्थिति झाली आहे हें तुला कसें कळलें ? ती इकडे आली होती कीं काय ?"

"नाहीं. मीच तिला रोज भेटत असतों—"

" केव्हां ?—तूं तिला केव्हां भेटत असतोस ? "

" आम्ही गाडींतून फिरावयास जातों, तेथून परत येतांना. "

" आणि कमला कुठें असते ? "

" तीहि असते माझ्याबरोबर. काल मात्र मी एकटाच होतों. "

नरसिंगरावानें हीं सरळ उत्तरें दिलेलीं ऐकून बापुसाहेब विचारांत पडले. नरसिंगराव आणि विमला यांच्या संबंधानें त्यांनीं स्वतःचें बनविलेलें मत आतां ह्या उत्तरांनीं डळमळूं लागलें. त्याची आणि विमलेची आतां भेट देखील व्हायची नाहीं, निदान विमला आपण होऊन नरसिंगरावाची भेट घेणार नाहीं असें त्यांना खात्रीपूर्वक वाटत होतें; परंतु आतां सर्वच गोष्ट बदलली असें त्यांना वाटूं लागलें. आतां पुढें काय करावें म्हणजे विमला आणि नरसिंगराव यांची भेट होणार नाहीं याचा त्यांनीं क्षणभर स्वतःशीं विचार केला. विमलेनें नगर सोडल्याशिवाय आपल्या मताप्रमाणें गोष्टी घडून यावयाच्या नाहींत असेंच त्यांना वाटलें. आणि पुढें काय करावयाचें तें स्वतःशीं ठरवून ते म्हणाले, " नरसिंगा, तूं ह्या विमलेसाठीं व्यर्थ धडपड करीत आहेस. हे आचार्य तुझ्या पत्रांना उत्तर देतील असें तुला वाटतें का ? अरे, त्यांना उत्तर द्यावयाचें असतें तर तुझ्या पहिल्या पत्राच्या उत्तराला इतके दिवस कां लागले असते ? "

" तेंही खरेंच आहे ! "

" मग तूं व्यर्थ खटाटोप कशाला करीत आहेस ! हे आमचे धर्मगुरु नांवाला मात्र आहेत. त्यांच्या हातून लोकोपयोगी धर्मकार्य होईल अशी आशा करणें म्हणजे मूर्खपणा आहे. त्यांनीं आपापल्या मोठेपणाकरितां आपापसांत भांडत बसावें या पलीकडे त्यांना दुसरें काम नाहीं. परवां मी कशांतसें*वाचलें कीं, 'हल्लीं शंकराचार्यांचे निदान ३० मठ तरी हिंदुस्थानांत असून त्यांच्यामार्फत लक्षावधि रुपये, शालजोड्या, इनामें वांटण्यांत आणि अन्नदान वगैरे करण्यांत खर्च होत आहेत. परंतु मठांचें खरें कर्तव्य हें नव्हे. आज काशींत अनंताचार्य हे रामानुजमतानुयायी शास्त्री आले आहेत; तर त्यांच्याशीं वादविवाद करण्यास एकही समर्थ अद्वैतवादी काशींत पुढें येऊं शकत नाहींत. वास्तविक अद्वैत वेदान्ताचा प्रसार करणें हेंच शंकराचार्यांचें खरें कर्तव्य आहे. "

---

* संदेश ता. ७-१२-१९१६ पाहा.

" होय. शंकराचार्यांचें खरें कर्तव्य हेंच जरी असलें तरी त्याचा विचार कोणी करावा ? हिंदुस्थानांतील हिंदूंच्या धर्माचा विचार व व्यवस्था करण्याचा ज्यांचा खरा व प्राचीन अधिकार ते हे धर्मगुरु आपल्याच तैनातींत सदा गर्क ! त्यांना जगद्गुरु हें मोठें नांव मात्र पाहिजे, पण जगद्गुरूंना शोभण्यासारखें कार्य मात्र करावयास नको. त्यांना तुमच्या सभा नकोत, उपदेश नको, धर्म नको, कर्म नको, वेद नको आणि शास्त्रही नको. 'येन केन प्रकारेण' आपली चैन चालली, पालखींतून मिरवायला मिळालें आणि मोठेपणा कायम राहिला म्हणजे झालें. धर्म आणि धार्मिक शिष्यवृंद यांची कितीहि दुर्दशा झाली तरी चालेल पण या मिजाशी गुरूंना दक्षिणा पाहिजे. आणि ती कशाकरितां तर आपली व आपल्या परिवारांतील निदान मुख्य मुख्य लोकांची तरी द्रव्यसंग्रहाची लालसा पूर्ण व्हावी म्हणून. एखाद्या धर्मपीठाचा स्वामी अथवा प्रधान कार्यकारी या नात्यानें आश्रय जो करावयाचा तो द्रव्यासाठींच करावयाचा व आश्रय केल्यावर शक्य तितक्या प्रमाणानें आपला मूळ उद्देश सिद्ध होण्याकडे सर्व लक्ष ठेवावयाचें* ! अशा स्थितींत तुम्ही सांगतां त्याप्रमाणें ह्या धर्मपीठांच्या हातून लोकोपयोगी धर्मकार्य कितीसें होणें शक्य आहे, हें दिसतेंच आहे. हिंदुस्थानांत निरनिराळ्या धर्मपंथांचीं अनेक प्राचीन धर्मपीठें आहेत. पण प्रायः त्या सर्वांची हीच दशा आहे. हे धर्मपीठस्थ आपल्या कर्तव्याला पूर्ण दक्ष नसल्यामुळें निरनिराळ्या लोकांना निरनिराळे संघ निर्माण करून निरनिराळे पंथ उत्पन्न करण्यास अवकाश मिळालेला आहे. आणि हे संघ आपली शक्ति वाढविण्याकरितां आणि लोकांचें लक्ष आपणाकडे लागून त्यांचा आपणावर विश्वास बसण्यासाठीं सभा, संमेलनें, परिषदा, प्रदर्शनें वगैरे करितात; वर्तमानपत्रांतून त्यांचा गवगवा होऊं देतात व अशा सुधारलेल्या आधुनिक उपायांनीं प्रसिद्धीस येतात. अर्थातच प्राचीन पीठें मागें पडतात. त्यांच्यावर कोणाचा विश्वास बसत नाहीं. त्यांतून पीठस्थ गुरु आपल्यावरील जबाबदारी ओळखीत नसले म्हणजे त्यांच्या संस्थानाला डबक्यांत सांचून उत्तरोत्तर नासत रहाणाऱ्या पाण्याचीच दशा प्राप्त होते."

" असें जर तुला माहित आहे तर मग ह्या विमलेच्या बाबतींत तूं ही पत्रव्यवहाराची दगदग कशाला करतोस ?"

---

* आचार्य व धर्मविचार ता. ५-१२-१९१६ पहा.

" मामा, त्याला कारण आहे. हे धर्मगुरु आपली जबाबदारी ओळखून वागत नाहींत. म्हणून यांना शुद्धीवर आणणें हे धार्मिक शिष्यवृंदाचें कर्तव्य आहे. यांना सतत टोंचणी लावली पाहिजे, यांच्या कृत्यांचा वर्तमानपत्रांतून गवगवा केला पाहिजे, नाहींतर आपआपसांतल्या यादवीनें ते स्वतःचा नाश करून घेतील आणि त्यामुळें भाविक आणि धार्मिक शिष्यवृंदाच्या श्रद्धेला धक्का बसेल. "

बापूसाहेबांनीं उत्तर दिलें नाहीं. त्यांच्या मनांत निराळाच विचार चालला होता. थोड्या वेळाने ते म्हणाले, " लिही तर तीं पत्रें. तोंपर्यंत मी जरा बाहेर जाऊन येतो. तुला फिरावयाला जाण्यासाठीं गाडी परत येईल. इतकें बोलून बापुसाहेब माडीवर गेले आणि कपडे घालूं लागले. वास्तविक दुपारचें जेवण झाल्यावर कांहींवेळ झोंप घेण्याचा त्यांचा नित्य क्रम असे; परंतु आज त्यांनीं झोंपेला फाटा दिला. त्यांनीं नोकराला हांक मारून गाडी जोडण्यास सांगितलें आणि गाडींत बसतांना विमलेच्या घरीं गाडी नेण्याचा हुकूम केला. ते विमलेच्या घरीं गेल्यावर तेथें काय काय प्रकार झाला त्याचा उल्लेख गेल्या प्रकरणांत आलाच आहे. तेथें गेल्यावर बापुसाहेबांनीं विमलेकडून ' नरसिंगाला भेटावयाचें नाहीं ' असें कबूल करून घेतलें आणि मुकाट्यानें तेथून पाय काढला. परत येतांना आपण विमलेकडे आलों होतों हें नरसिंगरावाला कळूं द्यावयाचें नाहीं अशी त्यांनीं [illegible] सक्त ताकीद दिली. ते घरीं आले त्यावेळीं संध्याकाळ झाला होता. नरसिंगरावानें आचार्यांना लिहिलेलीं दोन्हीं पत्रें नोकराकडून पोष्टांत रवाना केलीं होतीं आणि आतां तो फिरावयास जाण्याकरितां कपडे घालीत होता. कमलेला अडचण असल्यामुळें तो आज एकटाच बाहेर जाणार होता. त्याला आतां बराच उल्हास वाटत होता. आपण विमलेला भेटल्यानंतर आज काय काय पत्रें लिहिली हें सांगितल्यावर तिला आनंद होईल आणि ती आपणाबरोबर पूर्वीप्रमाणें प्रेमानें वागेल असें त्याला वाटत होतें. परंतु—!

इकडे बापुसाहेब निघून गेल्यावर विमला एकटीच राहिली. तिला कांहींच सुचेना. आपण शुद्ध भावनेनें नरसिंगरावाला भेटतों तें देखील बापूसाहेबांना सहन होत नाहीं हें पाहून तिला अत्यंत वाईट वाटलें. जगांत खऱ्या प्रेमाला किंमत नसावी काय ? असा तिनें स्वतःला प्रश्न केला. माझें प्रेम स्वार्थी आहे, अशी बापुसाहेबांनीं कल्पना करावी काय ? आपल्या मुलीच्या भावी सुखाकरितां

ते माझ्या सुखाची होळी करीत आहेत यावरून त्यांना मनुष्यजातीच्या सुखदुःखाची कल्पनाच नाहीं, असें सिद्ध होतें. मी जर आतां हट्ट धरून बसलें तर ते काय करतील ? मी नरसिंगरावांना कां भेटूं नये ? माझें त्याच्यावर प्रेम आहे आणि त्यांचेंहि माझ्यावर प्रेम आहे मग आम्हांला जगाशीं काय कर्तव्य आहे ? मी नरसिंगरावांना फसवितें असा तर कांहीं प्रकार नाहीं. मग मला सुखी होण्यास काय हरकत आहे. पण नाहीं—माझ्यामुळें नरसिंगरावांचें भयंकर नुकसान होणार आहे तें माझ्या शुद्ध प्रेमाला कधींहि खपणार नाहीं. त्यांनाच सुखी होण्याचा अधिकार आहे. मी जन्मभर दुःखी राहिलें तरी हरकत नाहीं. परंतु त्यांनीं सुखीच राहिलें पाहिजे. त्यांना सुखी झालेलें पाहूनच मी सुख मानलें पाहिजे तर तें माझें शुद्ध प्रेम ! अशा रीतीनें ती स्वतःशीं विचार करीत बसली असतां ' ह्यापुढें नरसिंगरावांना भेटावयाचें नाहीं ' ह्या बापुसाहेबांना दिलेल्या वचनाची तिला आठवण झाली. ' अरेरे ! त्या सुंदर मूर्तीला—देवाप्रमाणें मला पूज्य असलेल्या मूर्तीला भेटण्याची सुद्धां बंदी करावी काय ? ' हें वाक्य तिनें स्वगत उच्चारिलें न उच्चारिलें तोंच पुनः दरवाजा वाजला आणि काठीवर भार टेकित नरसिंगराव आंत आला. तो दृष्टीस पडतांच विमलेला उमाळा आला आणि ती अचल दृष्टीनें त्याच्या मुखाकडे पहात राहिली. अशा सुंदर मूर्तीला—आपल्या आराध्य देवाला भेटण्याची, त्याच्या दर्शनाची, आपणास बंदी असावी हा चालू विचार तिच्या मनांत घोळत होता. आणि त्याचा परिणाम तिला दुःखाचा एक मोठा हुंदका आला. ही तिची स्थिती पाहून नरसिंगराव गोंधळून गेला. घरून निघतांना तो कोणत्या विचारांत होता आणि तेथें त्याला प्रत्यक्ष काय दिसलें ? तो पुढें झाला आणि विमलेनें खालीं घातलेली मान तिच्या हनुवटीला धरून वर करीत तो म्हणाला, " विमल, तूं वेडी तर नाहींस ना ! मी आज शंकराचार्यांना पुनः सणसणीत पत्रें लिहिली आहेत. तूं उगाच कां बरें अशी हताश होत आहेस ? माझ्यावर तुझा विश्वास आहेना ? तुला विनाकारण घातलेला हा बहिष्कार रद्द करण्याकरितां मला वाटेल तें करावें लागलें तरी मी माघार घेणार नाहीं, अशी खात्री ठेव. आतां ह्यापेक्षां तुला मी जास्त काय सांगू ?—आतां पुस पाहूं ते डोळे ! " असें म्हणून त्यानें आपला रुमाल पुढें केला. त्याचा स्पर्श होतांच विमलेचें सर्वांग थरथर कापूं लागलें. तिचे अश्रु कमी होण्यापेक्षां ते जास्तच जोरानें

वाहूं लागले. आतांपर्यंत हळुहळू बाहेर येणारे उमाळे आतां जोराजोरानें बाहेर येऊं लागले. तें पाहून नरसिंगरावानें स्वाभाविकपणानें तिच्या खांद्यावर हात ठेवून तिला आपणाजवळ ओढलें. तिनेंहि कांहींएक प्रतिकार न करतां आपल्या आराध्य देवाच्या वक्षस्थळावर आपलें डोकें टेंकलें. त्याबरोबरच तिचा दुःखाचा वेग एकदम कमी झाला.

" विमला, हें काय बरं ? अशा रीतीनं व्यर्थ दुःख करणं चांगलं का ? "

" आतां दुःखाशिवाय माझ्या वांट्याला काय राहिलं आहे ? मी आतां कोणत्या आशेवर सुख मानून रहावें ? आणि मला सुखाची आशा करण्याचा अधिकार तरी कुठें राहिला आहे. आपल्या पवित्र चरणाची सेवा करण्याइतकी मी भाग्यवान् नाहीं हें मी प्रथमपासून जाणून होतें. परंतु आपल्या पवित्र दर्शनाला सुद्धां मला अंतरावें लागेल असें वाटलें नव्हतें. मी आपणापासून दूर राहून आपल्या दर्शनानेंहि सुखी झालें असतें, परंतु तेंहि सुख माझ्या नशिबीं नसावें काय ? "

" हें तूं काय बोलत आहेस तें मला कांहींच कळलें नाहीं. तूं स्वतःला दुःखी कां समजतेस ? तुझ्या सर्व दुःखाचा भार मला दे. मी तो भार आपणाकडे घेतो. "

" माझ्या दुःखानें आपण दुःखी झाल्यावर मला सुख कोठून होणार ? आपणाला काडीइतकंहि दुःख झालेलं मला सहन होणार नाहीं. "

" विमले, मी आतां काय करूं तें मला सांग, म्हणजे मी तसें करतों. "

" सांगूं का ?—" नरसिंगरावाच्या मुखाकडे पहात विमला म्हणाली, " तुम्ही आतां ह्या खुर्चीवर बसा. मी आपल्या पायांजवळ बसतें आणि मला आपल्या पवित्र मूर्तीकडे मनमुराद पाहूं द्या. " असें म्हणून विमला खरोखरीच त्याच्या पायांजवळ बसली आणि एखाद्या ध्यानस्थाप्रमाणें टक लावून त्याच्या मुखाकडे पाहूं लागली. थोड्यावेळानें नरसिंगरावाला स्वाभाविकपणें हसूं येऊं लागलें; परंतु विमलेच्या चर्येंत किंचितहि फरक पडला नाहीं. ती खरोखरीच ध्यानस्थ बसली होती. आपल्या आराध्य देवाच्या सुंदर मूर्तीच्या चिंतनांत ती अगदीं तन्मय बनली. तिच्या चर्येवर बिलकुल चलबिचल दिसेना. तिची पापणीसुद्धां हालेना. ती गंभीरपणाची एक मूर्तिमंत पुतळी दिसूं लागली. परंतु, तिच्या ह्या वृत्तीचा नरसिंगरावाला बोध झाला नाहीं. ती त्याच्याकडे पाहूं लागतांच प्रथम त्याला हसूं आलें. नंतर त्यानें हळूच

खालीं वाकून तिच्या मुखाजवळ आपलें मुख नेलें. तें इतकें जवळ नेलें कीं, परस्परांचा श्वास एक झाला. तरी देखील विमलेनें त्याच्या मुखाकडे लावलेली अचल दृष्टि किंचितहि ढळूं दिली नाहीं. शेवटीं नरसिंगानें तिच्या गालाला आपलें तोंड भिडविलें, तेव्हां मात्र ती चटकन् शुद्धीवर आली. तथापि नरसिंगाला तिनें कांहींच प्रतिकार केला नाहीं. इतका प्रकार झाल्यावर क्षणभर तीं दोघें एकमेकांकडे पहात राहिलीं. इतक्यांत दरवाजांत मिशनरी बाईची गाडी येऊन उभी राहिली. तिला आंत आणण्याकरितां विमला बाहेर गेली. नरसिंगराव आंतच खुर्चीवर बसून राहिला. थोड्या वेळानें मिशनरीबाईला घेऊन विमला आंत आली. नरसिंगाला तेथें पाहून बाईनें त्याची चौकशी केली. बराच वेळ त्याच्या गोष्टी चालल्या होत्या. शेवटीं दिवे लावण्याचा सुमार झालेला पाहून नरसिंगराव जाण्याकरितां उठला. मिशनरीबाई बसून राहिली.

नरसिंगरावाची गाडी गेल्यावर बाईनें आपल्या हँडब्यागमधून एक पत्र काढलें आणि विचारलें, "तुला किती पैसे पाहिजे आहेत?—विमला, तूं आमच्या मिशनची पहिली मुलगी म्हणून तुझ्याकडे आमचें सर्वांचें मन विशेष ओढ घेत आहे. तुझें कल्याण व्हावें, तूं नेहमीं आनंदांत आणि सुखांत असावीस अशी आमची इच्छा आहे. आतां तूं नगर सोडून जात आहेस म्हणून आम्हाला फार वाईट वाटतें. पण नगर सोडल्यापासून तूं सुखी होशील असें तुला वाटतें त्याअर्थी आम्ही तुझ्या जाण्यांत व्यत्यय आणीत नाहीं. तूं कुठेंहि राहून सुखी हो म्हणजे आम्हाला आनंद आहे. आतां सांग पाहूं तुला किती रुपये पाहिजे आहेत?"

"मला वीस रुपयांची जरूरी आहे." विमलेनें भीत भीत उत्तर दिलें. इतके रुपये बाई आपणास देईल किंवा नाहीं याची तिला शंका होती. परंतु रुपयांचा आंकडा कळतांच बाईनें चटकन् आपल्या ब्यागमध्यें हात घातला आणि पांच रुपयांच्या चार नोटा पुढें केल्या.

"हे रुपये परत करण्याची घाई करूं नकोस. आणि सवड न झाली आणि हे पैसे परत केले नाहींस तरीहि चिंता नाहीं. हे पैसे मी स्वतःच्या खासगी खर्चांतून तुला देत आहे. तसेंच हें पत्र. हें मी पुण्याच्या पंचहौदमिशनच्या मोठ्या बाईंना लिहिलें आहे. ह्या पत्रांत असें लिहिलें आहे कीं, तूं येथें होतीस, तुला येथील हवा मानवत नाहीं म्हणून पुण्यास रहावयाचें आहे; तर तुला

मिशनच्या शाळेंत कांहीं काम मिळावें. आणि माझी खात्री आहे कीं, ती तुझी कांहींतरी व्यवस्था करील. त्याचप्रमाणें तुझ्या राहण्याच्या जागेबद्दलहि लिहिलें आहे."

विमलेनें मोठ्या आदरबुद्धीनें बाईकडे पहात ते रुपये आणि पत्र घेतलें. तिनें बोलण्याचा प्रयत्न केला परंतु तिचा कंठ भरून आल्यामुळें तिला शब्दोच्चारहि करतां येईना. तें पाहून बाई तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाली, "विमला, माझे आभार मानण्याचें तुला कारण नाहीं. आपण सर्व त्या परमेश्वराचीं लेकरें आहोंत. आपण एकमेकांला मदत करणें हें आपलें कर्तव्य आहे."

बाईविषयीं आजपर्यंत वाटला नाहीं इतका आदर आज विमलेला वाटला. ऐन प्रसंगाच्या वेळीं तिनें एखाद्या देवतेप्रमाणें तिला सहाय्य केलें मग तिला तिच्याविषयीं आदर कां वाटूं नये? ती निघून गेल्यावर विमला तशीच विचार करीत राहिली. आतां तिला पुष्कळ धीर आला. मनोहराच्या उपकारांतून बाहेर पडण्याचें तिच्या हातांत साधन आलें. बापुसाहेबांना दिलेलें वचन पाळण्याची तिला हिम्मत आली. तात्काळ तिचा पुढला बेत ठरला. आपण रात्रीं येथून निघालों तर आपणास मनोहराला टाळतां येईल असें तिला वाटलें. आणि त्याप्रमाणें तिनें आपल्या तयारीला सुरवातहि केली. आपण जातों हें नरसिंगरावांना कळवावें किंवा नाहीं, हा एक तिला मोठा प्रश्न पडला होता. परंतु पुष्कळ विचारांअंती आपण जात आहोंत हें कोणालाच कळू द्यावयाचें नाहीं असेंच शेवटीं तिनें ठरविलें. आपल्या जाण्यामुळें प्रथम नरसिंगरावाला वाईट वाटेल परंतु आपण त्याच्या सुखाकरितांच जात आहोंत अशी तिनें आपल्या मनाची समजूत करून घेतली. तिनें ट्रंक भरली. आणि म्हाताऱ्या जयेला हांक मारिली.

"जये, मी आतां रात्रीच्या गाडीनें नगर सोडून जाणार आहें. पण तूं अशी एकदम भिऊन जाऊं नकोस. मी तुझी पोटापाण्याची व्यवस्था केल्याशिवाय जात नाहीं. उद्यां सकाळीं तो मनोहर, ज्यानें परवां रात्रीं धान्य आणून दिलें तो येईल. त्याला हे धान्याचे रुपये दे. आणि तो माझी चौकशी करील तर मी कुठें गेलें आहे हें मात्र सांगूं नकोस. तसेंच हे पांच रुपये तूं स्वतःजवळ ठेव. मी जातें तेथें माझी नीट व्यवस्था लागल्यावर तुला मी तुझ्या पोटापुरते पैसे अगदीं नियमानें पाठवीत जाईन. त्याची तूं काळजी

करूं नकोस. ठेव आतां ह्या दोन नोटा नीट जपून. " असें म्हणून विमलेनें म्हातारीच्या हातांत दोन नोटा दिल्या. " आतां लवकर जेवण करून मला निघालं पाहिजे. जेवण तयार आहेना ? मला वाढून ठेव इतक्यांत मी शेजाऱ्या महादू टांगेवाल्याला सांगून येतें. "

म्हातारीनें त्या दोन्ही नोटी आपल्या पदराच्या टोंकाला पन्नास गांठी मारून बांधून ठेविल्या. विमला जात आहे म्हणून तिला वाईट वाटलें खरें परंतु, त्याबरोबरच तिनें तिच्या पोटाची व्यवस्था बिनचूक करण्याचें दिलेलें आश्वासन तिला नवा जीव आणण्यास कारण झालें ! मनोहरानें आणून दिलेलें धान्य एक महिना पुरण्याइतकें होतें. शिवाय आतां विमलेनें तिला पांच रुपये दिले होते. त्या रुपयांवर म्हातारीचा आणखी एक महिना जाण्यास कांहीं हरकत नव्हती. म्हातारी ह्याच विचारांत गुंग होऊन विमलेला वाढीत होती, आणि तीहि मुकाट्यानें जेवीत होती. तिचें जेवण झालें तरीहि ती कुठें जात आहे हें विचारण्याची म्हातारीला आठवण झाली नाहीं. फक्त विमला नगर सोडून जाते, इतकेंच तिला कळलें. विमलेनेंहि आपण कुठें जात आहोंत हें म्हातारीला सांगितलें नाहीं. जेवण झाल्यावर तिनें आपली ट्रंक भरली आणि गादीची वळकटी करून ती त्यावर बांधिली. इतक्यांत टांगा येऊन दरवाजाजवळ उभा राहिला.



## २४ प्लेग झाला

ते दिवस प्लेगचे असल्यामुळें शहरांत अगदीं तुरळक वस्ती होती. शहरांतील बहुतेक सर्व लोक बाहेर झोंपड्या बांधून रहात होते. विमला सकाळीं पुण्याच्या स्टेशनवर उतरली. प्रवासांत विशेष लिहिण्यासारखा कांहीं प्रकार घडला नाहीं. आगगाडीनें प्रवास करण्याचा तिच्या आयुष्यांतील हा तिला पहिलाच प्रसंग होता. पुण्यास उतरल्यानंतर पंचहौदमिशनमध्यें जाण्याकरितां तिनें टांगा केला. रस्त्यानें टांगा जात असतां शहरांतील रचना पाहून तिला आनंद वाटूं लागला. वाटेंत तिला रेमार्केट लागलें. तो मोठा बाजार पाहून अशा शहरांत आतां आपण रहाणार म्हणून तिला आनंद झाला. थोड्या वेळानें टांगा मिशनच्या दरवाजाजवळ येऊन उभा राहिला. विमलेनें आपलें

सामान काढून घेतलें आणि टांगेवाल्याला भाडें चुकतें केलें. त्यावेळीं मिशनच्या कंपौंडांत फक्त माळी झाडांना पाणी घालीत होता. त्याला जवळ बोलावून विमलेनें बाईची चौकशी केली. इतक्यांत त्या बाईच बाहेर आल्या. तेव्हां माळ्यानें तिच्याकडे बोट दाखविलें. विमलेनें पुढें होऊन तिला सलाम केला आणि बरोबर आणलेलें पत्र पुढें केलें. बाईनें तें पत्र वाचून " मिस् विमलाबाई नगरकर हें तुमचें नांव काय ? " असा तिला प्रश्न केला. विमलेनें होकारार्थी उत्तर देतांच तिनें पुढें विचारलें, " तुम्ही आतांच नगरहून आलां असें दिसतें. चला आंत. मी तुमची व्यवस्था लावून देतें. मग आपण स्वस्थपणें बोलत बसू. "

ही नवीन बाई नगरच्या मिशनरी बाईसारखीच मायाळु होती. आंत गेल्यावर त्यांच्या बराचवेळ गोष्टी होऊन त्याच बैठकीला सर्व ठरलें. एक वर्ग शिकविण्याबद्दल दरमहा पंधरा रुपये देण्याचें बाईनें कबूल केलें. आणि रहाण्याची बाहेर व्यवस्था होईपर्यंत मिशनमध्येंच तिला एक खोली दिली. आठ दिवसांपूर्वी मिशनच्या कंपौंडांत एक प्लेगची केच झाल्यामुळें मिशनमध्यें एकटी बाईच रहात असे. बाकी सर्व मुलें झोंपडींत रहावयास गेलीं होतीं. विमलेनें स्नानाच्या स्वतंत्र खोलींत आपलें स्नान उरकून घेतलें. तिला आतां भूक लागली. परंतु जेवणाची काय व्यवस्था करावी हेंच तिला सुचेना. शेवटीं माळ्याकडून तिनें दूध मागविलें आणि त्यावरच आपली तहान भूक भागवून घेतली. मिशनच्या बाईनें तिच्या जेवणाबद्दल चौकशी केली परंतु ' मी व्यवस्था केली आहे असें विमलेनें तिला सांगितलें. दहाच्या सुमारास मिशनची शाळा भरली. मुलें आणि मुली मिळून शंभर संख्या होती. शिवाय दोन पुरुष आणि पांच स्त्रीशिक्षक मिळून शिक्षकांची संख्या सात होती. त्यांपैकीं एक बाई विमलेच्या ओळखीची निघाली. तिचें नांव चंद्राबाई. ती पूर्वी नगरच्या मिशनमध्यें होती. तो पहिलाच दिवस असल्यामुळें विमलेला काहीं काम करावें लागलें नाहीं. ती चंद्राबाईबरोबरच तिच्या वर्गात जाऊन बसली. तिच्याजवळ चौकशी करीत असतां मिशनच्या बऱ्याच गोष्टी विमलेला कळल्या. शिवाय ती रहात होती तेथें जवळच एक खोली भाड्यानें द्यावयाची आहे असें विमलेला समजलें. तेव्हां दुपारच्या रजेंत विमला तिच्या बरोबर गेली आणि ती खोली पाहून आली. त्या जागेचें भाडें महिना सव्वा रुपया होतें. विमलेनें लगेच ती खोली ठरवून टाकिली. नंतर चंद्राबाईने

आपलीं दोन भांडीं देण्याचें कबूल केलें. आणि दुसऱ्या दिवसापासून विमला आपल्या नवीन बिऱ्हाडांत चंद्राबाईच्या सोबतीनें स्वतंत्र रीतीनें राहूं लागली. तिला प्रत्येक कामांत चंद्राबाईनें मनापासून मदत केली. अशा रीतीनें आमच्या कथानायिकेचा पुण्यांतील जम बसला.

त्या मिशनचें एक हॉस्पिटल होतें. तेथें धर्मार्थ औषधें देण्यांत येत असत. त्या दवाखान्यांत सीताराम नांवाचा एक नोकर होता. त्याच्या व्रात्य आणि फाजील वर्तणुकीविषयीं डॉक्टरकडे दोन चारदां तक्रार गेली होती. परंतु तो कामांत हुशार असल्यामुळें डॉक्टरसाहेबांची त्याच्यावर मर्जी होती म्हणून त्यांनीं त्या तक्रारीकडे विशेष लक्ष पुरविलें नाहीं. विमला दृष्टीस पडतांच त्यानें तिच्यावर नजर ठेवण्याचा निश्चय केला. प्रथम कांहीं तरी निमित्त काढून तो तिच्याजवळ जाई, तिला कांहींतरी प्रश्न विचारी, ती जातां येतांना मुद्दाम पुढें होऊन तिला सलाम करी. हा सर्व उद्योग तो तिसऱ्या मनुष्याला कळणार नाहीं इतक्या सावधपणानें करीत असे. असो.

विमला पुण्यांत येऊन दहा दिवस झाले. तितक्या अवधींत शहरांतील प्लेग कमी होण्याऐवजीं जास्त वाढूं लागला. तेव्हां एके दिवशीं चंद्राबाई म्हणाली " आतां येथें रहाणें कांहीं चांगलें नाहीं. प्लेग तर दिवसेंदिवस वाढूं लागला आहे. मी बाईजवळ रजा मागितली आहे. आणि मला रजा मिळेल अशी आशा आहे. "

" मग चंद्राबाई, तुम्ही येथून जाणार कीं काय ? " विमलेनें एकदम विचारलें, " आणि मग मी येथें एकटीच कशी राहूं ? मी प्लेगला नाहीं भीत; पण—पण—"

" पण म्हणून अशा अडलां कां ? प्लेगची जर भीति वाटत नाहीं तर मग रहाण्यास काय हरकत आहे ? मी बाई मिरजेस माझी मावशी रहाते तिच्याकडे जाण्याचा विचार केला आहे. पण तुम्ही बोलत कां नाहीं ? तुम्हाला भीति कशाची वाटते तें सांगा ना ? "

" तो—तो आपल्या मिशनमध्यें सीताराम आहे. तो अलीकडे मजशीं फार व्रात्यपणा करूं लागला आहे. "

" आहेच मेला तो शित्या तसा ! पण आतां तो तुमच्याकडे कां वळला आहे ? थांबा मी घेतें आतां त्याची खबर ! "

चन्द्राबाईच्या भाषणाचा विमलेला चांगला बोध झाला नाहीं. ' आतां तो

तुमच्याकडे कां वळला आहे ?' ह्या म्हणण्यांत काय अर्थ आहे, हें तिच्या लक्षांत आलें नाहीं. आणि निर्मळ मनाच्या विमलेला त्या वाक्यांचा खोल अर्थ कळणेंहि शक्य नव्हतें. तिच्या मनांतून तो विचार तेव्हांच निघून गेला परंतु चंद्राबाईला मात्र चैन पडेना. केव्हां एकदां मिशनमध्यें जातें आणि 'शित्या'ची केव्हां खरडपट्टी काढतें असें तिला झालें. चंद्राबाईच्या ह्या चलबिचल झालेल्या स्थितीवरून तिचा आणि सितारामाचा संबंध कोणत्या प्रकारचा होता हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. आपणास त्याच्या नीतिबाह्य वर्तनाशीं कांहीं एक कर्तव्य नाहीं, फक्त आपली कथानायिका तेथें असल्यामुळें आम्हाला त्या पापी मनुष्याचा उल्लेख करावा लागत आहे.

दोन दिवसांनीं चंद्राबाईनें आपल्या खोलीला कुलूप लावून आपल्या मावशीकडे मिरजेला प्रयाण केलें. विमला आतां एकटीच राहिली. आतां घरीं आल्यावर तिचा वेळ फार कंटाळवाणा जाऊं लागला. ती सकाळीं उठल्यानंतर आपला प्रातर्विधी आटोपून जेवण करीत असे. अशा रीतीनें मिशनमध्यें जाण्यापूर्वी तिचा सकाळचा वेळ सहज जात असे. परंतु मिशनमधून आल्यावर संध्याकाळ आणि रात्र तिला अगदींच एकांताची घालवावी लागे. चंद्राबाईचा जेव्हां तिला शेजार होता. तेव्हां परस्परांच्या सहवासांत त्यांचा वेळ वाचण्यांत किंवा अन्य कांहीं बैठीं कामें करण्यांत आनंदांत जात असे. परंतु चंद्राबाई गेल्यावर एका दिवसांतच ती कंटाळली. एकटीच असल्यामुळें तिला रात्रीं स्वस्थ झोंपहि लागलीं नाहीं. शिवाय आजुबाजूला प्लेगच्या केसीस होत असल्यामुळें तिला एक प्रकारची भीति वाटत होती. दुसऱ्या दिवशीं नित्य नियमाप्रमाणें ती शाळेंत गेली. त्या दिवशीं तिचें मन अस्वस्थ असल्यामुळें दुपारपासून तिचें डोकें दुखूं लागलें. आज मिशनमध्यें तिला विशेष काम नसल्यामुळें ती एकटीच स्वतःविषयीं विचार करीत बसली होती. सीतारामानें तिला एका बाजूला बसलेली पाहून विचारलें, "कां विमलाबाई, आज येथें एकट्याच बसलां आहांत ? प्रकृति ठीक नाहीं वाटतं ! तोंड तर अगदीं उतरलेलं दिसतं."

"आज माझं डोकं दुखत आहे."

"खरं कीं काय ?" अत्यंत आश्चर्याचा आविर्भाव दाखवून सीताराम म्हणाला, "आणि तुमचं डोकं जड झालं आहे का ? तुमचं सर्वांग कडमडून आल्यासारखं वाटतं का ?"

" होय, मला आज जड झाल्यासारखं वाटतं. "

" जड झाल्यासारखं वाटतं ? मग—मग—"

" शंका कसली आली ? "

" शंका नाहीं पण—"

" काय शंका आली ती मला सांगाना ? "

" त्यांत सांगू काय ? हा बहुतकरून प्लेगचाच ताप येणार असं दिसतं. कारण प्लेगचा ताप येण्यापूर्वी असंच होत असतं. "

" तुम्ही कांहीं तरी सांगतां झालं ! " असें म्हणून विमला उठली आणि आपल्या उद्योगाला लागली. परंतु त्या व्रात्य सीतारामानें मूर्खासारखें केलेलें भाषण तिच्या मनांतून जाईना. घटकेघटकेला ती आपल्या कपाळाला हात लावून पाही. घरीं जाईपर्यंत तिच्या मनावर त्या भाषणाचा पुष्कळ परिणाम झाला. आणि तोंपर्यंत तिचें डोकेंही जास्त दुखूं लागलें. घरीं येतांच तिनें जेवणाचा प्रयत्न केला. परंतु मनांत चाललेल्या विचारामुळें तिला दोन घांसही गेले नाहींत. आतां आपण स्वस्थ पडावें अशा उद्देशानें तिनें अंथरूण पसरलें. तिला आतां चमत्कारिक वाटूं लागलें. मनांत नाना प्रकारचे विचार येऊन ती अगदीं गोंधळून आणि घाबरून गेली. आपणास प्लेग झाला तर आपली काय स्थिति होईल, आपणास औषधपाणी कोण देईल, कदाचित् कांहीं बरावाईट प्रकार झाला तर आपली पुढली व्यवस्था कोण करील, अशा शेंकडों विचारांत तिचें मन हेलकावे खाऊं लागलें. 'भित्याच्या मागें ब्रह्मराक्षस' म्हणतात त्याचप्रमाणें तिची स्थिति झाली. तिला हळूहळू ताप भरूं लागला. आणि त्या तापांत तिचा डोळा लागला.

तिला स्वप्नें पडूं लागलीं. त्या स्वप्नांत तिला एकापेक्षां एक भयंकर देखावे दिसूं लागले. आपणास प्लेग झाला आहे. आपण माशाप्रमाणें रात्रंदिवस तळमळत आहोंत. आपणास एका भयाण जागेंत नेऊन टाकलें आहे. आपला अंतसमय जवळ आला आहे आणि अशा वेळीं आपणाजवळ कोणी नाहीं वगैरे वगैरे अनेक देखावे पाहून ती अगदीं भयभीत होऊन एकदम जागी झाली. त्याचवेळीं दरवाजाबाहेर आपणास कोणी हाका मारित आहे असा तिला भास झाला. त्यावेळीं सर्व खोलींत काळोख पडला होता. त्यामुळें आपण कुठें आहों, याची देखील तिला क्षणभर भ्रांत पडली. तिनें उठण्याचा प्रयत्न केला परंतु तापामुळें तिला एकदम उठवेना. बाहेरून आतां हांका

स्पष्ट ऐकूं येत होत्या. शेवटीं ती मोठ्या जुलमानें उठली आणि हळूहळू पुढें होऊन तिनें दरवाजाची कडी काढिली. बाहेरहि काळोखच पडला होता. त्यावेळीं रात्रीचे आठ वाजले होते, दरवाजा उघडतांच सिताराम पुढें झाला.

" कां विमलाबाई, अगदी काळोख करून बसलां आहांत? कोणी आहे वाटतं खोलींत?"

त्याच्या भाषणाचा विमलेला राग आला; परंतु त्याच्या तोंडाला तोंड देण्याइतकी तिला आतां शक्ति नव्हती. परंतु ती म्हणाली, " तुम्ही काय बोलतां त्याचा विचार केला काय?"

" विमलाबाई, त्यांत विचार कसला? असं चालायचंच! आमच्या चंद्राबाई नव्हत्या कां करीत!—पण तें जाऊं द्या. तुमचं आतां डोकं कसं आहे?"

" माझं डोकं कसंहि असो. तुम्ही येथून निघून जा. तुमचं फाजील भाषण ऐकण्याची माझी इच्छा नाहीं." असें रागानें बोलून विमला झटकन् आंत आली आणि तिनें जोरानं दरवाजा लावून घेतला. परंतु ह्या गडबडींत उंबऱ्यांतून पाय आंत घेतांना तिचा उजवा पाय एकदम लचकला. तिनें दरवाजा बंद करतांच सितारामानें हां—हां करून दांत काढीत दरवाजावर दोनचार धक्के दिले. तिकडे दुर्लक्ष करून विमला पुनः आपल्या अंथरुणावर येऊन पडली. नगरास असतांना मनोहर तिच्या मागें लागला होता. परंतु त्या ठिकाणीं तिला त्याची भीति वाटत नव्हती. परंतु इकडे तिची स्थिति फारच चमत्कारिक होती. इकडे तिला कोणाचें सहाय्य नव्हतें. तिला कोणाची सहानुभूति नव्हती किंवा द्रव्यबलहि नव्हतें. त्यांतून ती आजारी पडलेली! अशा स्थितींत सितारामसारख्या नीच मनुष्याची तिला रात्रंदिवस भीति वाटणें अगदीं स्वाभाविक होतें. तो कोणत्या वेळीं काय प्रसंग आणील याचा नेम नव्हता. त्याला स्वतःच्या अब्रूची किंमत नाहीं तो मनुष्य काय करणार नाहीं?

ती सर्व रात्र विमलेनें खरोखरीच तळमळून काढिली. तिच्या अंगांत वाढत्या प्रमाणावर ताप होता. डोकेंही सारखें दुखतच होतें. सकाळीं तिनें उठण्याचा प्रयत्न केला, त्याबरोबर तिच्या उजव्या जांघेंत दुखूं लागलें. तिनें हातानें ती जागा चाचपून पाहिली. तिच्या हाताला गांठ लागतांच तिच्या

अंतःकरणाचें पाणी झालें. मटकन् ती मागें बिछान्यावर पडली. तिच्या सर्वांगाला दरदरून घाम सुटला. आपणास प्लेग झाला अशी आतां तिची पूर्ण खात्री झाली. मनाची इतकी खात्री झाल्यानंतर तिच्या मनांत कोण-कोणते भयंकर विचार येऊं लागले असतील याचा वाचकांनींच विचार करावा. परंतु वस्तुस्थिति मात्र तशी नव्हती. रात्रीं दरवाजा बंद करतांना तिचा पाय लचकला त्याची ती गांठ होती. परंतु विमलेचा समज मात्र निराळा झाला. आदल्या दिवशी डोकें दुखणें, सितारामानें शंका घेणें, रात्रीं ताप भरणें आणि आतां गांठ येणें इतक्या गोष्टी प्लेगच्या दिवसांत आजु-बाजूला प्लेगच्या केसिस होत असतां एकत्र झाल्यावर विमलेचा तसा समज होणें स्वाभाविक नाहीं असें कोण म्हणेल? आणि अशा रीतीनें गैरसमज होऊन किती तरी संख्या नुसत्या भीतीनें आजपर्यंत प्लेगला बळी पडली आहे.

आपणास प्लेग झाला असें समजून विमला गडबडून गेली असतां बाहेर कोणी दरवाजा खडखड वाजवूं लागलें. त्यावेळीं आठ वाजून गेले होते. वास्तविक इतक्या वेळेंत विमलेचा अर्धा स्वयंपाक तयार होत असे. बाहेरून दरवाजा वाजतो त्याअर्थी आपण अद्यापि उठलों नाहीं म्हणून शेजारीं चंद्राबाईकडे काम करण्याकरितां येणारी बाई आली असावी, असें तिला वाटलें. ती आली आहे तेव्हां तिच्याकडून रात्रीचीं खरकटीं भांडीं घासून घ्यावीं आणि तिला आपल्या सोबतीकरितां ठेवून घ्यावी असा विचार तिच्या मनांत आला. ती मोठ्या कष्टानें उठली. तिला धडपणें उभें रहातां येईना. जांघेंतील गांठ जास्त दुखूं लागली. तरी देखील मोठ्या जुलमानें चालत जाऊन दरवाजा उघडला. आणि पहाते तो बाहेर सिताराम उभा! तो तिच्या मागें लागलेला शनीच होता.

"कां विमलाबाई, राग गेला का? माझ्यावर तुम्ही कितीही रागावलांत तरी मी येणार!—कां अशा लंगडतां कां? तापबीप आला आहे काय? पाहूं—"

विमलेला जास्त वेळ उभें राहवेना. ती तशीच लंगडत जाऊन पुनः बिछान्यावर पडली. तिच्या मागें सिताराम आंत आला. आणि त्यानें निर्भिड-पणानें तिचा हात धरला, त्यावेळीं विमलेच्या अंगांत ताप होता. तिचा हात गरम लागलेला पाहून सिताराम म्हणाला, "अरे! तुझ्या अंगांत तर सणसणीत ताप आहे! पण कुठें दुखतबिखत तर नाहींना!—सांग. आतां अशी चोरून ठेवूं नकोस! वेळींच उपचार केला तर ठीक. नाहींतर—पहा बुवा!"

" माझ्या येथें दुखतें ! " नाइलाजास्तव भीत भीत विमलेनें उत्तर दिलें.

" आणि गांठबीठ आली आहे कीं काय ?—पाहूं मला—"

सितारानें आपला हात पुढें केला. परंतु त्याला हातानें स्पर्श करूं देणें तिला चमत्कारिक वाटूं लागलें. तेव्हां तो म्हणाला, " मला पाहूं दे. मी पाहिल्याशिवाय काय समजूं ? "

" होय हो. गांठ आली आहे. आतां मी काय करूं ? " अगदीं हताश होऊन विमला म्हणाली.

" पण मला पाहूं दे. मी वरूनच हात लावून पहातों. "

नाइलाजास्तव विमलेनें त्याला आपल्या अंगाला स्पर्श करूं दिला सितारामानें क्षणभर ती जागा बोटानें चांचपून पाहिली. आणि तो विचार करीत राहिला. तिला प्लेग झाला आहे असें त्यालाही वाटलें. आतां पुढें काय करावें याबद्दल थोडावेळ विचार करून तो म्हणाला, " मी आतां ह्या गाठीवर एक रामबाण औषध घेऊन येतों. ही गांठ प्रथम जाळून टाकली पाहिजे. गांठ एकदां गेली म्हणजे ताप हा हां म्हणतां उतरेल." असें म्हणून तो मुकाट्यानें उठला आणि बाहेर पडला. सिताराम गेल्यावर विमलेला थोडा धीर आला. ती त्याचा मनापासून जरी तिटकारा करीत होती, तरी आतां तिच्यावर प्रसंगच असा होता कीं, तिला आपला सर्व राग गिळणें भाग पडलें. प्रसंग मनुष्याला शरण आणतो असें म्हणतात तें खरें आहे.

थोड्या वेळानें सिताराम एक औषधाची लहानशी बाटली घेऊन आला. विमलेला आतां धीर आला. बाटली पुढें करून तो म्हणाला, " हं—आतां हें औषध लावलं म्हणजे ती गांठ जळून जाईल. हें फार जालिम औषध आहे. लावतांच एकदम आग होईल पण ती तुला सहन केली पाहिजे. ह्या औषधाला ' नॅट्रिक ॲसिड ' म्हणतात. हं—चल. तुझें वस्त्र फेड—"

" कसं लावायचं तें मला सांग. मी लावतें. "

" आतां लाज धरून कसं चालेल ? अशी लाज धरलीस तर मरशील. "

परंतु वस्त्र दूर करून सितारामाला औषध लावूं देण्यास विमलेचें मन तयार होईना. ती कांहींच बोलेना असें पाहून सिताराम तिच्याकडे पहात पुढें म्हणाला, " आणि मला ह्या औषधाची किंमत द्यावी लागेल हें आहेना तुला ठाऊक ? "

" मी तुमचा काय खर्च होईल तो देईन. "

" मग तुझ्याजवळ पैसे आहित तर! कुठें आहेत?—किती आहेत?"

" माझ्या ट्रंकमध्यें आहेत चारएक रुपये ते संपले तरी माझा पगार येणार आहे."

सितारानें बाजूला असलेली ट्रंक उघडली. आणि वरच असलेलें पाकिट हातांत घेतलें. विमला त्याच्याकडे पहात होती. थोड्या वेळानें तो हंसत म्हणाला, " ही किंमत नाहीं. अग, तुझ्या जिवापुढें मला पैसे अधिक नाहींत. मी तुझ्याजवळ किंमत मागतों ती–ती–" असें म्हणून ती हंसत पुढें म्हणाला, " एक गोडसा—"

" सिताराम, तुम्हाला कांहीं मनुष्यपण आहे काय?" बोलवत नव्हतें तरी रागाच्या आवेशांत ती मोठ्यानें ओरडून म्हणाली, " मी अशी असहाय्य स्थितींत पडलें असतां तुम्हाला असा फाजिलपणा सुचतो काय? जा—मला तुमचें औषध नको. मी अशी तडफडून मेलें तरी हकत नाहीं."

" तुला असं कसं मरण येईल. मला तूं कां झिडकारतेस? आतां मी तुझें बळेंच चुंबन घेतलें तर तूं काय करशील? मी जी इतकी धांवपळ करून औषध घेऊन आलों तो उगाच नाहीं. उद्यां तूं मेलीस तर माझी इच्छा अपुरी राहील. दुसरं तिसरं कांहीं नाहीं पण चुंबन तर खरं!"

" शिव! शिव! किती नीच आणि निर्लज्जपणाचें हें भाषण!"

" चल—आतां उगाच हट्ट घेण्यांत काय अर्थ आहे? मी हे एवढे पैसे खर्च करून औषध घेऊन आलों तें उगाच वाटतं?" असें म्हणून पाजी मनुष्यानें निर्बल आणि असहाय्य विमलेचा हात धरून तिच्या तोंडाजवळ आपलें तोंड नेलें आणि तिच्या गालाचें चुंबन घेण्याचा प्रयत्न केला. आतां मात्र हालचाल केल्याशिवाय तिला गत्यंतरच नव्हतें. ती रागानें अगदीं संतप्त झाली होती. त्यानें तोंड जवळ करतांच विमलेनें आपल्या अंगांतील सर्व बळ एकवटून उजव्या हातानें त्याच्या पुढें आलेल्या तोंडावर जोराचा फटका मारला. त्याबरोबर तो मागें पडला आणि हातांतील नॅट्रिक ॲसिडची बाटली फुटून सर्व ॲसिड त्याच्या तोंडावर, छातीवर आणि उजव्या खांद्यावर सांडलें. थोडक्यांत चुकलें नाहींतर त्याचा डोळाच फुटायचा! ॲसिडचा स्पर्श होतांच त्याच्या अंगाची होळी झाली. त्यानें मोठ्यानें किंकाळी फोडली तोंच दरवाजा उघडून मनोहर मिसाळ आंत आला. त्याच्या हातांत एक लहान पाकिट होतें. त्याला पाहतांच दीन स्वरानें पण

आश्चर्यानें विमला म्हणाली, " कोण मनोहरराव ! मला ह्या चांडाळाच्या हातून सोडवा हो ! "

मनोहरानें प्रथम सितारामाला एक लाथ मारली आणि त्याची मान धरून म्हटलें, " सुव्वर, ऊठ ! "

पण सितारामाची काय स्थिती होती ? त्याच्या अंगाची लाही होत होती. ईश्वर दीनांचा रक्षक आहे. पाप्यांना तो कशी शिक्षा करील आणि आपली न्यायाची लीला दाखवील त्याचा मानवांना बोध होणें शक्य नाहीं. सितारामाला त्याच्या सर्व अपराधांची शिक्षा लावण्याकरितांच त्याला नॅट्रिक ॲसिड घेऊन येण्याची बुद्धि झाली. आणि तीच बाटली त्याला शिक्षा देण्याला कारण झाली. ज्या भागावर ॲसिड सांडलें ती जागा तात्काळ जळून तेथें जन्माचे काळे डाग पडले. त्याचें तोंड, गाल आतां विद्रूप दिसूं लागलें. मनोहरानें त्याच्या मानेला हिसके देऊन त्याला उभें केलें. आतां मात्र त्याची सर्व रग जिरली. मनोहरानें त्याच्या दुःखाकडे लक्ष न देतां कुशींत दोन चार एकामागून एक गुद्दे लगावून त्याला खोलीच्या बाहेर घालवून दिलें. नंतर त्यानें विमलेकडे आपलें लक्ष पोंचविलें. हा इतका प्रकार होईपर्यंत अत्यंत श्रमामुळें तिला ग्लानि आली होती.

" विमला, तूं मला न कळवितां इकडे एकदम निघून आलीस हें तुला रुचलं का ? पण तूं अशी अंथरुणावर कां पडून आहेस ? तुला काय होत आहे ? ह्या आठ पंधरा दिवसांत तुझी ही काय दशा झाली आहे ! बोल— तुला काय होत आहे ? "

" मला प्लेग झाला आहे. "



## २५ डाव साधला

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मनोहर विमलेकडे गेला. त्यावेळीं म्हातारी जया दरवाजांतच त्याला भेटली. आधल्या दिवशीं रात्रीं विमला तिच्या घरून गेल्यामुळें तिला एकटें एकटें वाटत होतें. बिचारी आतां एकटीच राहिली. मनोहरानें विमलेची चौकशी केली तेव्हां ती म्हणाली, " काल रात्रीं ती नगर सोडून गेली, तिनें जातांना तुमचे हे धान्याचे रुपये मजजवळ देऊन

ठेविले आहेत. ती कुठें गेली तें मात्र मला सांगितलें नाहीं." असें म्हणून तिनें पदराच्या गांठी सोडून पांच रुपयाची नोट काढिली आणि ती पुढें केली. मनोहरानें नोट हातांत घेतली आणि तिच्याकडे पहातच राहिला. विमला कुठें गेली असेल, याबद्दल तो विचार करीत होता. म्हातारीला त्यानें निरनिराळ्या रीतीनें विचारून पाहिलें परंतु विमला कुठें गेली हें तिला माहित नसल्यामुळें ती तरी काय सांगणार ? शेवटीं मनोहर परत गेला. पहिले दिवशीं त्याच्या मनांत तेच तेच विचार येत होते. एक दिवस गेल्यावर त्या विचाराची तीव्रता कमी झाली. दुसऱ्या दिवशीं त्याला एकदोनदां विमलेची आठवण झाली. तिसऱ्या दिवशीं जवळजवळ तो विमलेला विसरला. अशा रीतीनें आठ दिवस निघून गेल्यावर एकदां तो त्या रस्त्यानें जात असतां पुनः त्याला विमलेची आठवण झाली. त्यावेळीं तो स्वतःशीं म्हणाला, कुठें गेली असेल ही पोर कुणास ठाऊक ! बरी होती. हातांत आली असती तर कांहीं वाईट नव्हती ! पण आतां जाऊं द्या, येथें असती तर पाहिला असता प्रयत्न करून ! पण आतां काय ?'

ह्या स्वगत विचारावरून मनोहर मिसाळ विमलेकरितां कोणत्या उद्देशानें प्रयत्न करीत होता याची सहज कल्पना होण्यासारखी आहे. पुढें आणखी चार दिवस गेल्यावर त्याला डेपोच्या कामाकरितां पुण्यास जाण्याचा प्रसंग आला. त्यावेळीं कांही कामानिमित्त तो मिशनमध्यें गेला. तेथें बाईजवळ बोलत असतां ती म्हणाली, मिस्टर मनोहर, तुम्ही पुण्यास जातच आहांत तर मुद्दाम पंचहौदमिशनमध्यें जाऊन मिस विमलची चौकशी करा. आज दहा दिवस झाले तिचें सुखरूप पोंचल्याबद्दल पत्रही आलें नाही. सध्यां पुण्यास फार प्लेग आहे म्हणून फार भीति वाटते. "

विमला पुण्यास गेली आहे काय ? मी एकदां तिची चौकशी केली परंतु ती रहात होती तेथील म्हातारीला कांहीं सांगतां आलं नाहीं.

मनोहरला अकल्पित रीतीनें विमलेचा पत्ता मिळाला आणि त्याप्रमाणें तो सकाळीं पुण्यास उतरतांच प्रथम पंचहौदमिशनमध्यें गेला. तेथें चौकशी केल्यावर त्याला विमलेच्या बिऱ्हाडाचा पत्ता मिळाला. तेव्हां तो तसाच तिच्या बिऱ्हाडीं आला होता. तो अशा ऐनवेळीं पुण्यांत आल्यामुळें त्याला सितारामाच्या हातून पुनः विमलेची सुटका करतां आली. सितारामाची यथास्थित खबर घेऊन तो आतां विमलेच्या अंथरुणाजवळ बसला आणि

तिला विचारूं लागला. त्यानें विचारलेल्या प्रश्नाचें ' मला प्लेग झाला आहे ' असें विमलेनें उत्तर देतांच त्याच्या छातींत चर्र झालें. त्यानें तिच्या कपाळाला हात लावून पाहिला त्यावेळीं तिच्या अंगांत बराच ताप होता. आतां पुढें काय करावें हा एक मोठा प्रश्न होता. तो पुण्यास ज्या कामासाठीं आला होता तें त्याचें डेपोचें काम अद्यापि त्याला करावयाचेंच होतें. आणि तें काम होतांच एक दोन दिवसांत त्याला परत नगरास जाण्याची घाई होती. परंतु इकडे विमला प्लेगनें पडली आहे तिला टाकून कसें जावें हा एक आणीबाणीचा प्रश्न त्याच्यापुढें होता. बराच वेळ विचार केल्यावर विमलेजवळच रहावयाचें असें त्यानें शेवटीं ठरविलें. आणि तो म्हणाला, " विमला, तूं येथें येऊन व्यर्थ आपला जीव धोक्यांत मात्र घातलास ! पण आतां काय ? कांहींतरी इलाज केला पाहिजे. "

" मनोहरराव, मला प्लेग झाला आहे. आणि आतां मी मरणार—"

" छे ! असं अभद्र बोलूं नकोस. मी असा ऐनवेळीं येथें आलों आहे, यावरून ईश्वराची योजना कांहींतरी निराळीच असली पाहिजे, तूं नगर सोडल्यापासून मी तुझी किती तरी चौकशी केली. मला अन्न गोड लागेना, रात्रीं झोंप येईना किंवा कामाकडेहि माझें लक्ष लागेना. परंतु काल सहज मी मिशनमध्यें गेलों असतां तेथें मला तुझा पत्ता कळला. त्याबरोबर मी रात्रीं तेथून निघालों. आतां तूं बिलकूल भिऊं नकोस. मी प्रथम येथल्या एका ओळखीच्या चांगल्या डॉक्टरला घेऊन येतों. आतां प्रयत्न करण्याचं काम माझं ! " असें म्हणून तो उठला. आणि डॉक्टर घेऊन येण्याकरितां तिला विचारून बाहेर पडला.

विमला त्याचा तिरस्कार करीत होती. परंतु त्यानेंच तिचें दोनदां संकटांतून रक्षण केलें होतें. शिवाय ह्या संकटसमयीं तर तोच तिचा सर्व आधार झाला. त्यानें थोड्या वेळांत एक डॉक्टर आणला. आणि त्यानेंहि ती प्लेग केस आहे असेंच मत दिलें. प्लेगच्या भीतीनें विमलेच्या मनांत चांगलेंच ठाणें दिलें होतें. त्या भीतीमुळें तिचा ताप वाढूं लागला. पहिले तीन दिवस तर ती जवळजवळ बेशुद्ध अवस्थेंतच होती. मनोहर रात्रंदिवस तिच्या उशाजवळ बसलेला होता. त्याला तिचें सर्व काम करावें लागत होतें. ह्या तीन दिवसांत पायाच्या लचकेमुळें जांघेंत आलेली गांठ बरी झाली. आणि तिचा तापहि उतरूं लागला. गांठ नाहींशी होतांच ती प्लेगची गांठ आपल्या

औषधानें बरी झाली असें डॉक्टराला वाटलें आणि ' आतां भिण्याचें कारण नाहीं; ही केस मी खात्रीनें बरी करतों , असें त्यानें छातीला हात लावून सांगितलें. पुढें हळुहळू चारसहा दिवसांत विमलेचा ताप हटला. ती आतां अंथरुणावर बसूं उठूं लागली होती. मनोहरानें तिच्याजवळ बसून तिला पेजपाणी द्यावें, तिचा हात धरून मोरीवर न्यावें, आंघोळीच्या वेळीं तिचे धुवावयाचे असल्यास दोन कपडेहि धुवावे असा क्रम चालविला होता. आतां ती मनोहराच्या पूर्ण उपकारांत सांपडली.

मनोहरानें आपल्या मालकाला पत्र लिहून एक महिन्याची रजा काढली होती त्या रजेचा पुष्कळ फायदा झाला. आतां त्याला आपला अंतिम हेतू साध्य होईल अशी पुष्कळ आशा वाटत होती. विमलाहि त्याचे उपकार जाणून होती. आपण ज्याकरितां नगर सोडलें त्याबद्दल तिला ह्या महिन्यांत कांहींच वर्तमान कळलें नव्हतें. आपण नगर सोडल्यामुळें नरसिंगरावाची काय स्थिति झाली असेल, ते आतां काय करीत असतील हें कळावें म्हणून तिच्या मनाला एक प्रकारची तळमळ लागली होतीच. शेवटीं एकदां बोलतां बोलतां ' नगरची काय हकीगत आहे ! ' असें तिनें मनोहराला विचारलें. ह्या तिच्या प्रश्नांत ती कोणत्या उत्तराची अपेक्षा करीत आहे हे त्या धूर्त मनोहरानें जाणलें आणि तसेंच जपून तिला उत्तर दिलें. तो म्हणाला, " मी तेथें असतांना मला कांहीं विशेष दिसून आलें नाहीं. परंतु तुला जर बापुसाहेबांकडील कांहीं हकीकत कळावी अशी इच्छा असेल तर मी आज माझ्या एका मित्राला पत्र लिहून त्याचें उत्तर येथें तुझ्या नांवावर मागवितों म्हणजे सर्व कांहीं कळेल. " विमलेला हा सर्व विचार पसंत पडला. परंतु मनोहरानें म्हटल्याप्रमाणें पत्र मात्र लिहिलें नाहीं. अलीकडे चारपांच दिवस तो सकाळसंध्याकाळ एका हॉटेलमध्यें जेवणाकरितां जात असे आणि तेथून एका भांड्यांत विमलेकरितां कांहीं तरी खाण्याचे पदार्थ घेऊन येत असे. ह्यापूर्वी मात्र तो स्वतःच विमलेच्याजवळ बसून करतां येतील तसे अर्धेकच्चे पदार्थ करून खात असे. कारण विमलेला एकटीच सोडून जाण्याची सोय नव्हती.

तिसऱ्या दिवशीं हॉटेलमध्यें गेल्यावर त्यानें विमलेच्या नांवावर स्वतःला उद्देशून एक लांबलचक पत्र लिहिलें. आणि तें पोष्टांत टाकलें. तें पत्र विमलेच्या हातीं केव्हां पडेल याचा अंदाज ठेवून त्यावेळीं तो मुद्दाम कांहीं

कामाचें निमित्त करून बाहेर गेला. इकडे विमला एकटीच अंथरुणावर पडली होती. तिला आतां ताप येत नव्हता. परंतु तीं मनस्वी अशक्त झाली होती. ती विचार करीत पडली असतां पोष्टाच्या शिपायानें तिचें नांव घेऊन खिडकींतून एक पत्र आंत टाकलें. मनोहरानें म्हटल्याप्रमाणें तें पत्र नगरहून आपल्या नांवावर आलें आहे असें तिनें चटकन ओळखलें. पत्रांत काय काय मजकूर आहे हें जाणण्याची तिला उत्कंठा असल्यामुळें पत्र खरोखरीच कोठून आलें आहे तें न पहातां तिनें फोडलें आणि वाचण्यास सुरवात केली. तें पत्र खालीं लिहिल्याप्रमाणें होतें. "

प्रिय मिस्टर **मनोहरराव मिसाळ** यांस.

न. वि. वि. आपलें पत्र पावलें. आपण पुण्यांत दोन दिवसांच्या मुदतीनें जाऊन इतके दिवस राहिलां हें पाहून आश्चर्य आणि भीति वाटत आहे, कारण हल्लीं पुण्यांत प्लेग आहे. अशावेळीं तेथें जास्त दिवस रहाणें घोक्याचें आहे तथापि तुमचें तसेंच महत्त्वाचें काम असल्याशिवाय तुम्ही स्वतःचा जीव इतक्या घोक्यांत घालणार नाहीं अशी माझी खात्री आहे—' इतकें पत्र वाचून विमला क्षणभर स्वतःशीं विचार करूं लागली. ती स्वतःशीं म्हणाली, ' ही गोष्ट मात्र खरी आहे. मनोहररावांनीं माझ्याकरितां हें घाडस करून आपला जीव घोक्यांत घातला आहे खरा! नाहींतर प्लेगच्या दिवसांत प्रत्यक्ष भाऊ भावाला टाकून दूर जातात. आणि आम्ही!—वास्तविक मी मनोहर-रावांची कोण आणि ते माझे कोण? उलट मीच त्यांचा तिरस्कार करीत असें. पण ते पहा आपला जीव संकटांत घालून माझ्याकरितां येथें राहिले. त्यांचे माझ्यावर हे किती तरी उपकार आहेत—' नंतर ती तें पत्र पुढें वाचूं लागली—' तुम्हीं मला बापुसाहेबांच्या घरची हकीकत विचारली आहे. ती हकीकत अशी आहे कीं, त्यांचा भाचा नरसिंगराव हा हल्लीं त्यांच्या घरींच रहात असतो. त्यांचें आणि बापु-साहेबांची मुलगी कमला हिचें लग्नाचें निश्चित झालें आहे. आणि हल्लीं त्यांच्या लग्नाची जारीनें तयारी सुरू आहे. मध्यंतरी विमला या नांवाच्या मुलीविषयीं कांहीं अफवा उठल्या होत्या. त्या मुलीवर नरसिंगरावाचें प्रेम 'होतें असेंहि माझ्या ऐकण्यांत आलें होतें. परंतु ती बाटगी मुलगी एका महिन्यापूर्वी येथून एकाएकीं नाहींशी झाली. तेव्हांपासून नरसिंग-

रावानें तिचा नाद सोडून दिला. त्याचें कमलेबरोबर येत्या रविवारीं लग्न होईल. आपण जर इतक्यांत येथें याल तर तो समारंभ आपणास पहावयास मिळेल. ह्या लग्नाप्रीत्यर्थ बापुसाहेबांनीं बराच खर्च करण्याचें योजिलें आहे, असें चाललेल्या तयारीवरून वाटतें. तें जोडपें रोज फिरावयास जातांना त्यांची गाडी आमच्या घरावरून जात असते. तेव्हां मी त्यांना पाहतों. माझ्या दृष्टीनें तो अगदीं योग्य जोडा जुळला आहे असें वाटतें. नरसिंगरावाच्या बापाच्या इस्टेटीबद्दल कांहीं भानगड आहे. मला ती नीटशी माहिती नाहीं. तथापि ह्या लग्नामुळें ती सर्व इस्टेट त्याला मिळणार आहे. आणि त्याबद्दल कालच त्यांचे नावें कागदपत्र झाले असेंहिं मला कळलें आहे. अशी एकंदर बापुसाहेबांच्या घरची हकीकत मला चौकशीअंतीं कळली ती लिहिली आहे. ह्या परवांच्या मुहूर्तावर आमच्या भाचीचेंहि लग्न आहे. आपण त्याप्रसंगीं यावें अशी इच्छा आहे. कळावें, लोभ असावा.

आपला—

शिवरामशास्त्री '

विमलेनें हें पत्र समग्र वाचलें. क्षणभरच तिची चर्या बदलेली दिसली. परंतु तात्काल तिच्या चर्येवर एक प्रकारची समाधानाची छटा दिसू लागली. ती गंभीर मुद्रेनें त्या पत्राकडे पहात स्वतःशींच म्हणली, " माझा हेतू आतां खात्रीनें सिद्धीस जाणार. नरसिंगरावांचें कमलेबरोबर लग्न झाल्यावर ते खरे खरे सुखी होतील. आणि त्यांतच मींहि सुख मानलें पाहिजे. मी मात्र आतां जन्मभर दुःखी रहाणार आहें. मी जें सुख भोगलें असतें तें सुख आतां कमला भोगील. ती खरी भाग्यवान् आहे. तिनें खरोखरीच मागल्या जन्मीं पुष्कळ पुण्य केलें असलें पाहिजे. म्हणूनच ह्या जन्मीं तिला नरसिंगरावांची जोड मिळाली. " आपला हेतु साध्य झाला या विचारांत ती बसली असतां मनोहर बाहेरून आला. त्यानें येतांना कांहीं फळफळावळ आणिली होती. त्यानें आंत येतांच विमलेच्या हातांत पत्र पाहून आपण ठरविल्याप्रमाणें तें तिच्या हातांत जाऊन तें तिनें वाचलें म्हणून त्याला समाधान झालें.

" आलं का पत्र नगराहून ? " मनोहरानें हातांतील फळें खालीं ठेवून विचारलें, " काय खबर आहे नगरची ? तूं वाचलंस का तें पत्र ?—पाहूं, काय लिहिलं आहे शास्त्रीबुवांनीं तें मला वाचूं दे. " असें म्हणून त्यानें हात

पुढें केला. विमलेनें मुकाट्यानें तें पत्र पुढें केलें. मनोहरानें तें पत्र वाचलें आणि क्षणभर विचार करीत तो म्हणाला, "एकूण नरसिंगरावाचें लग्न परवां आहे म्हणायचं! शेवटीं बापुसाहेबांनीं आपला डाव साधला म्हणावयाचा! असो. ह्या ऋणानुबंधाच्या गोष्टी आहेत. त्याच्या नशिबीं ती होती आणि तिच्या नशिबीं तो होता, असंच म्हटलं पाहिजे. पण विमला, तूं मात्र मध्यंतरीं उगाच त्याच्या आशेवर बसली होतीस."

" मी कोणाचीच आशा केली नव्हती आणि पुढें करणारहि नाहीं."

" केली नव्हतीस असं कां बरं म्हणतेस? पण तें आतां कशाला! आतां पुढला विचार काय? तूं पुढें आशा करायची नाहीं असं म्हणतेस याचा अर्थ काय?"

" त्यांत अर्थ कसला? मी आतां कुणाची आशा करावी?"

" असं कां बरं म्हणतेस? तुला असं निराश व्हायला काय झालं? मी माझ्या सर्व आशा आणि आकांक्षा तुझ्यावर ठेविल्या आहेत. तुझ्या मनांतूनच नसेल तर माझं बोलणंच खुंटलं! मीही तुझ्याकरितां रात्रंदिवस तळमळ चालविली आहे. ती कोणत्या तरी आशेनें चालविली आहे असें मात्र तूं समजूं नकोस. मी आतांपर्यंत तुझ्याकरितां केलें तें आणि पुढेंहि करीन तें सर्व निरपेक्ष प्रेमानेंच करीन. पण इतकी गोष्ट मात्र खरी कीं, तूं माझी निराशा केलीस तर माझं सर्व आयुष्य दुःखांत जाईल. माझ्या अंतःकरणांत किती प्रेम सांठविलं आहे तें तुला कळणं शक्य असतं तर किती बहार झाली असती!—विमला, मी आज इतके दिवस तुझ्याजवळ रात्रंदिवस बसलों आहें, माझा स्वभाव, माझं वर्तन आणि तुझ्या आरोग्याकरितां माझ्या जिवाची चाललेली तळमळ तूं पाहिली आहेस ना?"

" मनोहरराव तुमचे माझ्यावर अगणित उपकार झाले आहेत. ह्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें खरोखरीच तुम्ही स्वतःचा जीव धोक्यांत घालून माझा जीव वाचविला आहे. नाहींतर मी येथें कुजून एकटीच मेलें असतें. तुम्ही माझ्याकरितां येथें राहिलां. एका क्षणाचीहि तुम्हाला विश्रांति मिळाली नाहीं. पाण्यासारखा पैसा खर्च केलात, हे तुमचे उपकार माझ्या हातून कधींतरी फिटणार आहेत काय? मी काय करूं म्हणजे तुमचे उपकार फिटतील?"

" मी काय सांगूं? माझ्या उपकारांची फेड करावयाची म्हणूनच तुला कांहीं करावयाचें आहे असं मी कसं म्हणूं? मी जर तुला कांहीं करावयास

सांगितलं तर आतांपर्यंत मी केलेल्या सर्व कृत्यांवर पाणी पडल्यासारखं नाहीं का होणार ? "

" असें उलट्या बाजूनें पाहूं नका. माझ्याकडून होण्यासारखं असेल तें मला सांगा ! मनोहरराव, मी अशी कृतघ्न आहें का ? मला अंतःकरण नाहीं असं तुम्हाला वाटतं का ? तुम्ही माझ्याकरितां आपल्या जिवाचं पाणी करीत आहांत हें मला दिसत नाहीं असं कां तुम्हाला वाटतं "

" ह्या तुझ्या गुणामुळेंच तर तूं मला आपलंसं करून घेतलं आहेस ? विमला, मला दुसरं कांहीं नको. तूं माझी हो. मी तुझ्याकरितां प्राण द्यायला तयार आहें. मला निराश करूं नकोस. पहा—मी तुझ्यामुळें अगदीं दीन झालों आहें—" असें म्हणून त्यानें तिच्यापुढें, " गुडघे टेकले आणि तिचा उजवा हात धरून पुढें म्हटलें, " माझ्यावर तुझें प्रेम नसेल पण तें हळुहळू उत्पन्न होईल. मी कृतीनें तुला प्रेम करावयास लावीन. तूं माझी झाल्यावर तुला दुःखाचा स्पर्शही होणार नाहीं. मी तुला सुखांत ठेवीन. तुझ्या शब्दाबाहेर मी जीव गेला तरी वागणार नाहीं, बोल–विमल–बोल. माझी तुला दया येत नाहीं का ? मी तुझ्याजवळ ही भिक्षा मागत आहें. बोल–"

विमला अगदीं कैचींत सांपडल्यासारखी झाली. तिला ' हो ' हि म्हणतां येईना आणि ' नाहीं ' हि म्हणतां येईना. मनोहरानें पसरलेलें जाळें अगदीं मजबूत होतें. त्यांतून तिला सुटका करून घेतां येणें शक्य नव्हतें. शेवटीं ती म्हणाली, " मनोहरराव, उठा. तुम्ही म्हणतां तशी गोष्ट कशी होईल ? "

" विमला, तूं मनांत आणशील तर अशक्य असं कांहींच नाहीं. तूं कदाचित् धर्माची बाब पुढें करशील; पण आतां धर्म तरी काय राहिला आहे ? आज इतके दिवस मी तुला स्वतः अन्न करून घातलें. जर अन्नांत आणि खाण्यापिण्यांत धर्म असेल तर मग जगांत धर्मच नाहीं असं म्हणावं लागेल. तुला ह्या धर्माच्या पायीं किती कष्ट आणि हाल सहन करावे लागले ! शेवटीं मिशननेंच तुझी व्यवस्था केली ना ? मग आतां तूंच सांग, धर्म म्हणून काय आहे ? आपण शुद्धचित्तानें वागलों म्हणजेच धर्म आहे. ईश्वराला तेंच मान्य आहे."

तुम्ही म्हणतां ती गोष्ट खरी आहे ! पण मनोहरराव, मला या गोष्टीचा विचार केला पाहिजे. वास्तविक मी माझ्या चामड्याचे जोडे करून तुमच्या पायांत घातले तरी मी तुमच्या उपकारांतून बाहेर पडणार नाहीं. तरी देखील

तुम्ही सांगतां ती गोष्ट करावयाची म्हणजे त्यांत प्रेमाचा मोठा प्रश्न आहे. मी तुमच्याजवळ प्रांजलपणानें कबूल केलें आहे कीं, माझें तुमच्यावर प्रेम नाहीं—"

"मी त्याला इतकें महत्त्व देत नाहीं. मला तूं पाहिजे आहेस. प्रेम मागाहून—"

"मी तुमच्या म्हणण्यास राजी आहें पण—"

"बस्स्! मला दुसरं कांहीं नको." असें म्हणून मनोहरानें तिचे दोन्ही हात आपल्या हातांत धरले आणि तिला जवळ ओढून आपल्या हृदयाजवळ घट्ट धरलें. "अहाहा! विमला माय डियर विमला, आज तूं मला जगांतील सर्व सुखाच्या शिखरावर नेऊन बसविलेंस!" असें म्हणून त्यानें तिच्या गालाचें चुंबन घेऊन तिला आपल्या बाहुपाशांतून सोडलें.

हा प्रकार इतक्या थोड्या अवधींत झाला कीं, विमलेला कांहीं एक हालचाल करतां आली नाहीं. मनोहरानें तिला जवळ ओढतांच तिच्या छातींत एक धक्का बसला. आपण काय करतों हें देखील तिला कळलें नाहीं. परंतु, त्याच्या बाहुपाशांतून सुटतांच तिच्या सर्वांगाला कंप सुटला. एक वेळ अशी येऊन गेली होती कीं, त्यावेळीं नरसिंगरावाच्या बाहुपाशांत ती बद्ध झाली होती. त्यांच्या ओठांचें मीलन झालें होतें. परंतु, त्या वेळीं क्षणापुरतेंच तिनें जें एकप्रकारचें स्वर्गसुख अनुभविलें होतें, तिला जो अननुभूत आनंद झाला होता त्याच्या अगदीं उलट आतांचा प्रकार घडला. मनोहरानें तिला बाहुपाशांत धरतांच तिच्या रक्ताचें पाणी झालें. तिच्या गालाला त्याचा ओंठ मिळतांच तिला अग्निस्पर्श झाल्याचा भास झाला. ती ज्ञानशून्य बनली. परंतु मनोहरानें मात्र आपला डाव साधला.



## २६ लग्न झालें

**एखादा** गारोडी आपल्या पोतड्यांतील कळीची बाहुली जसा नाचवितो, त्याप्रमाणें विमलेची स्थिति झाली. मनोहराला अत्यंत आनंद झाला. त्यानें मध्यंतरी विमलेनें नगर सोडल्यावर तिचा नाद सोडून दिला होता. परंतु त्याचें नशीब शिकंदर होतें. अकल्पित रीतीनें त्याला विमलेचा पत्ता लागून

थोड्या दिवसांच्या प्रयत्नांत त्याचा डाव सफाईदार रीतीनें साधला. त्यानें त्याच दिवशीं बाजारांत जाऊन एक सोन्याची आंगठी खरेदी केली आणि ती ' एंगेजमेन्ट रिंग ' म्हणून विमलेच्या बोटांत घातली. ती आंगठी बोटांत घातली असतां विमलेला चमत्कारिक वाटलें तिला आपलें बोट तुटून पडलें असा क्षणभर भास झाला. त्या रात्रीं तिला झोंपही लागली नाहीं. विचारांनीं तिची पाठ पुरविली. आपण मनोहराबरोबर लग्न करण्यास कबूल झालों याचें तिला अद्यापि आश्चर्य वाटत होतें. आपलें त्याच्यावर प्रेम नाहीं, आपणास तो आवडत नाहीं, असें असतां केवळ त्याच्या उपकारांत बद्ध होऊन आपणास असें करावें लागलें यांत आपणास कांहीं सुख होणार नाहीं, हें ती जाणून होती. परंतु ज्यानें आपणावर उपकार केले, त्याची फेड मात्र आपण करीत आहोंत, यांतच तिनें सुख मानून घेतलें. धर्माबद्दल आतां तिला कांहींच वाटेना. आपण आतां हिंदू राहिलों काय, ख्रिश्चन झालों काय अगर मुसलमान बनलों काय, सारखेच असें तिला वाटूं लागलें. शंकराचार्यांच्या बहिष्कारामुळें हिंदुसमाजानें तिच्याबरोबर केलेलें वर्तन तिच्या डोळ्यांपुढें होतें. आणि आजपर्यंत मिशनचें तिच्याबरोबर असलेलें वर्तन तिला आठवत होतें. ह्या दोहोंची तुलना केली असतां तिला मिशनच अधिक प्रिय वाटूं लागलें. नरसिंगरावाच्या बाबतींत तिची प्रेमनिराशा झाल्यावर तिला सर्व जग शून्यवत् वाटूं लागलें. आतां केवळ देहांत प्राण आहे तोंवर आयुष्याचे दिवस कसे बसे काढावयाचे, याशिवाय तिला अधिक कांहींच वाटेना. आपण जन्माचे दुःखी झालोंच आहोंत; पण आपणामुळें मनोहर जर सुखी होत आहे तर त्याच्या सुखांत आपण कां व्यर्थ माती कालवावी ? असा विचार करून तिनें आपल्या मनाचें समाधान करून घेतलें. अशा रीतीनें तिनें आपल्या सर्व सुखाचा होम केला आणि मनोहराला रुकार दिला त्या घटकेपासून तिनें स्वतःचें स्वातंत्र्य गमाविलें. आतां तिला स्वतःचें मत राहिलें नाहीं. मनोहर जें कांहीं तिला सांगे त्याला ती मुकाट्यानें होकार देऊं लागली. अशा रीतीनें आणखी चार दिवस गेल्यावर मनोहर तिला म्हणाला, " विमला, आतां पुढं कसं काय करायचं ? तुझी प्रकृति आतां साधारण बरी झाली आहे. आणखी दोनचार दिवसांत तूं हिंडूं फिरूं लागशील अशी मला उमेद आहे. तर माझी इच्छा आतां अशी आहे कीं, आपण आपलें ' म्यारेज '

( विवाह ) येथेंच पंचहौदमिशनमध्यें उरकून घेऊन मिस्टर आणि मिसेस मनोहर मिसाळ अशा जोडीनें परत नगरास जाऊं. "

" पण अशी घाई कशाला ? "

" मग आतां व्यर्थ दिवस घालविण्यांत तरी काय अर्थ आहे ! मी तुला किंचितहि श्रम होऊं देणार नाहीं. याविषयीं तूं बिलकूल काळजी करूं नकोस. एकदां आपलें म्यारेज झालें म्हणजे मग मला तुझ्या सुखाकरितां पुष्कळ गोष्टी हक्कानें करतां येतील. "

" जशी तुमची इच्छा ! "

विमला आपणाबरोबर जास्त बोलत नाहीं, हें मनोहराच्या लक्षांत आलें होतें. परंतु तो कांहींच बोलला नाहीं. तापलेल्या तव्यावर एकदां भाकर भाजून घेतली, एकदां आपलें लग्न झालें म्हणजे आपण मोकळे झालों, हा एकच विचार त्याच्या मनांत सारखा घोळत होता. विमलेवर त्याचें प्रेम होतें किंवा नाहीं, हें सांगतां येणें कठिण होतें. ती सुंदर आहे, शिकलेली आहे म्हणून ती आपणास मिळावी म्हणून त्यानें प्रयत्नास सुरवात केली. त्या प्रयत्नांत अनेक अडथळे येऊन शेवटीं त्यानें आपला हेतु साधला. हा डाव जिंकण्याकरितां त्यानें विमलेबरोबर लबाडी केली होती. परंतु त्याबद्दल त्याचें मन त्याला टोंचत नव्हतें. लग्न होऊन विमला आपल्या मालकीची होईपर्यंत आपलें खरें स्वरूप प्रगट करावयाचें नाहीं, असा त्यानें बेत केला होता. आणि त्या बेताला अनुसरून त्यनें विमलेबरोबर मानभावीपणाचें वर्तन ठेविलें होतें.

वरील भाषण झालें त्याचदिवशीं मनोहरानें पंचहौदमिशनमध्यें जाऊन तेथील रेव्हरंड साहेबांची भेट घेतली आणि आपल्या लग्नाकरितां रविवारचा दिवस मुकरर केला. नंतर त्यानें नगरास आपल्या मिशनच्या बाईना पत्र लिहून आपण विमलेबरोबर लग्नाचें ठरविलें आहे तर त्या दिवशीं येण्याविषयीं तिला विमलेच्या वतीनें आग्रहाचें आमंत्रण केलें. लग्नाच्या दिवसाकरितां त्याला स्वतःकरितां आणि विमलेकरितां पोषाख, दोन दागिने, शिवाय दुसऱ्या कांहीं जिनसा खरेदी करावयाच्या होत्या म्हणू त्यानें आपल्या मालकाला पत्र लिहून रुपये मागविले. ह्या गडबडींत त्याचे चार दिवस सहज निघून गेले. रविवार जवळ जवळ येऊं लागला. लग्नाचें नक्की झालें हें कळल्यापासून विमलेच्या अंतःकरणांत एकप्रकारचा धडधडाट सुरू झाला.

ती आतां हिंडूं फिरूं लागून स्वतः कामें करूं लागली होती. कामांत तिचा जो वेळ जाई त्याशिवाय सर्व काळ लग्नाचेच विचार तिच्या मनांत घोळत होते. परंतु तिच्या छातींत चाललेला धडधडाट एका विवक्षित विचारानें थोडावेळ बंद होत असे. आणि तो विचार म्हणजे, नरसिंगराव कमलेबरोबर लग्न करून आतां सुखी झाला आहे, हाच होय. ह्या एका विचारामुळें आपलें कांहीं जरी झालें तरी त्याबद्दल तिला सुखदुःख वाटत नव्हतें. आजारी पडल्यापासून ती पंचहौदमिशनमध्यें कामावर गेली नव्हती. वास्तविक तिची प्रकृति पूर्ववत होऊन आतां चार दिवस झाले होते. आणि चार दिवसांपूर्वी ती मिशनमध्यें जाण्याकरितां निघालीहि होती. परंतु मनोहरानें तिला जाऊं दिलें नाहीं ' आतां नोकरी करण्याची आवश्यकता काय ? आतां तूं माझी झाल्यावर माझ्या सर्वस्वाची मालकीण, तुला नोकरी कशाला ? ' असें सांगून त्यानें तिला मिशनमध्यें जाऊं दिलें नव्हतें. परंतु आज मिशनचा शिपाई तिला मुद्दाम बोलविण्याकरितां आला होता. कारण नगरची मिशनरी बाई तेथें आली होती आणि तिनें विमलेला भेटण्याकरितां बोलाविलें होतें. मनोहरानें तिला बरोबर घेऊन तीं दोघेजणं टांग्यांतून मिशनमध्यें आलीं. बाईनें मनोहराचें हास्यमुद्रेनें अभिनंदन केलें. नंतर विमलेला घेऊन ती आंतल्या खोलींत गेली. मनोहर बाहेरच इतर मंडळीबरोबर बोलत उभा राहिला. इकडे बाईनें विमलेला आंत आणल्यावर क्षणभर तिच्या मुखाकडे न्याहाळून पाहिलें. आणि विचारलें, ' विमला, तुझें हें लग्न जुळलेलें वाचून मला फार आश्चर्य वाटलें. तुझें मनोहराबरोबर लग्न होणार म्हणून मला आनंदच आहे. कारण त्याला पगारही चांगला मिळतो अणि त्याशिवाय त्याची मालकीची कांहीं शेतजमीनही आहे. परंतु तूं लग्नाला कशी तयार झालीस हेंच मला गूढ पडलें आहे, तुझें त्याच्यावर प्रेम आहे का ? त्याच्याशीं लग्न केल्यानें तूं सुखी होशील असें तुझें मन तुला सांगतें का ? "

विमलेनें उत्तर दिलें नाहीं. ती खाली मान घालून बसली होती. तेव्हां बाई पुढें म्हणाली, " विमला, आज इतकीं वर्षे तू मला ओळखीत आहेस, माझें तुझ्यावर किती प्रेम आहे हें तूं जाणून आहेस. मग माझ्याजवळ तुला आपलें मन उघड करण्यास कां बरें संकोच वाटावा ?—सांग मला खरी गोष्ट काय आहे ती कळूं दे. ह्या बाबतींत तुझी फसवणूक तर झाली नाहीं ना. "

" नाहीं. "

" फसवणूक झाली नाहीं तर मग तूं लग्न न करण्याचा निश्चय केला होतास ना? मग हें असें कसें झालें? "

" कसें झालें तें मला सांगतां येत नाहीं. मनोहररावावर माझें प्रेम नाहीं. ही गोष्ट मी त्यांनाही सांगितली आहे. त्यांच्याबरोबर लग्न करण्यानें मी हल्लीं आहे यापेक्षां जास्त सुखी होईन असेंही मला वाटत नाहीं. तथापि त्यांच्याबरोबर लग्न करण्यास मी संमति दिली आहे ही गोष्ट मात्र खरी! "

" असें जर असेल तर मला ज्यास्त चौकशी करण्याचें कारण नाहीं. आतां माझी अंतःकरणापासून इतकीच इच्छा आहे कीं, तूं सुखानें रहावेंस. हें लग्न तुला लाभाचें, सुखाचें आणि आनंदाचें व्हावें. "

" बाई तुमच्या ह्या सदिच्छेबद्दल मी तुमची फार आभारी आहें. "

दुसऱ्या दिवशीं म्हणजे रविवारीं सकाळीं विमलेला बाप्तिस्मा घेण्याकरितां मिशनमध्यें जावें लागलें. त्यावेळीं ' तूं स्वखुशीनें बाप्तिस्मा घेत आहेस ना? ' असें तिला विचारलें. तेव्हां विमलेनें ' होय. ' म्हणून उत्तर दिलें. नंतर धर्मविधि होऊन तिला प्रभू येशू ख्रिस्ताच्या पवित्र उदकांत स्नान घालतांना रेव्हरंड फादर साहेब म्हणाले—

ये, दिव्य आत्म्या, वरूनी; पवित्र हिजला करीं ॥
ये हिच्या अंतःकरणीं, तूं हिजवरी शिक्का मारीं ॥ १ ॥
हे देवा, कृपा दाखवीं, मना बाप्तिस्मा तूं करीं ॥
या लेंकरा तुझें मानीं, हें नांव लीहीं सत्वरीं ॥ २ ॥

नंतर नगरच्या मिशनरीबाईनें विमलेला आपणाजवळ बसवून त्यांचें एका मेजावर जेवण झालें. परंतु ह्या सर्व विधीचा तिच्या मनावर काडीइतका देखील परिणाम झाला नाहीं. एखाद्या बुद्धिभ्रम झालेल्या मनुष्याला जसें सांगावें आणि तो त्याप्रमाणें कोणत्याहि गोष्टींचा विधिनिषेध न धरतां करतो त्याप्रमाणेंच विमलेचें वर्तन होतें. आपण हा सर्व प्रकार आपणास देवाप्रमाणें पूज्य असलेल्या माणसाकरितां—नरसिंगरावाकरितां, त्याच्या वाटेंतून दूर होण्याकरितांच करीत आहोंत अशी तिच्या मनाची दृढ भावना झालेली होती. तिला स्वतःबद्दल सुखदुःख राहिलेंच नव्हतें. आणि ती स्वतःकरितां असें कांहींच करीत नव्हती. तिनें प्रतिज्ञा केल्याप्रमाणें ती मनानें हिंदूच होती.

सायंकाळीं ठरल्याप्रमाणें तिचें आणि मनोहराचें ख्रिस्तीधर्मानुसार परस्प-

रांच्या आणा शपथा होऊन लग्न रजिष्टर झालें. देवळांत विवाहगीताला सुरुवात झाली.

ह्या वधूवरांला आशीर्वचना द्यावें ।
हे दयानिधे, त्वां यांना सांभाळावें ॥ धृ० ॥
त्वां विवाहविधि हा प्रेमें संस्थापीला ।
हे परमपवित्रा, पवित्र त्वां हा केला ॥
ह्या वधुवरांनी दिव्य हेतु जो ह्याचा ।
तुज दावावा तो करुन, दयाळा, साचा ॥
आज हीं प्रेमरज्जूंनीं । बांधिलीं ॥
एक हीं मनें वा दोन्ही । जाहलीं ॥
तुजपुढें पती कीं पत्नी । शोभलीं ॥
तुज गृहांत ह्यांनीं मनीं प्रतिष्ठा पावें ।
हें कृपादान तूं वधूवरां पुरवावें ॥ १ ॥
जशि देहीं बुद्धी गृहीं तशी ही गृहिणी ।
गृहराज्यावरची धन्य मान्य ही राणी ॥
हा पती देहिंचा प्राण तसा निजगेहीं ।
सुखदायक होउन परस्परां उभयें हीं ॥
नव वधूवरां राखाया । यांजला ॥
सांगण्या रोज शिकवाया । यांजला ॥
निर्मेला ख्रिस्तप्रभुराया । प्रेमला ॥
त्वां यांचें गृह तें अपुलें मानुन घ्यावें ।
हे गृह ख्रिस्ताचें असेंच लोकीं व्हावें ॥ २ ॥
हा संसाराचा मार्ग सारखा नाहीं ।
हा कुठें सुखद, हा कुठें व्यास विघ्नांहीं ॥
निर्गर्व सुखीं ह्यां ठेव संकटीं शांत ।
सुखदुःखीं ह्यांचा त्यजूं नको तूं हात ॥
फूलल्या प्रेमवृक्षाला । ईश्वरा ॥
मधु फळें येउं दे याला । ईश्वरा ॥
घेउं दे स्वाद आम्हाला । ईश्वरा ॥
चिरकाल दंपती करोत तुझिये सेवे ।
जग म्हणो निवडिलें कुटुंब अपुलें देवें ॥ ३ ॥

लग्न झालें ! नगरच्या मिशनरीबाईनें विमलेला ‘ म्यारेज प्रेझेंट ’ ( लग्नाचा आहेर ) म्हणून तिला एक सोन्याचें घड्याळ दिलें. इतरही कांहीं अहेर मिळाला. आणि ती मिस्टर मनोहर मिसाळ—आपल्या पतीबरोबर मिसेस मनोहर मिसाळ म्हणून त्याच्या हातांत हात घालून पुष्पमालांनीं मंडित आपल्या हितचिंतकांचे शुभ आशीर्वाद घेत देवळाबाहेर पडली !



## २७ ग्रहदशेचा मध्य

**लोखंडावर** अतिशय भार पडला म्हणजे तें इतकें कठीण असूनहि वांकतें; मग मनुष्याचें मन कितीहि कठीण असलें म्हणून काय झालें ? त्यांतून स्त्रीचें मन किती भार सहन करील ? असह्य भार पडला म्हणजे ती वस्तु कितीहि कठीण असली तरी वांकणारच ! ह्या सृष्टिनियमाला हरताळ लावण्याचें सामर्थ्य पुरुषांत नाहीं. मग स्त्रियांत कोठून असणार ? गेल्या प्रकरणांत वर्णन केलेला प्रकार विमलेला असह्य झाला. देवळांतून बाहेर पडतांच पुनः तिचें डोकें दुखूं लागलें. आणि आतां आपणास पुनः ताप येईल असेंहि तिला वाटूं लागलें. ती मोठ्या जिवावर घरीं आली आणि अंथरूण पसरून त्यावर पडली. मनोहरानें तिची मोठ्या प्रेमानें आणि आस्थेनें चौकशी केली. परंतु आपणास ताप येणार हें मात्र तिनें त्याला सांगितलें नाहीं. आज विशेष श्रम झाल्यामुळें तिला थकवा आला असेल असें समजून मनोहर आपल्या मित्रमंडळींना ‘ म्यारेज फिस्ट ’ ( विवाहाप्रीत्यर्थ भोजन ) देण्याच्या तयारीला लागला. जेवणाची सर्व सिद्धता होतांच तो विमलेला नेण्याकरितां आला. परंतु त्यावेळीं तिच्या अंगांत सणसणीत ताप भरला होता. मनोहराचा मोठा विरस झाला परंतु करतो काय ? त्या गडबडींतच तिला औषध आणून देणें त्याला भाग पडलें.

मनोहराचें खरें स्वरूप प्रकट होण्यास सुरुवात झाली ! हेतु साधनार्थ इतके दिवस त्यानें मानभावीपणाचें घेतलेलें पांघरूण आतां झिडकारून दिलें. आजच्या फिस्टमध्यें त्यानें दारूवर विशेष हात मारला. आज इतक्या दिवसाची राहिलेली बाकी त्यानें आज सव्याज भरून काढिली. रात्रीं बारा वाजण्याच्या सुमारास तो झुलत झुलत घरीं आला. तोंपर्यंत बिचारी विमला एकटीच तापाच्या जोरांत वस्तुस्थितीचा विचार करीत तळमळत पडली

होती. दरवाजा उघडून मनोहर आंत येतांच तिच्या छातींत एकदम धक्का बसला. आतां आपण मनोहराची स्त्री झालों आहोंत, या विचाराची तिला सायंकाळींच जाणीव झाली होती. परंतु त्या गडबडींत तिला जो विशेष बोध व्हावयास पाहिजे होता तो मात्र झाला नव्हता. परंतु आतां रात्रींच्या या एकांतसमयीं तो घरीं येतांच आपण आपल्या स्वातंत्र्याला मुकलों हा खरा बोध तिला झाला. कारण तो आंत येतांच दारूच्या निशेंत तिच्या अंथरुणा-जवळ धाडकन् बसून म्हणाला, "माय् डियर विमला, टु डे इज अवर गोल्डन नाईट," ( माझ्या प्रियकर विमले, आज आपली ही सोन्याची रात्र आहे ) असें म्हणून त्यानें तिच्या गळ्याभोंवतीं आपला हात टाकला. त्याबरोबर तिला त्याच्या तोंडाची दारूची वस्कन् घाण आली. तिनें आपलें तोंड फिरविलें आणि म्हटलें; " तुम्हीं घरीं येण्यास ही किती रात्र केली ? मी एकसारखी तापानें तळमळत आहें. माझ्या घशाला कोरड पडली आहे. मला अतिशय तहान लागली आहे. "

" ह्या तापाला आजच कुठें आठवलं ! " असें म्हणून तो उठला आणि ट्रंकमधून दोन फळें आणि कांहीं बिस्कुटें काढून तीं त्यानें तिच्यापुढें ठेविलीं आणि म्हणाला, " मी दूध मिळालें तर घेऊन येतों. "

विमलेचा दुसरा दिवसही तापांतच गेला. तिसऱ्या दिवशीं तिला थोडें बरें वाटूं लागलें. तेव्हां त्यानें तिला घेऊन परत नगरास जाण्याची तयारी केली. त्याला कामावर पुनः हजर होण्यास आतां दोनच दिवस बाकी होते. विमलेनें मुकाट्यानें त्याच्या म्हणण्याला रुकार दिला. आणि चौथ्या दिवशीं तें नूतन विवाहित जोडपें परत नगरास आलें. प्रवासाच्या श्रमामुळें विमलेला त्रास झाला. अद्यापि तिचा ताप गेला नव्हता. आतां ती स्वगृहीं आली होती. परंतु तिला किंचितही आनंद झाला नाहीं. मनोहराच्या बिऱ्हाडाची व्यवस्था टापटीपीची होती. आतांपर्यंत तो एकटाच असल्यामुळें त्यानें आपल्या मनाप्रमाणें सर्व व्यवस्था करून घेतली होती. विमला घरीं आल्यावर तिच्या मनाला एक प्रकारची हुरहुर लागली होती. नरसिंगराव एकदां आपल्या दृष्टीस पडावा असें तिला राहून राहून वाटत होतें. आज जवळ जवळ दीड महिना ती नगरांत नव्हती. त्यामुळें तिला नरसिंगरावाला पाहण्याची अत्यंत उत्कंठा लागली होती. घरीं येतांच मनोहरानें तिला आपल्या घराचा परिचय करून दिला आणि म्हणाला,

“ विमला, आतां तूं ह्या माझ्या घराची, येथील सर्व वस्तूंची आणि माझ्या सर्वस्वाची मालकीण झालीस, आतां आपल्या लग्नाबद्दल आपणाला येथील मंडळींना एक दोन दिवसांत ‘ फिस्ट ’ दिली पाहिजे. तुझी प्रकृति आतां एक दोन दिवसांत चांगली होईल. तोंपर्यंत मी आपलें जेवण हॉटेलमधूनच पूर्वी मी ज्याप्रमाणें मागवीत होतों तसेंच मागवीत जाईन. तोंपर्यंत एखादा ‘ कुक ’ ( आचारी ) मिळाला तर पाहतों.

“ कुकची कांहीं जरूरी नाहीं. मी स्वयंपाक करीत जाईन. पण मला तुमच्याजवळ कांहीं याचना करावयाची आहे. ” असें म्हणून विमला खालीं मान घालून म्हणाली. “ मला आपल्या मिशनच्या बाईचे वीस रुपये द्याव-याचे आहेत. मी येथून गेलें तेव्हां त्यांच्याजवळून घेतले होते. ”

“ मग त्यांत याचना करण्याची काय जरूरी ? तुझें देणें तें आतां माझेंच देणें आहे. तें देण्यास मी आतां ‘ ड्युटी बाउंड ’ ( कर्तव्यानें बांधलेला ) आहें. बरं ह्याशिवाय दुसरं कांहीं तुला देणं आहे काय ? ”

“ नाहीं. ”

नगरांत आल्यावर पहिला दिवस मनोहराचा अतिशय गडबडींत गेला. त्याला विमलेकरितां एक खोली तयार करावी लागली. स्वयंपाकाकरितां एक खोली रिकामी करावी लागली. ही सर्व व्यवस्था त्याला एकट्यालाच करावी लागली. कारण विमला तापामुळें बिछान्यावर पडूनच होती. त्यामुळें तिचा अगदीं नाइलाज झाला होता. नाहींतर तिनें मनोहराला काडीइतकें देखील काम करूं न देतां सर्व व्यवस्था स्वतःच केली असती. त्या दिवशीं रात्रीं जेवण झाल्यावर मनोहरानें आपलें कपाट उघडलें आणि त्यांतून दारूची बाटली आणि दोन ग्लासें बाहेर काढिलीं. तें पाहून बिछान्यावरूनच विमला म्हणाली. “ हें घरांत कशाला ठेवलं आहे ? यापायीं कितीतरी नुकसान होतं तर असं हें व्यसन आपल्या घरांत कशाला पाहिजे ? ”

“ त्याशिवाय तर माझा एक दिवसही जावयाचा नाहीं. सर्व दिवस मरमरून काम करावयाचं आणि रात्रीं जेवतांना ही जर थोडी घेतली नाहीं, तर मग श्रम कसे जातील ? ही माझी श्रमहारिणी आहे. तूंही थोडी घे; म्हणजे तुला हुशारी वाटेल. ”

“ इश्श ! मी नाहीं घ्यायची ! आणि पुढें केव्हांही तिला स्पर्श कराव-याची नाहीं. ”

" बर बुवा, नका घेऊं ! तेवढी आमची वांचली ! पण आपल्या हातानें आम्हाला आपली रोज रात्रीं जेवतांना देत जाल कीं नाहीं ? "

" नाहीं. हें व्यसन तुम्हीं देखील सोडलं पाहिजे. "

" बरं, तो प्रश्न पुढचा आहे. पण आतां तर मी घेतों. " असें म्हणून त्यानें एक ग्लास घशांत ओतलें.

हा प्रकार पाहून विमलेला अतिशय वाईट वाटलें. आपल्या नशिबीं पुढें काय लिहून ठेवलें आहे त्याचें चित्र तिला गृहप्रवेश करतांच पहिल्याच दिवशीं दिसलें. येथें मनोहराचें मदिरापान चालू होतें आणि विमला आपल्या स्थितीचा विचार करीत होती. त्या रात्रीं तिला झोंप लागली नाहीं. आणि ह्यापुढें तिला स्वस्थपणें झोंप कधीं एखाद्या दिवशीं लागेल किंवा नाहीं याची शाश्वतीही नव्हती. मनोहरानें त्या रात्रीं तिला त्रास दिला नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्यावर मनोहरानें विमलेच्या औषधाची व्यवस्था केली आणि आपलें जेवण वगैरे उरकून व विमलेच्या जेवणाची व्यवस्था तरून तो कामावर जाण्याकरितां घरांतून बाहेर पडला. रस्त्यानें जात असतां समोरून संतोबा येतांना त्याच्या दृष्टीस पडले.

" कां संतोबा, कुणीकडे निघाला सकाळींच ? तुमच्या विमलेला मी परत नगरांत घेऊन आलों. "

" केव्हां आणिली ? कुठें आहे ती ? गेली होती कुठें ? "

" असे एकदम सर्व प्रश्न विचारूं नका. तिला मी काल आणिली. हल्लीं ती माझ्या घरीं आहे आणि ह्यापुढें ती माझ्याच घरीं रहाणार. ती गेली होती पुण्यास. "

" कशाला ? आणि ती तुमच्याकडे कां राहणार ? "

" कां राहणार म्हणजे ? माझी बायको म्हणून राहणार. "

" म्हणजे ? "

" तिचें आणि माझें लग्न झालें. "

" अगदीं अशक्य ! "

" अगदीं शक्य. " जितक्या जोरांत संतोबा म्हणाले, तितक्याच जोरांत त्यांना उत्तर देऊन मनोहर पुढें म्हणाला, " हा मनोहर मिसाळ आहे, तुमचा तो बापुसाहेबांचा नरसिंगराव नाहीं हें लक्षांत ठेवा. "

" पण हें कसं होईल ? "

" कसं होईल काय ? झालं ! त्या पोरीचा नकाशा शेवटीं मींच उतरविला."

" पण आतां ती तुमच्या घरीं आहे काय ? " विचार करीत संतोबांनीं विचारलें.

" माझ्या घरीं नाहीं तर काय नरसिंगरावाकडे जाईल काय ? अहो, त्याच्या हातून काढून घेण्याकरितां तर मी एवढी खटपट केली. आणि त्याप्रमाणें ती माझी झाली. आतां कालपासून तिला थोडा ताप येत आहे. पुण्यांत गेली होती, तेंथें तिला प्लेग झाला होता. मी होतों तेथें म्हणून तर ती प्लेगच्या जबड्यांतून वांचली."

" काय म्हणतां मनोहरराव ? मग तर तिला अवश्य भेटलं पाहिजे. "

" जा, जा, अवश्य भेटा. "

संतोबा मनोहराच्या घरीं जाण्याकरितां वळले आणि मनोहर कामावर जाण्याकरितां निघाला. ही नवीन ऐकलेली बातमी संतोबांना आश्चर्यचकित् करून सोडणारी होती. विमलेचें नरसिंगरावावर किती अकृतिम प्रेम होतें, हें त्यांना ठाऊक होतें. असें असतांना ती, ज्या मनुष्याचा अगदीं मनापासून तिटकारा करीत होती, त्याच्याबरोबर लग्न लावील हें त्यांना खरें वाटेना. कदाचित् मनोहरानें आपली थट्टा केली असेल असें त्यांना वाटलें. जसजसें मनोहराचें बिऱ्हाड जवळ येऊं लागलें तसतसें ' ही त्यानें थट्टाच केली आणि आपण मनोहराच्या बिऱ्हाडीं गेल्यावर त्याच्या दरवाजाला कुलूप लावलेलें आपल्या दृष्टीस पडेल ' हा विचार त्याच्या मनांत घोळूं लागला. परंतु मनोहराच्या बिऱ्हाडाजवळ येतांच त्याचा दरवाजा उघडा पाहून त्यांचें मन चरकलें. त्यांनीं पुढें होऊन हळूच दरवाची कडी वाजविली. तेव्हां आंतून ' कोण आहे ? ' असा ओळखीचा आवाज त्यांना ऐकूं आला त्याबरोबर त्यांना एकप्रकारचा धक्काही बसला ! त्यानीं दरवाजा उघडला तों कोंपऱ्यांत स्प्रिंगच्या लोखंडी कॉटवर विमला निजलेली त्यांच्या दृष्टीस पडली.

" कोण बाबा—? "

" वि–म–ला, हें मी काय पहातों ? " असें म्हणून संतोबा दरवाजांतच अडखळून उभे राहिले. तेव्हां विमला म्हणाली, " बाबा, या असे दरवाजांतच काय उभे राहिलां ? "

" पण विमला मी ऐकली ती गोष्ट खरी का ? तूं मनोहराबरोबर लग्न केलंस ही गोष्ट खरी का ? "

" होय. "

" अरेरे ! विमला, शेवटीं तूं हिंदुधर्म सोडालास काय ? "

' मी सोडला नाहीं. परंतु हिंदुधर्मानें मला सोडायला भाग पाडलें. "

" मग नरसिंगरावानें रात्रंदिवस तुझ्याकरितां चालविलेली खटपट व्यर्थ आहे तर ? तो तुझ्याकरितां भ्रमिष्ट झाला आहे. रात्रंदिवस त्यानें तुझ्या नांवाचा सारखा जप चालविला आहे. "

" माझ्या नांवाचा जप करण्याचें त्याना आतां कांहींच कारण नाहीं. वास्तविक त्यांनीं आतां कमलाबाईच्या नांवाचा जप करावयास पाहिजे. कारण आतां ती त्यांची पत्नी आहे. "

" कोण सांगतो ?—ती त्याची पत्नी झाली असं कोण सांगतो ? "

" कां बरं ? त्यांचं तिच्याबरोबर लग्न नाहीं का झालं ? "

निव्वळ खोटी गोष्ट ! "

" म्हणजे ?—मला मनोहररावांनीं तसें सांगितलें. नव्हे आम्हाला येथील सर्व हकीकत कळली. "

" कशी कळली ? "

" येथें शिवरामशास्त्री म्हणून कोणी मनोहररावांचे मित्र आहेत त्यांनीं आम्हाला पुण्यास पत्र लिहिलें त्यावरून कळलें. "

संतोबा क्षणभर विचार करीत स्तब्ध राहिले. शिवरामशास्त्री महामुनी कोणत्या दर्जाचा मनुष्य आहे हें त्यांना चांगलें ठाऊक होतें. त्याचें नांव ऐकतांच येथें कांहीं तरी घोंटाळा आहे असें त्यांना वाटलें. व ह्या गोष्टीची आतांच पूर्ण शहानिशा करून घ्यावी या उद्देशानें ते उठले, तेव्हा विमला म्हणाली, " बाबा, तुम्ही चाललां कुठें ?—थांबा, पण मला प्रथम सांगा कीं, नरसिंगरावाचें लग्न नाहीं का अद्यापि झालें ? " परंतु त्याचें उत्तर न देतां संतोबा म्हणाले, " तूंच आतां थोडा वेळ थांब. मीं आतां जाऊन त्या हरामखोर, पाजी शिवरामशास्त्र्याला येथें घेऊन येतों. त्या धर्मबुडव्या चांडाळानें ही सर्व फसवाफसवी केली आहे. " असें रागानें बोलून संतोबा बाहेर पडले. विमला अगदीं गोंधळून गेली. संतोबा म्हणतात तसाच हा कांहीं तरी फसवाफसवीचा प्रकार असावा, असें तिला वाटूं लागलें. तिला कांहीं सुचेनासें झालें. थोड्या वेळानें शिवरामशास्त्र्याला घेऊन संतोबा परत आले. आणि म्हणाले, विमले, पोरी, तूं ह्या मनोहराच्या कृष्णकारस्थानाला बळी

पडलीस आणि नाहक आपल्या धर्माला मुकलीस. अरेरे हे दुर्दैवी पोरी, तूं खरोखरी दुर्दैवी आहेस. तुझ्या प्राप्तीकरतां ह्या चांडाळ मनोहरानें काय काय व्यूह रचले होते, ते जर तुला कळले तर तुझी खात्री होईल. "

" सांगा—बाबा, मला आतां सर्व सांगा ! पण माझ्या समक्ष—त्यांच्या पत्नीसमक्ष त्यांना वाईट विशेषणें लावून बोलूं नका. ते माझे पति आहेत. त्यांच्या नांवाला लावलेलीं वाईट विशेषणें मला सहन व्हावयाचीं नाहींत. वास्तविक त्यांच्या विरुद्ध एकहि शब्द आतां मी ऐकावयास नको होता. परंतु ज्यांच्या सुखाकरतां—ज्यांच्या पवित्र नावाला मजकरतां कलंक लागू नये म्हणून मी माझ्या प्रेमाची, सुखाची आणि सर्वस्वाची होळी केली, धर्म सोडला आणि मनोहररावाबरोबर लग्न केलें, ते देवाप्रमाणें मला पूज्य असलेले नरसिंगराव अद्यापि दुःखांत आहेत हें ऐकून माझ्या पतीनें माझ्याशीं केलेलें कपट ऐकून घेणें मला भाग पडत आहे. सांगा—"

संतोबांनीं नुकतीच शिवरामशास्त्र्याकडून ऐकलेली हकीकत तिला सांगण्यास सुरवात केली. प्रथम मनोहराला निराशा वाटूं लागतांच तो शिवरामशास्त्र्याकडे जाऊन त्यांनीं केलेलें खलबत, नंतर शिवरामशास्त्र्यानें शंकराचार्याला लिहिलेला अर्ज, त्यामुळें विमलेला झालेला बहिष्कार, इत्यादि सर्व गोष्टी सांगून संतोबा म्हणाले, " विमले. तुला मनोहरानें अगदीं निखालस फसविलें. कारण तूं म्हणतेस त्या पत्राबद्दल ह्या शिवरामशास्त्र्याला कांहींच माहिती नाहीं. पण तें पत्र कुठें आहे ? तें मला पाहूं दे. "

विमलेनें तें पत्र आपल्या ट्रंकेमध्यें आहे असें सांगतांच संतोबांनीं तें पत्र बाहेर काढलें आणि शिवरामशास्त्र्याला दाखविलें. तेव्हां तें पत्र आपण लिहिलें नाहीं, इतकेंच नव्हे तर तें पत्र पुण्यांतल्या पुण्यांतच लिहून टाकलें होतें असें पत्रावर असलेल्या पोष्टाच्या शिक्क्यावर त्यानें सांगितलें. ह्या सर्व गोष्टी विमला अगदीं मुकाट्यानें आणि शांत चित्तानें ऐकत होती. आतां तिच्या चर्येवर कांहींएक विकार दिसत नव्हता. उलट तिची चर्या अगदीं गंभीर दिसत होती. शेवटीं ती म्हणाली, " बाबा आतां मला नरसिंगरावांची हकीकत सांगा. ती सर्व हकीकत मला पहिल्यापासून ऐकूं द्या. "

ती हकीकत फार मोठी आणि करुणाजनक आहे. तूं एकाएकीं नगर सोडून गेलीस तेव्हांपासून त्याची वृत्ति फार चमत्कारिक बनली. तुला भेटण्याकरितां तो म्हाताऱ्या जयेकडे गेला. परंतु आधल्या रात्रीं तूं कुठें तरी

गेलीस इतकेंच त्याला तिच्याकडून कळलें. तेव्हां तूं बहिष्कारामुळें कंटाळूनच गेलीस असें समजून त्यानें तुझा बहिष्कार रद्द व्हावा म्हणून जारीनें प्रयत्न सुरू केले. शिवाय तुझाहि त्यानें शक्य तितका शोध केला. तो रोज सायंकाळीं त्या काठळावर, ज्या ठिकाणीं त्याला सायकलचा अपघात झाला आणि ज्या ठिकाणावरून प्रथम तूं त्याला बेशुद्ध स्थितींत गाडींत घालून आपल्या घरीं आणलेंस त्या भिंगार नदीच्या कातळावर तो जाऊन बसतो. तेथें बसून तो दिवस खालीं जाईपर्यंत तुझ्या नांवाचा जप करीत असतो. नंतर तेथून उठून परत घरीं जातांना म्हाताऱ्या जयेकडे जाऊन तूं आलीस काय, तुझें पत्र आलें काय म्हणून चौकशी करतो. काल रात्रीं सुद्धां त्यानें तेथें जाऊन तुझी चौकशी केली. ही एक गोष्ट झाली. शिवाय दुसरी गोष्ट—तुझ्या बहिष्काराबद्दल त्यानें आपल्या एका वकील मित्राकडून शंकराचार्यांना नोटीसहि देवविली आहे. त्याबद्दल त्याचा जारीनें पत्रव्यवहार चालू आहे. त्यानें अद्यापि लग्न केलें नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यानें कमलेकडे केलेलें दुर्लक्ष पाहून बापुसाहेब फार चिंताक्रांत असतात. तुझ्यामुळें नरसिंगाची वृत्ति वेड्यासारखी झाली आहे, त्यानें अन्नपाणी टाकलें आहे, आणि आपल्या जिवाची हेळसांड चालविली आहे, या गोष्टीचा बापुसाहेबांच्या मनावर फार परिणाम झाला असून आतांशीं तेहि आजारी झाले आहेत. गेल्या दोन दिवसांत ते अंथरुणावर पडून आहेत. ”

ही सर्व हकीकत ऐकून विमलेनें एक दीर्घ श्वास मात्र सोडला. तेव्हां संतोबा पुढें म्हणाले, “ मनोहरानें हें सर्व कारस्थान केलें. आतां तुझा विचार काय होतो ? तुला फसवून तुझी प्राप्ति करून घेणाऱ्याच्या घरांत तुला रहावयाचें आहे कीं माझ्याबरोबर येतेस ? मी पुनः तुझी सर्व व्यवस्था पूर्ववत् जयेकडे करतो. ”

“ नाहीं. मनोहररावांनीं मला फसविलें ही गोष्ट जरी खरी आहे, तरी ते आतां माझे पति आहेत. शिवाय त्यांचे मजवर अगणित उपकार आहेत. त्या उपकारांची फेड करण्याकरितां तरी मला येथें राहिलें पाहिजे. मी जन्मापासून दुर्दैवी आहें आणि मरेपर्यंत मला दुर्दैवीच राहिलें पाहिजे माझ्या नशिबीं सुख नाहीं. माझा जन्म दुःखाकरितांच आहे. तेव्हां आहे हीच स्थिति सुखाची असें मानून मला मरेपर्यंत राहिलें पाहिजे. बाबा, आतां तुम्ही जा. परंतु मी येथें परत आलें आहें हें मात्र नरसिंगरावांनां कळवूं

नका. कारण माझी फसवणूक झाली आहे हें कळून त्यांना दुप्पट दुःख होईल. आतां इतकेंच करा कीं, त्यांना कसेंहि करून वळवा आणि कमलेबरोबर त्यांचा विवाह होईल असें करा. जा—"

"विमले, तुझ्या ह्या ग्रहदशेचा अंत केव्हां होईल ? अरेरे, दुर्दैवी पोरी काय ही ग्रहदशा तुझ्यामागें लागली आहे ?"

"बाबा, माझ्या ह्या ग्रहदशेचा अंत माझ्या अंताबरोबरच होईल. तुम्ही कां उगाच दुःखी होतां ?"

संतोबा आणि शिवरामशास्त्री दुःखी मनानें निघून गेल्यावर विमला आपल्या अंथरुणावर पडून राहिली. तिच्या मनांत चाललेल्या विचारांचें शब्दचित्र उठविणें अगदीं अशक्य आहे. त्या सर्व दिवसांत एक पळीभर पाणी देखील तिनें तोंडांत घेतलें नाहीं. संतोबा गेल्यावर थोड्या वेळानें मनोहरानें सांगून ठेवल्याप्रमाणें हॉटेलमधून तिचें ताट आलें. परंतु तें तसेंच पडलें होतें. ती आपल्या पतीची—मनोहराची मार्गप्रतीक्षा करीत होती. परंतु एका महिन्यानें तो आपल्या कामावर आजच रुजूं झाल्यामुळें त्याला कामाच्या गर्दींत दुपारीं घरीं येतां आलं नाहीं. दिवे लागण्याच्या सुमारास तो घरीं आला. आपल्यामागें घरीं काय काय प्रकार घडला असेल याची त्याला कांहींच कल्पना होणें शक्य नव्हतें. उलट आज पहिलाच दिवस, त्यांतून घरीं विमला आजारी अशा स्थितींत आपणास दोनप्रहरीं घरीं येतां आलें नाहीं म्हणून त्याला वाईट वाटत होतें. कदाचित् विमला आपणावर रागावली असेल तर तिची समजूत करावी हाच विचार त्याच्या मनांत चालू होता. घरीं येतांच तो, म्हणाला "माय् डियर विमला, मला कामामुळें दुपारीं घरीं येतां आलें नाहीं म्हणून रागावूं नकोस. पण आतां तुझी प्रकृति कशी आहे. लेट् मी सी ॲन्ड मी किस् यू. ( मला पाहूं दे आणि मला एक चुंबन दे. )"

"माझी प्रकृति आतां बरी आहे. तुम्ही प्रथम जेऊन घ्या. तुम्हाला फार श्रम झाले आहेत. जेवल्यानंतर मला तुमच्याबरोबर पुष्कळ बोलावयाचें आहे."

"ऑल राईट माय डियर. ( ठीक आहे माझ्या प्रिये. ) पण हें काय ? तुझें 'डिश' (ताट) अद्यापि तसेंच पडलें आहे ! तूं सकाळीं जेवली नाहींस वाटतं ! छे छे ! हें कांहीं चांगलं नाहीं. नवऱ्याच्या आधीं किंवा नवरा जेवला नाहीं म्हणून बायकोनें जेऊं नये ही हिंदु लोकांची क्रूर चाल आहे.

तूं आतां हिंदु नाहींस. तेव्हां तुला ह्या हिंदूंच्या सर्व पोरकट चालीरीती सोडून दिल्या पाहिजेत. उई आर नाऊ नेटिव्ह ख्रिश्चनस् मिन्स युरोपिअनस्. ( आतां आपण नेटिव्ह ख्रिस्तान म्हणजे साहेब आहोंत. ) "

विमलेनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. ती शांतपणानें मनोहराची चाललेली बडबड पहात होती. त्यानें कपडे काढून तोंड धुतलें आणि निराळे कपडे घातले. इतक्यांत ताट घेऊन एक नोकर आंत आला तें टेबलावर ठेविल्यावर मनोहरानें कपाटांतून दारूची बाटली काढली आणि आपल्या नित्य क्रमाला सुरवात केली. मधून मधून तो बोलत होता. विमला त्याला 'होय' किंवा नाहीं, इतकेंच उत्तर देत होती. नंतर जेवण आटोपल्यावर त्यानें हात धुवून आपली खुर्ची विमलेच्या कॉटजवळ ओढली. आणि तो म्हणाला, "गो ऑन, फायर ऑन माय डियर. ( हं चालूं द्या—सांगा. ) "

" तुम्ही माझ्याबरोबर लग्न केलें. मी तुमची पत्नी झालें. परंतु —"

" यस्. यु आर माय् वेल बिलव्हेड वाईफ—यु आर माय जॉय—यु आर माय हेव्हन. ( होय. तूं माझी अत्यंत प्रियकर पत्नी; तूं माझा आनंद तूं माझा स्वर्ग आहेस. ) "

" थांबा—आतां मला स्पर्श करूं नका. दूर व्हा. आणि ह्यापुढें मला स्पर्श करण्याचा प्रयत्न करूं नका. मी तुम्हाला केव्हांही स्पर्श करूं देणार नाहीं. "

" म्हणजे ?—डियर विमल, आर यु म्याड ? ( प्रियकर विमल, तूं वेडी तर झाली नाहींस ना ? ) "

" दूर व्हा—दूर व्हा. मी काय सांगतें तें ऐका. तुम्हीं माझ्याशीं लग्न करण्याकरितां कपट केलें आहे. "

" मी कपट केलें आहे ?—तें कसें ? "

" तें खोटें पत्र स्वतः लिहून. शिवाय मी धर्मांतर करावें म्हणून त्या शिवरामशास्त्र्याकडून तुम्हीं केलेलें कारस्थान मला आज सर्व कळलं आहे. "

" असें काय ? एकंदरीनें तुला सर्व कळलं आहे तर ! मग त्यांत काय झालं ? त्या नरसिंगरावावर—माझ्या प्रतिस्पर्ध्यावर प्रेम करून माझा तूं उपहास करीत होतीस ना ? म्हणूनच तुझी मिजास उतरविण्याकरितां मी हें सर्व कारस्थान केलें. "

" आणि तें सिद्धीसहि गेलें. मी तुमची पत्नी झालें. परंतु पत्नी होण्यापूर्वी

मीं तुम्हाला स्पष्ट शब्दांत सांगितलेंच आहे कीं, माझें तुमच्यावर प्रेम नाहीं. त्याप्रमाणें मी आजदिनपर्यंत मनानें शुद्ध आहें. आणि ह्यापुढें मी देहानें सुद्धां शुद्ध राहणार अहें. माझें मन तुम्हाला मिळणार नव्हतेंच पण आतां तुमची मी पत्नी असूनही तुम्हांला माझा देह मिळणें शक्य नाहीं. फक्त नांवाला मी तुमची पत्नी आहें. हें पतिपत्नीचें बंधनहि मी झुगारून दिलें असतें. परंतु तुमचे मजवर उपकार आहेत आणि त्या उपकारांची फेड म्हणून मी तुमची पत्नी झालें. आतां अशा रीतीनें वागून मी आपलें आयुष्य घालविणार."

" असं कुठें झालं आहे ? यु आर माय लॉफुली वाईफ ॲण्ड आय् ह्॑व एव्हरी राईट टू एंजॉय यू. ( तूं माझी कायद्यानें बायको आहेस. आणि तुझा उपभोग घेण्याचा मला पूर्ण अधिकार आहे."

" होय. मी तुमची तुमच्या कायद्यानें बायको आहें आणि मी माझ्या कायद्यानें स्वतःचें शरीर भ्रष्टवून न घेतां तुमच्या उपयोगी पडायला तयार आहें. "

" आय डोन्ट वॉन्ट युअर कंडिशन्स् बट आय वॉन्ट यू. ( मला तुझ्या अटी नको आहेत. मला तूं पाहिजेस. ) "

" दूर व्हा—एकदां सांगितलं; मी नांवानें तुमची पत्नी राहून तुमच्या कामाला उपयोगी पडण्यास तयार आहें. आणि जर करितां तुम्ही अतिप्रसंगाची वेळ आणिली तर तात्काळ मी तुमच्या पायांजवळ डोकें आपटून जीव देईन हें लक्षांत ठेवा."

मनोहर गप्प राहिला. विमला कितीं निश्चयी मनाची आहे, हें तो पूर्णपणें जाणून होता.



## २८ पुनः नगर

संतोबांनीं वर्णन केलेली गेल्या प्रकरणांतील नरसिंगरावाची स्थिति राहून राहून विमलेच्या डोळ्यांपुढें स्पष्ट उभी रहात होती. त्याच्या प्रेमाविषयीं तिला केव्हांच शंका आली नाहीं. आपल्यावर त्याचें विशुद्ध प्रेम आहे हें तिला माहित होतें. परंतु त्यानें सुखी व्हावें ही तिची उत्कट इच्छा होती.

आपण त्याच्या मार्गांतून दूर होणें म्हणजेच तो सुखाच्या मार्गाला लागून स्वजातींत राहून लौकिकाला चढणें होय, असा स्वतःचा समज करून घेऊन ती नगर सोडून गेली आणि पुढें परिस्थितीच्या म्हणा अगर ग्रहदशेच्या म्हणा फेऱ्यांत सांपडून मनोहराच्या कारस्थानाला बळी पडली तरी देखील त्यांत जें होत आहे तें आपल्या मुख्य उद्देशाला अनुसरूनच होत आहे असें. समजून तिनें मोठ्या अनंदानें परिस्थितीचा प्रतिकार न करितां तिचा स्वीकार केला. परंतु आतां तिला काय कळलें ? त्याच्या सुखाकरितां आपण आपल्या सर्वस्व सुखावर तुळशीपत्र ठेविलें तो पूर्वीपेक्षां जास्त दुःखी मात्र झाला आहे. आतां तिला स्वतःच्या जिवाचा कंटाळा आला. आपण प्लेगमध्यें मरून गेलों असतों तर फार बरें झालें असतें असें तिला वाटूं लागलें. ती हल्लीं आजारीच होती. हा आपला आजार असाच विकोपाला जाऊन त्यांत आपण मरावें अशी आतां ती इच्छा करूं लागली. मनोहर आणून देई तें औषध न घेतां स्वतःच्या आजाराची आणि कधीं खाल्लेंतर खाल्लें नाहींतर नाहीं अशा रीतीनें आपल्या शरीराची ती हेळसांड करूं लागली. परंतु ' मरण ' म्हटल्यानें थोडेंच मरण येत असतें ? मनुष्यमात्राच्या मागें त्याच्या पूर्वसंचितानें लागलेली ग्रहदशेची पूर्तता होईपर्यंत, सुखदुःखांच्या भोक्तृत्वाची वजाबाकी शून्य होईपर्यंत ' मरण , सावलीप्रमाणें मागें असतें. व तीच सुख-दुःखाची वजाबाकी शून्य होतांच जें ' मरण ' सावलीप्रमाणें मागें असतें तेंच पुढें येऊन दत्त म्हणून उभें रहातें. विमलेनें स्वतःला कंटाळून ' मरण–मरण ' म्हणून कितीही जप केला तरी तें थोडेंच पुढें येणार होतें ? तिच्या ग्रहदशेची अद्यापि पूर्तता व्हावयाची होती.

विमलेनें आपल्या पतीजवळ नरसिंह अवतार प्रकट केला, त्याचा योग्य परिणाम झाला. आणि आतां अधिक ताणून धरलें तर विमला म्हटल्या-प्रमाणें करण्यास केव्हांही मागें पुढें पहाणार नाहीं अशी मनोहराची खात्री होती. तो आतां बराच नरम झाला होता. पहिले तीन दिवस त्या दोघांत फारसें भाषण झालें नाहीं. विमला आतां तापांतून बरी झाली होती. आजपासून तिनें आपल्या नवीन गृहकृत्याला सुरवात केली होती. देह आणि प्रेम याशिवाय ती मनानें आपल्या पतीची सेवा करूं लागली. आज तिने स्वतः स्वयंपाक करून मनोहराला जेऊं घातलें. रात्रीं जेवतांना मनोहरानें जेव्हां दारूची बाटली काढली तेव्हां ती म्हणाली, " तुम्ही हें व्यसन सोडून

द्यावें. ह्या व्यसनापायीं मनुष्य पशू बनतो. हें व्यसन जर सोडाल तर तुम्ही सुखी व्हाल. मला जरी तुम्हाला इतर सुख देतां येत नाहीं तरी इतर गोष्टींत तुमचें सुख पाहणें हें माझें पत्नीचें कर्तव्य आहे. ”

“ इतकी जर तुला स्वतःच्या कर्तव्याची जाणीव आहे तर मग मला अटी कशाला घातल्या आहेस ? त्या सर्व अटी काढून घे. आणि तूं माझी सर्वस्वी हो. म्हणजे मी हें व्यसनच काय पण तूं सांगशील तें सर्व प्रतिज्ञेनें करीन. तुझ्या शब्दाबाहेर मी काडीइतकाही वागणार नाहीं. देवाच्या दह। आज्ञा तसा तुझा प्रत्येक शब्द मी आज्ञा म्हणून शिरसावंद्य मानीन. ”

विमलेनें विषय वाढविला नाहीं. ती मुकाट्यानें आपल्या गृहकृत्यांत गुंतली. दुसऱ्या दिवशीं सर्व दिवस घरांत बसून कंटाळा आल्यावर थोडावेळ मिशनमध्यें जाऊन बाईना भेटून यावें असें तिला वाटूं लागलें. ‘ तुला घरांत एकटेंच करमत नसेल तर थोडावेळ संध्याकाळी मिशनमध्यें जात जा. ’ असें सकाळी तिला मनोहरानें सांगितलें होतें. म्हणूनच तिच्या मनांत बाहेर जाण्याची इच्छा उद्भवली. नाहींतर ती केव्हांही पतिआज्ञेवांचून घराबाहेर पडली नसती तिनें कपडे घातले परंतु कुठें जावें हें अद्यापि तिनें ठरविलें नव्हतें. यावेळीं नरसिंगराव भिंगार नदीवर कातळावर बसलेले असतात हें संतोबांच्या सांगण्यावरून तिला कळलें होतें. म्हणून तिचें मन त्या बाजूला ओढ घेऊं लागलें एक वेळ त्यांना जाऊन पहावें या उद्देशानें ती त्या बाजूला वळली. जसजशी ती नदीजवळ येऊं लागली तसतसें तिला चमत्कारिक वाटूं लागलें. आपणास आतां नरसिंगरावांची पवित्र मूर्ति दिसेल, आपल्या डोळ्याना सुख होईल, आपल्या मनाची तळमळ शांत होईल या सुखाशेच्या विचारांत ती कातळाजवळ आली. तेथें एका दगडावर तळ हातावर डोकें टेंकून शून्य दृष्टीनें समोर पहात सचित बसलेला नरसिंगराव होता. त्याची चर्या अगदीं निस्तेज दिसत होती. संतोबांनीं सांगितलेली सर्व हकीकत अगदीं खरी होती. बिचारा नरसिंगराव विमलेकरितां वेडा झाला होता. आज इतके दिवस त्या कातळावर बसून तो कशाचा विचार करीत होता, तो त्याचा त्यालाच ठाऊक ! तेथें येऊन त्याची बसण्याची आणि रात्रीं उठून जाण्याची वेळ इतकी ठराविक झाली होती कीं, त्याच्या जाण्यायेण्यावरून लोकांना किती वाजले हें बरोबर सांगतां येऊं लागलें. तो तेथें येऊन कां बसतो, याचें बरेच जणांना मोठें गूढ पडलें होतें. त्याच्या-

विषयीं लोक नानातऱ्हेचे तर्क करीत असत. पुढेंपुढें तर तो वेडा आहे. असें लोक उघड म्हणूं लागले. अलीकडे तो बापुसाहेबांबरोबर किंवा कमलेबरोबर घडपणें बोलतहि नसे. विचारल्या प्रश्नाचें फक्त उत्तर देण्यापलिकडे तो सबंध दिवसांत क्वचितच तोंड उघडीत असे. ह्या त्याच्या वर्तनामुळें बापुसाहेबांच्या घरांत दोन विशेष गोष्टी घडल्या होत्या. एक गोष्ट म्हणजे बापुसाहेबांच्या मनावर परिणाम होऊन त्यांचा हृदय रोग वाढला होता आणि त्यामुळें त्यांनीं बिछाना धरला. दुसरी गोष्ट म्हणजे कमलेच्या मनावर परिणाम होऊन तिचा पूर्वीचा हूड आणि अल्लड स्वभाव पार बदलून गेला होता. नरसिंगराव तुटक रीतीनें वागूं लागतांच आपलें त्याच्यावर प्रेम आहे या गोष्टीची तिला जाणीव होऊं लागली. ती नरसिंगरावाबरोबर त्याची वृत्ति पालटावी म्हणून इतक्या प्रेमानें आणि आस्थेनें वागूं लागली होती कीं, जणूं काय एखाद्या लहान मुलाबरोबर ती खेळत आहे असें इतरांना वाटे. असो.

कातळावर बसून नेहमींप्रमाणें नरसिंगराव आपल्या आराध्य देवतेची मार्गप्रतीक्षा करीत असतां एकाएकी त्याची दृष्टि समोरच्या रस्त्याकडे गेली. तेथें एक व्यक्ति येतांना त्याच्या दृष्टीस पडली. त्याबरोबर त्याची दृष्टि तेथेंच स्थिर झाली. हळुहळू ती व्यक्ति येऊन त्याच्यापुढें उभी राहिली. तेव्हां त्या व्यक्तीकडे अचल दृष्टीनें पहात नरसिंगराव हळूच ' विमला ! ' असें म्हणाला आणि एक दीर्घ श्वास सोडून तो पुढें म्हणाला, " तूं परत येशील अशी माझी खात्रीच होती ! "

" तुम्ही ही स्वतःची काय अवस्था करून घेतली आहे ? अशी ही शरीराची हेळसांड करून घेणं चांगलं का ? "

" माझ्या शरीराचें जीवन परत आलें. आतां माझी प्रकृति हां हां म्हणतां पूर्ववत् होईल. पण विमला, तूं इतके दिवस कुठें गेली होतीस ? मला एका शब्दानेंहि न सुचवितां तूं एकाएकी निघून गेलीस हें चांगलें केलेंस का ? बहिष्कारामुळेंच तुला इतकी निराशा वाटूं लागली काय !—विमला तुझा बहिष्कार रद्द करून घेण्याचा मजकडून प्रयत्न होणार नाहीं असं वाटून तूं निघून गेलीस काय ? मजविषयीं तुला इतका अविश्वास वाटूं लागला काय ? "

" आपणाविषयीं ज्या क्षणीं माझ्या मनांत अविश्वास उत्पन्न होईल त्याक्षणींच माझा आत्मा मला सोडून जाईल. आपण मला देवाप्रमाणें पूज्य आहांत. पण आपण मजकरितां दुःखी कां होतां ? मी अभागीण जन्मापासून

दुःखी आहें आणि अशीच दुःखी राहणार ! तुम्ही माझा नाद सोडून सुखी व्हा. तुम्हाला सुखी होण्याचा पूर्ण अधिकार असून तुम्ही मजकरितां—ह्या दुर्दैवी विमलेकरितां—कां दुःखी होतां ? परवां पुण्यांत असतांना मला प्लेग झाला होता. त्यांत मी जर मेलें असतें—"

" विमला,—विमला, असं अभद्र बोलूं नकोस. मला तें सहन होत नाहीं."

" आपण तें सहन करूंच नये अशी माझी मनापासून इच्छा होती. पण तसं होणार कोठून ? सर्व प्रकार उलटा झाला आणि आपण मात्र दुःखी बनलां ! "

विमला, तूं दुःखी होऊं नयेस अशी माझी इच्छा आहे. तुझ्या सुखाकरितां माझे सारखे प्रयत्न सुरू आहेत. "

" पण आतां त्यांचा काय उपयोग ? आपण प्रयत्न करून किंवा न करूनही सारखेंच आहे. " इतकें बोलून तिला मोठा हुंदका आला. त्याबरोबर नरसिंगराव एकदम उठला आणि पुढें झाला.

" थांबा—मला आतां स्पर्श करूं नका. मी परस्त्री आहें. "

" म्हणजे ?—विमला, तूं—आणि—परस्त्री ! "

" होय. "

" विमला, हें तूं काय बोलतेस तें मला कळत नाहीं. "

" माझें मनोहर मिसाळबरोबर लग्न झालें ! "

" लग्न झालें !—आणि मनोहर मिसाळ बरोबर—त्या खिश्चनबरोबर—विमला, तूं—"

" होय. मी धर्मांतर करून लग्न केलें ! "

" अरेरे ! विमला, तूं हें काय केलेंस ? तुला ह्या नरसिंगरावाचा विश्वास वाटला नाहीं काय ? तूं बहिष्कारामुळें हिंदुधर्माला कंटाळलीस काय ? "

" मी परिस्थितीला बळी पडलें. मी हिंदुधर्माला कंटाळलें नाहीं किंवा तुमचा मला अविश्वास वाटला नाहीं. मी मनानें हिंदू आहे, आणि मरेपर्यंत हिंदूच रहाणार. पण आतां काय ? मी परस्त्री झालें ! " असें म्हणून तिनें आपलें तोंड पदरांत लपविलें. आणि स्फुंदत स्फुंदत ती पुढें म्हणाली, " नरसिंगराव, आतां तुम्ही मजकडे भगिनीच्या नात्यानें पहा. ह्या आपल्या हतभागी विमलेला—"

" हाय ! हाय ! विमले, हें मी आतां कसं सहन करूं ? " असें म्हणून

नरसिंगरावानें खाडकन् आपल्या कपाळावर हात मारून घेतला. त्या आवाजा-बरोबर विमलेनें आपल्या तोंडावरील पदर काढला. आणि ती नरसिंगरावाचा हात धरून म्हणाली, " नरसिंगराव, तुमचें मजवर प्रेम आहे ना ? खरें प्रेम आहे ना ? निर्मल—निस्वार्थी प्रेम आहे ना ? मग तुम्हाला मजकडे मी सांगतें त्या भगिनीच्या नात्यानें कां पहातां येऊं नये ? "

" काय सांगूं ?—विमला, तूं आज माझी पूर्ण—पूर्ण निराशा केलीस ? तूं परस्त्री झालीस ! "

" मग त्यांत काय झालें ? मी परस्त्री झालें तरी तुमच्या प्रेमांत कोणता व्यत्यय आला ? आणि व्यत्यय येत आहे त्याअर्थी तुमचें मजवर निर्मल प्रेम नसून तें विषयी प्रेम आहे असेंच म्हटलें पाहिजे. "

" माझें प्रेम विषयीं !—नाहीं नाहीं ! ! माझें निस्वार्थी आणि निर्मल असें पवित्र प्रेम आहे. तूं सुखी व्हावीस हीच माझी इच्छा ! विमला, तूं म्हण-तेस तें खरें आहे ! मला तुझ्यावर भगिनीप्रमाणें प्रेम कां करतां येऊं नये ? पण विमला, तूं सुखी आहेस का ?—सांग तू आतां सुखी आहेस का ? "

" मी आहें या स्थितींत सुखीच आहे असें आतां तुम्ही समजा. पण मी खरी सुखी व्हावें असें जर आपणास वाटत असेल, आपली अंतःकरणापासून इच्छा असेल तर मी सांगतें तसं करा. तुम्ही—" इतकें बोलत असतां तिचें लक्ष रस्त्याकडे गेलें. तिला समोरून मनोहर येत असतांना दिसला. त्याबरोबर ती अडखळली. तिनें आपलें भाषण तेथेंच थांबविलें. आणि ती घाईघाईनें म्हणाली, " आतां मी जातें. माझे पति—मनोहरराव येत आहेत. तुम्हीहि आतां ह्या ठिकाणीं बसूं नका. घरीं जा. आणि उद्यां या. मी याच ठिकाणीं तुम्हाला भेटेन. आणि सर्व कांहीं सांगेन. माझी वाट पहात बसा. मी जातें. "

" पण विमला, जरा थांब—"

" मला आतां अडवूं नका. माझे पति पाहतील. मला जाऊं द्या. उद्यां भेटा—जातें. " असें म्हणून विमला झपाट्यानें तेथून निघाली. नरसिंगराव तिच्याकडे पाहातच राहिला. रस्त्यानें चालत असतां विमलेच्या मनांत अनेक विचार येऊं लागले. मनोहरानें आपणास पाहिलें आहे, तेव्हां आतां तो काय बोलेल याची तिला भीति वाटूं लागली. तिनें अर्ध्या वाटेंतच त्याला गांठलें. तो कामावरून सुटल्यावर मिशनमध्यें गेला होता. तेथें त्याला विमला दिसली नाहीं. त्यावरून ती आज मिशनमध्यें आली नसावी असें त्याला वाटलें. तेथून

घरीं आल्यावर पहातों तों बिऱ्हाडाच्या दरवाजाला कुलूप लाविलेलें. अर्थात् त्याला बाहेरच उभें रहावें लागलें. थोडा वेळ काढल्यावर त्यानें नाक्यावरील डेपोच्या दुकानीं चौकशी केली, तेव्हां विमला अमुक रस्त्यानें गेली इतकें त्याला कळलें. त्यावरून तो त्या रस्त्यानें सरळ निघाला. कदाचित् विमला मिशनमध्यें न जातां संतोबाच्या घरीं गेली असेल अशी कल्पना करून तो प्रथम संतोबाच्या घरीं गेला. परंतु तेथेंहि त्याला विमला भेटली नाहीं. तेव्हां तो जयेच्या घरीं जाण्याकरितां निघाला. वाटेंत त्याला संतोबा भेटले. तेव्हां तो हासत हासत म्हणाला, "कां संतोबा, झाली ना खात्री ? विमला माझी झाली कीं नाहीं ? मग आतां उद्यां रविवार आहे. उद्यां या आमच्या घरीं. मी आमच्या लग्नाबद्दल तुम्हाला म्यारेज फिस्ट देईन."

"अगदीं बोलूं नकोस ! " रागानें संतोबा म्हणाले, "तूं अगदीं नीच मनुष्य आहेस. त्या गरीब पोरीला फसवून तूं तिच्या बरोबर लग्न केलेंस !"

"मग त्यांत काय झालं ? सगळ्या गोष्टी सत्यानें वागून थोड्याच आपल्या मनासारख्या होतात ?"

"तुझ्यासारख्या अधम मनुष्याला सत्याच्या गोष्टी काय कळणार ? तुम्ही लोकांना फसवावें, त्यांच्या सुखाचा सत्यानाश करावा आणि त्यांत आनंद मानावा. तुम्हाला ईश्वरानें नांवाला मात्र मनुष्य केलं आहे. बाकी तुम्हीं आणि पशू सारखेच !"

"कांहो संतोबा, तुम्ही आज फारसें तोंड सोडलें आहे ! माझ्या दारूच्या बाटलीला इतक्यांत विसरलां वाटतं ! " मनोहराचें भाषण ऐकून संतोबा थोडे खजील झाले. कारण मनोहरानें त्यांना दोनचारदां मनसोक्त दारू पाजली होती. ते बोलत नाहीं असें पाहून तो पुढें म्हणाला, "मी कुणाला फसविलं, मी कुणाच्या सुखाचा सत्यानाश केला तें तर सांगा ! कां उगाच कांहींतरी बकबक करतां ?"

विमलेला फसविलं नाहींस तर काय केलंस ! आणि नरसिंगरावाच्या सुखाचा सत्यानाश नाहीं केलास तर काय केलंस ! बिचारा वेड्यासारखा त्या कातळावर बसून तिच्या नांवाचा जप करतो."

संतोबांनीं नरसिंगरावाचें नांव काढतांच मनोहराला संशय आला. आपणास ती ह्या दोन ठिकाणीं भेटली नाहीं, तेव्हां ती नरसिंगरावाला भेटण्याकरितां कदाचित् कातळावर गेली असावी असा तर्क बांधून कांहींएक उत्तर न

देतां तो तडक त्या दिशेनें निघाला. नदीजवळ येतांच त्याचा तर्क खरा झाला. नरसिंगराव आणि विमला कातळावर त्याला एकत्र बसलेलीं दिसलीं. त्याला पुढें काय करावें हें सुचेना. इतक्यांत विमलेचें लक्ष त्याच्याकडे जाऊन ती नरसिंगरावाचा घाईघाईनें निरोप घेऊन निघाली आणि अर्ध्या वाटेंतच तिनें आपल्या पतीला गांठलें.

" विमला, तो मनुष्य कोण होता ? "

" नरसिंगराव. "

" त्याला इकडे येऊन भेटण्याचें कारण काय ? तुझा त्याचा काय संबंध ? मी तुला मिशनमध्यें जाण्यास सांगितलें असतां तूं आपल्या प्रियकराला भेटण्याकरितां येथें आलीस काय ? तुला माझी कांहींच भीति वाटली नाहीं काय ? तूं काय म्हणून त्याला भेटलीस ? "

" आपण उगाच कांहीं तरी शंकाकुशंका घेऊं नका. " शांतपणानें विमलेनें उत्तर दिलें. परंतु त्यामुळें मनोहराचा राग चेतला. तो म्हणाला, " शंकाकुशंका काय ? ठीक आहे. घरीं चल म्हणजे सांगतों. तूं अद्यापि मला ओळखलं नाहींस वाटतं ? मला कमी अधिक प्रकार कळला तर तुमचा दोघांचा मी खून करीन. प्रथम त्या तुझ्या प्रियकराचा आणि मग तुझा ! "

आपल्या पतीच्या खऱ्या स्वभावाची ओळख आतां तिला या वाक्यावरून झाली. मनोहरानें हें शेवटचें वाक्य उच्चारतांच असा चमत्कारिक व भयंकर ध्वनि काढले आणि अंगविक्षेप केले कीं जणूं काय तो खरोखरीच खून करीत आहे. विमला कांहींच बोलली नाहीं. तिची छातीं धडधडत होती. ती मनोहराच्या मागून एखाद्या मुक्या जनावराप्रमाणें चालली होती. ती रस्त्याच्या वळणाला लागेपर्यंत कातळावर बसलेल्या नरसिंगरावाला दिसत होती. आणि तो तिच्या मागें अचल दृष्टीनें पहात होता. शेवटीं ती दिसेनाशी होतांच तो उठला. आतां त्याला कातळावर बसण्याचें कारण उरलें नव्हतें. नाहींतर तो बरीच रात्र होईपर्यंत तेथें बसून राही. नंतर तेथून तो म्हाताऱ्या जयेकडे चौकशीकरितां जाई. आणि तेथून घरीं जाई. तोंपर्यंत सहजच रात्रीचे नऊ वाजत असत. परंतु आज तो तास दीडतासांत म्हणजे सहा वाजतांच परत आला. त्यावेळीं कमला बापुसाहेबांच्या माडीवरील खोलींत खिडकींत उभी होती. नरसिंगरावाला परत येतांना पाहून तिला फार आश्चर्य

वाटलें. आणि ती थक्क होऊन म्हणाली, " नरसिंगराव आज इतक्या लवकर कसे परत आले ? "

" काय झालं कमला ?—" बापुसाहेबांनीं तिचें अर्धवट वाक्य ऐकून विचारलें. ते आज बरेच दिवस आजारी होते, त्यबद्दल गेल्या प्रकरणांत उल्लेख केलाच आहे.

" आज नरसिंगराव लवकर परत घरीं आले. "

" कां बरं ? कांहीं आणखी कमी अधिक प्रकार झाला आहे कीं काय ? काय वेड्या पोरानें डोक्यांत खूळ घालून घेतलं आहे. जा—जा, त्याच्याजवळ जा. आणि हें पहा, कसं वागशील त्याच्याशीं ? "

नरसिंगरावाबरोबर कसें वागावयाचें हें आतां कमलेला सांगण्याची आवश्यकता नव्हती. तिनें वडिलांच्या प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं. जातांना फक्त मागें वळून मात्र पाहिलं. ती खालीं आली त्याच वेळीं नरसिंगराव घरांत शिरला. त्याच्याकडे पाहून हास्यवदन करीत कमला म्हणाली, " नरसिंगराव, आज किनई, एक महात्त्वाची गोष्ट घडून आली. सांगूं का तुम्हाला ? "

" खरं का ? येथेंहि घडली का महत्त्वाची गोष्ट ? वाः मग तर मौज आहे. मीहि आज तुला एक महत्त्वाची, अत्यंत महत्त्वाची आणि सर्वात महत्त्वाची गोष्ट सांगणार आहें. " असें म्हणून त्यानें डोकीचा फेटा काढून खुर्चीवर टाकला. तेव्हां कमला पुढें होऊन त्याच्या ओव्हर कोटाचीं बटणें काढूं लागली. अलीकडे तो बाहेर जाऊं लागला म्हणजे त्याला पेहराव चढविण्याचें काम कमलाच करीत असे. तो रात्रीं लवकर घरीं परत यावा म्हणून तिनें त्याचप्रमाणें बापुसाहेबांनीं त्याला सांगून पाहिलें. परंतु तो ऐकेना. त्याला गाडीनें फिरावयास जाण्याचा त्यानीं आग्रह केला परंतु ' मी आतां बरा झालों, आतां मला गाडीची काय जरूर ' असें म्हणून तो गाडींतून बसून जाईनासा झाला. तसेंच कमला किंवा दुसरा कोणी नोकर त्याच्या बरोबर गेला तर तो अधिक भ्रमिष्टासारखें करूं लागे त्यामुळें त्याच्या बरोबर कोणी जाईनासें झालें. शेवटीं ती बाहेर गेल्यावर कांहीं वेळानें त्याच्या मागून एखाद्याला बापुसाहेब पाठवूं लागले. परंतु तो अगदीं ठराविक वेळीं, ठराविक जागीं जातो व तेथें स्वस्थ बसतो असें जेव्हां त्यांच्या लक्षांत आलें, तेव्हांपासून त्याच्यामागून मनुष्य पाठविणें बापुसाहेबांनीं बंद केलें. परंतु तो फार वेळ बाहेर रहातो, शिवाय ते थंडीचे दिवस असल्यामुळें बापुसाहे-

बांनीं त्याला बाहेर जातांना थंडीचा ओव्हरकोट घालून जात जा असें सांगितलें. परंतु एक दोन दिवस त्यानें त्याकडे लक्ष दिलें नाहीं. सायंकाळीं पांच वाजले म्हणजे नेहमींप्रमाणें कपडे करून तो घरांतून बाहेर पडे. तेव्हां बापुसाहेबांनीं कमलेला सांगून ठेविलें. तिनें एके दिवशीं स्वतः नरसिंगरावानें कपडे केल्यावर आपल्या हातानें ओव्हरकोट घातला. त्या दिवशीं रात्रीं तो ठराविक वेळीं परत घरीं आल्यावर जेवतांना म्हणाला, "कमला, तूं आज तो लांब कोट घातला होतास म्हणून मला बिलकूल थंडी लागली नाहीं." त्या दिवसापासून तो ओव्हरकोट घालूं लागला, असो. कमलेनें ओव्हरकोटाचीं बटणें काढल्यावर नरसिंगराव म्हणाला, "सांग--सांग पाहूं तुझी महत्त्वाची गोष्ट ? मग मी माझी सांगेन."

"आज किनई आमच्या घरांतील एका मनुष्याचें 'वॉच' फार 'फॉस्ट' चाललें." हांसत कमलेनें उत्तर दिलें.

"तें बिघडलं असेल कदाचित् !

"कुणास ठाऊक ! वास्तविक तें मनुष्य रात्रीं नऊ वाजल्याशिवाय कधींहि घरीं येत नसे. पण आज त्याच्या घड्याळांत लवकर नऊ वाजले."

"असं असं ! मी आज लवकर आलों म्हणून वाटत ! पण मी कां लवकर आलों तें आहे का तुला ठाऊक ?"

"सांगितल्याशिवाय कसं कळणार ?"

"आज विमला मला भेटली. तिचं लग्न झालं. आणि ती सुखी झाली असं ती म्हणाली."



## २९ विमलेचें पत्र

'मौनिनः कलहो नास्ति.'

आतां बोलायचें नाहीं, असा विमलेनें मनाचा घडा केला. घरीं येईपर्यंत मनोहर सारखा रागानें बोलत होता. परंतु उत्तरादाखल तिनें एकहि शब्द उच्चारिला नाहीं. घरीं येतांच ती मुकाट्यानें आपल्या उद्योगाला लागली. रात्रीं जेवतांना दारू घेतल्यावर मनोहरानें तोंड जोरानें सोडलें होतें तरीहि विमला गप्पच होती. तिनें कसें तरी स्वतःचें जेवण आटोपलें आणि ती

आपल्या खोलींत जाऊन बसली. चार दिवसांपूर्वी पतीबरोबर अटी झाल्यावर ती झोपतांना आपल्या खोलीच्या कड्या वगैरे नीट लावून घेत असे. तिला मनोहराचा आतां विश्वास वाटेनासा झाला होता. ती जात्याच अत्यंत खंबीर मनाची असल्यामुळें आपणास सर्व आयुष्य कुठें घालवावयाचें आहे, आणि तें कसें घालवायचें आहे याचा तिनें स्वतःशीं पूर्ण विचार केला होता. मनोहरानें आपणास विकत घेतलें आहे असा आतां तिनें आपल्या मनाचा ग्रह करून टाकिला होता. त्याच्या घराची व्यवस्था ठेवणें, त्याचें दुखणेंबाणें पहाणें हेंच आपलें काम. आणि याबद्दल तो घालील तें अन्न आणि देईल ते वस्त्र या पलीकडे आपणास त्याच्यापासून जास्त कशाचीहि अपेक्षा करावयाची नाहीं असें तिनें ठरविलें होतें. त्यामुळें तिला मनोहराची भीति वाटेनाशी झाली होती. परंतु आज घडलेला प्रकार फार चमत्कारिक होता. रागाच्या भरांत तो आपणास त्रास देईल, कदाचित् भलताच प्रसंग आपणावर आणील अशी भीति वाटून वर लिहिल्याप्रमाणें ती कसंतरी जेवण आटोपून स्वतःच्या खोलींत गेली. त्या रात्रीं तिला झोंप कशी ती आली नाहीं. पहाटेच्या सुमारास तिचा किंचित् डोळा लागला. आणि त्यांत तिला एक भयंकर स्वप्न पडलें. मनोहरानें पुष्कळ दारू पिऊन आपणास शिव्या-गाळी आणि मारहाण चालविली आहे. शेवटीं त्या दारूच्या निशेंत तो नरसिंगाला ठार मारण्याची प्रतिज्ञा करून घरांतून बाहेर पडला. आपण त्याच्यामागें जाऊन त्याची पुष्कळ विनवणी केली, हातापायां पडलों, परंतु आपणास मारून तो नदीवर गेला आणि नरसिंगराव एका दगडावर बसलेला पाहून त्याला काठीनें मारण्यास सुरवात केली. आपण त्याचा हात धरला आहे. परंतु आपल्या हाताला हिसका देऊन त्यानें नरसिंगरावाला इतकें मारलें कीं, शेवटीं तो खालीं पडला.' इतकें स्वप्न पाहून ती ओरडत जागी झाली. तिच्या सर्वांगाला घाम सुटला. भीतीनें ती थरथर कांपूं लागली. थोड्या वेळानें आपण कुठें आहोंत हें तिच्या लक्षांत आलें, तेव्हां आपण हा सर्व प्रकार स्वप्नांत पाहिला अशी खात्री होऊन तिची भीति कमी झाली.

तो रविवार असल्यामुळें मनोहराला रजा होती. सकाळीं तो गप्प होता. विमलेनें त्याला चहा आणि सकाळची न्याहारी दिली. ती मुकाट्यानें आपल्या गृहकृत्याचा कार्यक्रम आटपत होती. दोन वाजण्याच्या सुमारास मनोहराचें जेवण झालें. रविवारीं किंवा इतर रजेच्या दिवशीं तो सकाळच्या

जेवणावरहि दारू घेत असे. त्याप्रमाणें आजहि त्यानें दारू घेतली. थोड्या वेळानें दारूचा अंमल चढतांच त्याच्या तोंडाची सुरुवात झाली. विमलेनें स्वतःला दिलेल्या शिव्या मुकाट्यानें ऐकून घेतल्या, परंतु नरसिंगरावाला जेव्हां त्यानें शिव्या देण्यास आणि कानानें ऐकवणार नाहींत असे शब्द उच्चारण्यास सुरुवात केली, तेव्हां तिला राहवेना. शेवटीं ती पुढें होऊन म्हणाली, " तुम्हीं कालपासून हें काय मांडलें आहे ? मला तुम्ही वाटेल तें बोला, माझें वाटेल तें करा; पण त्यांना कां उगाच बोलतां ? "

" त्यांना कोणाला ?—त्या तुझ्या प्रियकराला ? "

" हें तुम्हीं काय अभद्र बोलतां ? नरसिंगराव माझे भाऊ आहेत. त्यांना भेटलं म्हणून काय झालं ? "

भेटलें म्हणून काय झालं ? ×× ! तो तुझा भाऊ नाहीं पण ×× आहे ! तूं त्याला भेटणार काय ? पहातों—पहातों आतां कशी भेटतेस तें ! "

" मी आतां तुम्हाला स्पष्ट सांगतें. माझ्यावर तुम्ही विश्वास ठेवा अगर ठेवूं नका ! मला माझा धर्म कळतो आहे. मी तुमच्याबरोबर लग्न केलं आहे हें मी विसरलें नाहीं. माझ्याविषयीं शंका घेण्याचं तुम्हाला कारण नाहीं. "

" मग तूं त्याला भेटणार काय ?—, या घरांतून बाहेर पाऊल तर टाक कीं पहा काय होतं तें ! "

विमला विचारांत पडली. आपण नरसिंगरावाला आज भेटतों म्हणून कबूल केलें आहे, त्याप्रमाणें तो कातळावर आपली एकसारखी मार्गप्रतिक्षा करीत राहील हे विचार तिच्या मनांत येऊन आपण परस्वाधीन असतां असें वचन दिलें ही मोठी चुकी केली म्हणून तिचें मन तिला खाऊं लागलें. ती मुकाट्यानें आंत जाऊन बसली. तिचें मन अगदीं गोंधळून गेलें. बाहेर दारूच्या निशेंत मनोहराची बडबड आणि आदळाआपट चाललीच होती. ह्या एका दिवसाच्या पतीच्या वागणुकीचा तिला इतका मनस्वी त्रास झाला कीं, तिच्या मनांत आतां भयंकर विचार येऊं लागले. आपणास मनोहरानें फसवून आपणाशीं लग्न केलें तथापि आपणास त्याच्याच बरोबर आयुष्य काढिलें पाहिजे, आणि तें आयुष्य कसें काढावें लागणार याचा विचार करून तनें भावी आयुष्यक्रमाच्या दिशा आंखून ठेविल्या होत्या. तथापि रात्रीं-पासून मनोहरानें आपलें वर्तन बदलतांच तिच्या मनाला असह्य जाच होऊं लागला. आणि त्याचा परिणाम, भलतेच विचार तिच्या मनांत येऊं लागले.

आपण आतां जीव द्यावा आणि ह्या सर्व त्रासाचा, जाचाचा आणि दुःखाचा शेवट करावा असेंच तिला वाटूं लागलें. मनोहरासारख्या खुनशी विचाराच्या मनुष्याजवळ पत्नी या नात्यानें राहून आपलें पातिव्रत्य रक्षण करणें यापुढें फार कठीण आहे, म्हणून आत्महत्या करून त्याच्या हातून स्वतःची सुटका करून घेणेंच चांगलें असें वाटून ती आत्महत्या करण्याकरितां साधन पाहूं लागली. अफु किंवा दुसरा एखादा विषारी पदार्थ खावा तर तो आपणास कोण आणून देणार ? ही अडचण पुढें आली. इतक्यांत तिला मनोहराजवळ असलेल्या वस्तऱ्याची आठवण झाली. आज सकाळीं त्यानें स्वतः दाढी केली होती, आणि वस्तरा कुठें ठेविला हेंहि तिला माहीत होतें. आपल्या कामाला वस्तरा हेंच शस्त्र उत्तम असें तिला वाटलें. एका झटक्यांत सर्व काम होईल; फक्त डोळे बंद करून गळ्यावर ठेवण्याचा अवकाश कीं झालें काम ! हा विचार तिच्या मनांत येऊन क्षणभर तिची मुद्रा गंभीर दिसूं लागली. तोंच तिच्या मनांत दुसरा विचार आला. आपण आत्महत्या करणार म्हणजे काय करणार ? पतीला संकटांत घालणार. आपणास त्याच्यापासून आपलें पातिव्रत्य रक्षण करावयाचें असलें तरी तो आपला पती आहे. शिवाय आपणावर त्याचे उपकार आहेत; तेव्हां आपणास स्वाभाविक मरण येण्यापूर्वीं आपण आत्महत्या करणें म्हणजे त्याचें उपकाराचें ऋण फेडण्यास आपण पत्नीच्या नात्यानें बांधलें गेलों असतां तें टाळणें होय. शिवाय आपल्या आत्महत्येमुळें पति संकटांत पडणार आणि तो पतिद्रोह होणार, इत्यादि विचार तिच्या मनांत येऊन तिनें आत्महत्येचे सर्व विचार आपल्या डोक्यांतून काढून टाकले. तिचें सर्वांग किंचित्काल थरारलें. जणूं काय हे पतिद्रोही विचार तिच्या मनांतून जातांच आपण खरोखरीच एक मोठ्या संकटांतून वाचलों असेंच तिला वाटलें.

वाचकहो ! आतांपर्यंत जवळजवळ आपण दोनशें पृष्ठें आमच्या नायिकेचें चरित्र वाचलें. त्यावरून आपण तिच्याविषयीं काय कल्पना करूं शकाल ? ग्रहदशेच्या फेऱ्यामुळें संकटाच्या कैचींत अगदीं पूर्णपणें सांपडली असतां तिचे वेळोवेळीं आपण वाचलेले विचार आणि शेवटचे हे वर लिहिलेले विचार आपणास काय सांगत आहेत ? नरसिंगरावाच्या सहवासांत असतांना त्यानें तिला सांगितलेल्या आर्यस्त्रियांच्या पुराणांतील गोष्टी, आणि तिनें वाचलेल महाभारत, रामायण यांतील सार तिच्या मनावर पूर्णपणें बिंबलेलें

नाहीं काय ? पतीविषयीं कर्तव्य, पातिव्रत्यरक्षणाविषयीं तिचा निश्चय, तिचा उदात्त स्वभाव, निष्कलंक वर्तन आणि प्रेमाकरितां तिनें केलेला भयंकर स्वार्थत्याग या सर्व गोष्टीवरून तिच्या मनावर आर्यस्त्रीचे संस्कार झाले नव्हते असें कोण म्हणेल ?

रात्रीं तिला दोन घांसहि ग्याववले नाहींत. आणि आजही तिला एक घांस देखील जाईना. ती खिडकीजवळ उभी राहून शून्य दृष्टीनें बाहेर पहात होती. त्यावेळीं पांच वाजून गेले होते. डेपोच्या मागच्या पटांगणांत कांहीं मुलें खेळत होतीं. त्या मुलांत जिवा पोरहि खेळतांना तिच्या दृष्टीस पडला. त्याला पाहतांच तिच्या मनांत एक विचार आला. ती बाहेरच्या खोलींत आली. मनोहर मेजाजवळ बसला होता. विमला बाहेर जातांना पाहून तो तिला म्हणाला, " कुठें चाललीस ? त्या तुझ्या ×× कडे निघालीस काय ?—फीर मागें. " असें म्हणून तो उठला. आणि तिच्या दंडाला हिसका देऊन त्यानें तिला आंतल्या खोलींत ढकललें. त्याचवेळीं दरवाजावर एक मनुष्य येऊन उभा राहिला. विमलेनें त्याच्याकडे पाहिलें आणि कांहींएक न बोलतां ती पुनः आंत गेली. त्याच संधीला जिवा चेंडूच्या मागें धांवत अगदीं खिडकीजवळ आला होता. विमला पुनः खिडकींत जाऊन उभी राहण्यास आणि जिवानें वर पाहण्यास एकच गांठ पडली. त्याबरोबर हातांतील चेंडू तसाच खालीं टाकून तो आश्चर्यानें म्हणाला, " कोण विमलाताई !—तुम्ही इकडे कुठें ? "

" अरे, मोठ्यानें नको ओरडूं. इकडे ये. माझं एक काम करतोस का ? "

" सांगा, मी कधीं नाहीं म्हटलं ! सांगा—नरसिंगरावाकडे जाऊं ? "

" होय. त्याच्याचकडे जावयाचं आहे. पण ते तुला घरीं भेटणार नाहींत. आतां ते माझी वाट पहात कातळावर बसले आहेत."

" होय होय. ते रोज जाऊन तिकडे बसतात खरे ! मी त्यांना पुष्कळदां तिकडे पाहिलें आहे. आणि ते तेथेंच नाहीं का त्या कातळावर बायसिकली-वरून पडले ? '

" होय. ते तिकडे पडले आणि तूंच नाहीं का मला येऊन घरीं सांगितलंस. एक दीर्घ श्वास सोडून विमला पुढें म्हणाली, " मी त्यांना काल तिकडे जाऊन भेटलें होतें. आणि आजहि भेटेन म्हणून सांगितलं आहे. त्याप्रमाणें ते माझी वाट पहात तिकडे बसले असतील. तूं आतां त्यांना जाऊन सांग

कीं, मला आज यावयास मिळणार नाहीं. तुम्ही माझी वाट पहात न बसतां घरीं जा. मी केव्हांतरी आपली भेट घेईन. आणि भेट घेण्यापूर्वी मी आपणास सांगून पाठवीन. तुम्ही मात्र इकडे येऊन मला भेटण्याचा प्रयत्न करूं नका. जा— इतकें काम कर."

"पण विमलाताई, तुम्ही इकडे कशा आलां तें मला सांगा ना?"

"उद्यां दोन प्रहरीं इकडे ये म्हणजे तुला सर्व सांगेन. पण प्रथम माझें हें काम कर."

जिवानें जमिनीवर पडलेला चेंडू उचलून पलीकडे खेळत असलेल्या मुलांकडे फेंकला. आणि तो विमलेनें सांगितलेल्या कामगिरीवर निघाला. तो दृष्टीआड होतांच विमलेला आपल्या डोक्यावरून एक मोठा भार उतरल्यासारखें वाटलें. ती खिडकींतून मागें झाली, तोंच बाजूच्या खोलींतून मनोहरानें दारूच्या निशेंत उच्चारलेलें पुढें दिलेलें वाक्य तिला स्पष्ट ऐकू आलें.

"ती नाहीं तिचा बाप लिहून देईल. तूं मात्र फसवूं नकोस!"

पतीच्या मुखांतील हें वाक्य ऐकून त्यांच्या आपणाविषयींच कांहीं तरी गोष्टी चालल्या आहेत असा तिनें तर्क केला. परंतु त्या गोष्टी आपण बाजूला उभें राहून ऐकाव्या अशी कल्पनाहि तिच्या मनांत आली नाही. ती मुकाट्यानें पलीकडील खिडकींत जाऊन उभी राहिली. इकडे तिचा पति एक निराळेंच कारस्थान रचण्यांत गुंतला होता. आणि तें कारस्थान फारच भयंकर होतें. तो ज्या मनुष्याबरोबर बोलत होता, तो मनुष्य जातीचा भिल्ल होता. परंतु त्यानें केलेल्या पोषाखावरून तो भिल्ल असावा अशी कोणालाच शंका येण्यासारखी नव्हती. त्याला पाहतांच तो एखादा गरीब शेतकरी असावा असेंच कोणी म्हटलें असतें. तो कान्ह्या* भिल्लाच्या टोळींतील होता. त्याचे

* ज्या कान्ह्या भिल्लाचें वसतिस्थान नगर जिल्ह्याच्या सीमेवर डोंगरगण नांवाच्या डोंगरावर होतें. त्यानें नाक कापलेले कांहीं मारवाडी नगर जिल्ह्यांत कांहीं गांवांतून त्यावेळीं दृष्टीस पडत. त्याला व त्याच्या टोळीला पकडण्याकरितां सरकारांतून मोठमोठीं बक्षिसें लाविलीं होतीं. आणि एक स्पेशल पोलीसपार्टी नेमली होती. पुढे हा कान्ह्या भिल्ल निजाम सरकारच्या हद्दींत पकडला गेला. आणि तेथें त्याची चौकशी होऊन त्याला देहान्ताची शिक्षा झाली. ही शिक्षा अशी अमलांत आणिली कीं, भर पटांगणांत एक मोठा खड्डा खणून त्यांत त्याला उभें केलें. आणि बाजूनीं तो खाडा चुन्यानें भरून काढिला. नंतर त्या चुन्यावर पाण्याच्या पखाली ओतल्या. अशा रीतीनें कान्ह्या भिल्लाचें सर्वांग भाजून त्याचा देहान्त झाला.

नांव पिऱ्या भिल्ल असें होतें. त्यावेळीं ह्या कान्ह्या भिल्लाच्या टोळीनें सबंध नगर जिल्ह्याला मोठी दहशत बसविली. कोणत्या वेळीं ते कोणत्या गांवीं हल्ला करतील याचा नेम नव्हता. विशेषेंकरून तो मारवाड्यांचा कट्टा दुष्मान होता. हा दरोडेखोराचा धंदा पत्करण्यापूर्वी हा कान्ह्या भिल्ल एका सधन मारवाड्याकडे त्याच्या वखारीवर पहारा करण्याच्या नोकरीवर होता. पुढें वर्षाअखेर हिशेब चुकता करण्याच्या वेळीं त्या मारवाडी शेटजीनीं आपल्या कारकुनाकडून त्याचा जमाखर्च बरोबर दाखवून त्याच्या हातीं पगारापकीं एक पैसाहि पडूं न देतां त्याला घालवून दिलें. तेव्हां कान्ह्या भिल्लानें भयंकर प्रतिज्ञा केली. आणि त्या प्रतिज्ञेप्रमाणें त्यानें आपली एक टोळी जमवून तो मारवाड्यांच्या घरावर दरोडा घाली. आणि मारवाड्यांचीं नाकें आणि कारकुनाचीं पहिलीं बोटें कापण्याचा त्यानें सपाटा चालविला. सहसा हा कान्ह्या गरिबाच्या वाटेला जात नसे. तथापि त्याचें नांव ऐकतांच प्रत्येक मनुष्य चळचळ कांपत असे.

आज कान्ह्या भिल्लाचा मुक्काम तलावाजवळ पडला होता. आणि तेथून त्यानें पिऱ्याला दारू आणण्याकरितां डेपोंत पाठविले होतें. त्याप्रमाणें आपणास कोणी ओळखूं नये म्हणून साधा वेष घेऊन तो डेपोंत आला होता. गुत्तेवाल्याला नाहीं म्हणण्याची छातीच नव्हती. परंतु कॉन्ट्रॅक्टरचा आपणावर रोष होऊं नये म्हणून गुत्तेवाल्यानें पिऱ्याला मनोहराकडे पाठविलें. आणि त्याप्रमाणें तो मनोहराच्या बिऱ्हाडीं आला होता. आपण नाहीं म्हटलें तर उद्यां कान्ह्या भिल्ल सर्व डेपो उध्वस्त करून टाकील अशी मनोहराचीहि खात्री होती. तेव्हां तोहि मुकाट्यानें त्याला दारू देण्यास तयार झाला परंतु, त्याबद्दल त्यानें पिऱ्याकडून आपलें काम करून घेण्याचें ठरविलें. तो म्हणाला, " पिऱ्या मी तुझ्या नाईकाला दारू देतों पण त्याबद्दल तुला माझें एक काम केलें पाहिजे. मला एका मनुष्याला मारावयाचें आहे. आणि एवढें काम जर तूं करशील तर मी तुला स्वतःला हवी तेवढी दारू पाजीन आणि शिवाय पांच रुपये बक्षीस देईन. " त्यावर पिऱ्या भिल्ल म्हणाला, " ठीक आहे. काढा रुपये आणि दाखवा तो मनुष्य! म्हणजे उरकून टाकतों. आतांच तुमचें काम!

" पण आतां दिवसा तूं हें काम कसें करशील? जरा काळोख पडूं दे. "

" बरं मग मी नाईकाला दारू नेऊन देतों आणि दिवे लागण्याच्या सुमारास परत येतों. मग तुम्हीं मला तो मनुष्य दाखवा, पण मास्तर, हे

गोष्ट आमच्या नाईकाला कळतां उपयोगी नाहीं. नाहींतर तो मला रुपये पचूं देणार नाहीं."

"त्याची नको तुला काळजी. तूं ये मग मी तुला लांबून तें घर दाखवीन."

"घर दाखवून काय उपयोग? मला अमुकच मनुष्य कसा ओळखतां येणार? तुम्ही त्या मनुष्याला दाखवा म्हणजे मी माझें काम करतो."

मनोहराला विचार पडला. नरसिंगराव रात्रींच्या प्रहरीं आपणास एकटाच कसा मिळणार हा त्याला विचार पडला. थोड्या वेळानें त्याला एक युक्ति सुचली. विमलेनें जर पत्र लिहिलें तर तो वाटेल त्या वेळीं वाटेल त्या ठिकाणीं येईल अशी त्याची खात्री होती. त्याप्रमाणें त्यानें आपली युक्ति पिऱ्याला सांगितल्यावर 'ती पत्र देईल काय?' अशी पिऱ्यानें शंका काढतांच मनोहरानें उत्तरादाखल उच्चारलेलें वाक्य वर उल्लेख केल्याप्रमाणें विमलेच्या कानीं पडलें. आणि ती दुसऱ्या खिडकींत जाऊन उभी राहिली नाहीं तोंच दरवाजा उघडून मनोहर आंत आला. तो जवळ येतांच विमलेला त्याच्या तोंडाची दारूची वसकन् घाण आली. तो म्हणाला, "विमला, जरा बाहेर ये, मला तुझ्याशीं कांहीं महत्त्वाचें काम आहे."

एकहि शब्द न उच्चारतां विमला बाहेर आली. पिऱ्या दरवाजाजवळ एका खुर्चीवर बसला होता. विमला त्याच्याकडे पहात उभी राहिली तेव्हां मनोहर म्हणाला, "बैस. आणि मीं सांगतों तसें एक पत्र लिहून दे." अतिशय दारू झाल्यामुळें आपलें अक्षर चांगलें येणार नाहीं म्हणून मनोहर आपणास पत्र लिहावयास सांगतो असें वाटून ती मुकाट्यानें खुर्चीवर बसली. आणि मेजाच्या खणांतून लिहिण्याचें साहित्य बाहेर काढून म्हणाली, "पत्र कोणाला लिहावयाचें?"

"तुझ्या प्रियकराला—त्या नरसिंगरावाला लिही—मी सांगतों त्याबरहुकूम लिही—पहातेस काय? हं—कर सुरुवात. 'माझे प्रियकर नरसिंगराव यांस, आज रात्रीं बरोबर नऊ वाजतां मला कातळावर येऊन भेटावें—असं लिही आणि खालीं सही कर. हं—आटप."

"मी असें पत्र कशाला लिहूं? मला त्यांना भेटण्याची आतां इच्छा नाहीं."

"तुझी इच्छा नसली तरी आमची इच्छा आहे. आज रात्रीं आम्ही त्या तुझ्या ×× ला मारणार—तुझा सूड उगविणार!"

"मी असें पत्र केव्हांहि लिहिणार नाहीं."

"तुला असंच पत्र लिहिलं पाहिजे. बोल—लिहितेस कीं नाहीं?"

"नाहीं."

"काय—नाहीं लिहीत?—नाहीं लिहीत?"

"नाहीं—त्रिवार नाहीं."

विमलच्या तोंडांतून 'नाहीं' असा शब्द बाहेर पडतांच त्या चांडाळानें फाडकन् तिच्या तोंडांत मारिली. त्याबरोबर विमला खुर्चीवरून कोलमडून खालीं पडली. "[illegible] तरी मुकाट्यानें लिहीशील कीं नाहीं? गंडे ×× त्या तुझ्या ×× ला लिहितेस कीं नाहीं?" विमलेनें उठतां उठतां पुनः निश्चयात्मक स्वरानें उत्तर दिलें, "मी असें खोटें पत्र लिहिणार नाहीं. तुम्ही माझा कां उगाच छळ करतां?"

"छळ!—" असें म्हणून त्या नराधमानें ती उठत असतां जोरानें तिला लाथ मारिली. त्यामुळें तिचें डोकें मेजाच्या पायाला आपटलें आणि त्या मेजावरील दारूची बाटली आणि ग्लास खालीं पडून फुटलें. सर्व दारू जमिनीवर सांडली. तें पाहून मनोहर जास्तच चिडला आणि त्यानें त्या रागाच्या आवेशांत तिच्या पाठींत जोरानें दणका दिला. त्याबरो-बर तिचा सर्व तोल पुढें गेला. जमिनीवर सर्व कांचा पडल्यामुळें त्यावर पडूं नये म्हणून कांचा टाळून तिनें आपले दोन्ही हात एकदम जमिनीवर टेकले. परंतु एक कांच तिच्या डाव्या हाताच्या तळव्यांत शिरली. तोंच मागून 'कोण कांगावखोर ×× आहे!' असें म्हणून पाषाणहृदयी मनोहरानें तिला जोराचा धक्का दिला. विमला धाडकन् जमिनीवर पडली. तें पाहून पिऱ्या उठला आणि त्यानें मनोहराला धरून बाजूला केलें. विमला मुकाट्यानें उठली. तिच्या कपाळांत एक कांच लागून त्यांतून सारखें रक्त वहात होतें. हातांतूनहि रक्ताचा प्रवाह सुरू होता.

"बोल—मुकाट्यानें लिहितेस किं नाहीं?"

आतां नाहीं म्हणणें म्हणजे असेच हाल करून घेणें हें ती जाणून होती. आपणास मृत्यु यावा अशी जरी विमलेची इच्छा होती तरी अशा रीतीनें हालहाल होऊन आपणास मरण यावें अशी मात्र तिची इच्छा नव्हती. ती मुकाट्यानें कपाळावरील रक्त पदरानें पुशीत उठली. आणि कांहीं एक न बोलतां तिनें नरसिंगरावाला रात्रीं नऊ वाजतां कातळावर भेटण्याबद्दल आपल्या सहीनिशीं पत्र लिहिलें. मनोहरानें तें हातांत घेऊन शेवटपर्यंत वाचून

पाहिलें आणि तें अगदीं आपल्या मनासारखें लिहिलें आहे असें पाहून तो म्हणाला, " लकडीशिवाय मकडी वळत नाहीं ! पाहिलंस पिऱ्या, तूं म्हणत होतास कीं ती लिहून देणार नाहीं. पण पहा, दोन रट्टे देतांच कशी वळली ती !—हं, आतां तूं काय करणार ? "

" मला नाईकांनीं मागितलेली दारू द्या. मग मी जातांना हें पत्र बापुसाहेबांच्या घरीं देऊन ठेवतों आणि नाईकाला विचारून तसाच परत येतों. "

मनोहरानें तें पत्र पाकिटांत घालून बंद केलें आणि त्यावर नरसिंगरावाचें नांव लिहिलें. नंतर तें पत्र पुढें करून तो म्हणाला, " पिऱ्या, पत्र दुसरें कोणीं फोडणार नाहींना ? "

" त्याची नका आपण काळजी करूं ! " पिऱ्यानें तें पत्र आपल्या डोक्याला गुडाळलेल्या फडक्यांत खोंचून ठेविलें. नंतर तो उठला. मनोहरहि त्याच्या मागून बाहेर पडला. परंतु त्याच्या झोंकांड्या जात होत्या. दारूच्या निशेमुळें त्याचा पाय जमिनीवर ठरत नव्हता. डेपोच्या दुकानांत आल्यावर त्यानें गुत्तेवाल्याकडून पिऱ्यानें आणलेलें मडकें त्याला दारूनें भरून दिलें. पिऱ्या मुकाट्यानें तेथून निघाला. तो मोठ्या सडकेवर आला. त्यावेळीं नरसिंगराव त्याच्या पुढेंच चालला होता. परंतु आपण ज्याच्या नांवाचें पत्र घेऊन जात आहोंत तो हाच मनुष्य असें पिऱ्यानें ओळखलें नाहीं. विमलेनें कबूल केल्याप्रमाणें कातळावर बसून नरसिंगराव तिची वाट पहात बसला असता कांहीं वेळानें विमलेनें पाठविलेला जिवा तेथें गेला आणि त्यानें नरसिंगरावाला विमलेचा निरोप सांगितला. ' आज मला येतां येत नाहीं. केव्हां भेटावयाचें तें मी कळवीन, परंतु तुम्हीं मला भेटण्याचा प्रयत्न करूं नका ' असा जिवानें त्याला निरोप कळविला. तेव्हां निराश होऊन नरसिंगराव परत घरीं येण्याकरितां निघाला. विमलेचा सर्व वृत्तांत ऐकण्यास तो अत्यंत उत्सुक झाला होता. आज घरून निघतांना तो मोठ्या उत्साहानें निघाला होता. नदीवर येत असतां तो वरचेवर मागें वळून पाही. कदाचित् विमलाहि आपणास भेटण्याकरितां येत असतांना वाटेंतच भेटेल, मग आपण दोघेंहि बोलत बोलत कातळावर जाऊं म्हणून तो क्षणोंक्षणीं मागें वळून पाही. परंतु जिवानें आणलेला निरोप ऐकून त्याची सर्व जिज्ञासा जागच्याजागींच राहिली.

नरसिंगराव घराच्या मोठ्या दरवाजाजवळ येऊन क्षणभर उभा राहिला. आज तो कालच्यापेक्षां लवकर घरीं परत आला होता. परंतु कालच्या आणि

आजच्या त्याच्या मनःस्थितींत पुष्कळ तफावत होती. विमला भेटल्यामुळें तो काल आनंदी होता. त्याच्यापूर्वी विमलेमुळें तो भ्रमिष्ट झालेला होता आणि आज तो विमला न भेटल्यामुळें दुःखी झालेला होता. दरवाजाजवळ येऊन तो थांबला, तोंच मागून पिऱ्या आला. त्यानें ' नरसिंगराव कुठें आहे ' अशी चौकशी केली. नरसिंगरावानें त्याला डोक्यापासून पायापर्यंत नीट अवलोकन केलें आणि विचारलें, " कां ? नरसिंगरावाजवळ तुझें काय काम आहे ? मीच नरसिंगराव. "

" एक पत्र तुम्हाला डेपोच्या मागें राहणाऱ्या बाईनें दिलें आहे. " आपल्या डोक्यावरील दारूचें मडकें खालीं ठेऊन फडक्यांत गुंडाळून ठेवलेलें पत्र काढीत पिऱ्या म्हणाला, " मी तेथून येत असतां त्या बाईनें मला हाक मारून ह्या घराचा पत्ता सांगितला आणि हें मत्र नरसिंगरावाला दे असें ती म्हणाली."

" मीच-मीच नरसिंगराव ! दे कुठें आहे तें पत्र ?—विमलेचेंच तें पत्र ! "



## ३० राक्षसी कृत्य

गेल्या प्रकरणांत उल्लेख केल्याप्रमाणें पत्र लिहून तें मनोहराच्या हातांत दिल्यावर विमला आंत आल्यानंतर तिला हुंदक्यावर हुंदके येऊं लागले. तिच्या कपाळांत कांच शिरून मोठी जखम झाली होती. त्याचप्रमाणें तळहाताची जखमहि मोठीच होती. त्या दोन्ही जखमेंतून सारखा रक्तस्राव होत होता. ती वरचेवर आपल्या पदरानें तो रक्तस्राव पुसून काढी, परंतु कांहीं केल्या रक्त थांबेना. शेवटीं आंत आल्यावर थंड पाण्यानें तिनें दोन्ही जखमा धुवून काढल्या आणि त्यावर कापूस जाळून बांधला. हा सर्व प्रकार चालू असतां तिचे हुंदकेहि चालूच होते. आतां आपला ह्या घरांत कसा निभाव लागेल; मनोहर आपला किती छळ करील; आणि आपलें पुढलें आयुष्य किती कष्टमय जाईल इत्यादि अनेक विचार तिची भीति आणि चिंता अधिकाधिक वाढवूं लागले. आजच्यासारखा भयंकर खडतर दिवस ती आपल्या सर्व आयुष्यांत आज प्रथमच अनुभवीत होती. पुष्कळ वेळ रडल्यावर तिला थोडें हलकें वाटूं लागलें. ती आतां उठली आणि रक्तानें खराब झालेलें लुगडें बदलून ती दुसरें नेसूं लागली. त्यावेळीं समोर टांगलेल्या

आरशाकडे तिची सहज दृष्टि गेली. त्यांत तिला स्वतःचें प्रतिबिंब दिसलें. मनोहरानें थोबाडींत मारल्यामुळें तिचा डावा गाल सुजला होता. कपाळावर झालेली जखम एक इंच लांबीची होती. आणि त्यावर जाळलेला कापूस लावल्यामुळें तो एक कपाळावर आडवा काळा पट्टा दिसत होता. थोड्या वेळानें बाहेरचा दरवाजा वाजला. त्याबरोबर तिची छाती धडधडूं लागली. मनोहर परत आला असेल असें वाटून तिला भीति वाटूं लागली. आणि त्याबरोबरच तो आपला पति आहे, त्याच्याबरोबर आतां आपणास सर्व जन्म घालवावयाचा आहे हा विचार तिच्या डोक्यांत येतांच तिच्या मनांत भीतीचा गोळा उठला. एखाद्या क्रूर श्वापदाच्या गुहेंत सांपडलेल्या एखाद्या गरीब हरिणीप्रमाणें आपण ह्या मनोहररूपी नरव्याघ्राच्या गुहेंत सांपडलों आहोंत असें आतां तिला वाटूं लागलें. ती इकडे तिकडे भयभीत दृष्टीनें पाहूं लागली जणूं काय त्या गुहेंतून पळून जाण्याकरितां तिचें मन एखादी वाट शोधीत होतें.

मनोहर पिऱ्याला दारू देऊन परत येतांना स्वतःकरितां एक बाटली घेऊन आला होता. प्रत्येक रविवारीं तो आपल्या प्रभूच्या विश्रांतीचा दिवस पाळण्याकरितां नेहमींपेक्षां थोडी जास्त दारू पीत असे. परंतु आज मात्र त्यानें दारू पिण्याची शिकस्तच केली. घटके घटकेला तो एक एक दारूचा घोट घेई आणि त्याबरोबर नरसिंगरावाला आणि विमलेला अगणित शिव्या देई. तो आतां आंत येतांच त्यानें नरसिंगरावाचें नांव उच्चारून दिलेली शिवी ऐकतांच विमलेला एकदम पत्राची आठवण झाली. आपण निरुपायास्तव लिहिलेलें पत्र खरें समजून नरसिंगराव रात्रीं कातळावर जाईल आणि स्वतःचा जीव धोक्यांत घालील, हा विचार तिच्या डोक्यांत येतांच तिला कांहीं सुचेना. आपण पत्र लिहून दिलें ही मोठी चूक केली असें आतां तिला वाटून तिचें मन तळमळूं लागलें. मनोहर त्या दुसऱ्या मनुष्याच्या साहाय्यानें नरसिंगरावावर कांहीं तरी भयंकर संकट आणील अशी तिची ठाम समजूत होऊन चुकली होती. आतां हें नरसिंगरावावरील संकट कसें टाळावें म्हणून तिनें पुष्कळ विचार केला. एकदां तिला वाटे कीं, आपण असेंच जाऊन नरसिंगरावाला भेटावें आणि पत्राबद्दल सर्व खरी हकीकत त्याला सांगावी, एकदां वाटे कीं, मनोहराची मनधरणी करून त्याचें मन वळवावें आणि त्यानें कोणत्याहि प्रकारचा अत्याचार करूं नये अशी व्यवस्था करावी. अशा रीतीनें तिनें पुष्कळ विचार केला परंतु काय करावें याबद्दल तिचें एकमत होईना. हळुहळु सायंकाळ होऊं लागली.

आतां तिची स्वयंपाकाला लागण्याची वेळ होत आली. परंतु सकाळीं केलेल्या स्वयंपाकापैकीं अर्धा अधिक स्वयंपाक तसाच शिल्लक होता. शेवटीं त्यावरच आतांची वेळ भागवून घेण्याचा तिनें विचार ठरविला.

दिवे लावण्याची वेळ होतांच विमला हळूच बाहेर आली. मनोहर आपल्या विचारांत स्वस्थ बसला होता. पिऱ्या आल्यावर पुढें काय करावयाचें याबद्दल त्याचा विचार चालू होता. विमला आंत येतांना तिची चाहूल ऐकून मनोहर म्हणाला, " तूं आंत बसून करतेस काय ? ह्या येथें सर्व कांचा पडल्या आहेत त्या कोण काढणार ? येणार आहे का तुझा तो ×× ? "

विमलेनें हळूंच दिवा लाविला आणि कांहींएक न बोलतां सर्व खोलीभर पसरलेल्या कांचा गोळा केल्या. मनोहर तो सर्व प्रकार पहात स्वस्थ बसला होता. विमला आंत जाऊं लागली तेव्हां ' जेवण तयार असल्यास घेऊन ये ' असा त्यानें हुकूम दिला. विमलेनें सकाळचे राहिलेले पदार्थ पुनः गरम करून ते आणून त्याच्यापुढें ठेविले. परंतु त्यापैकीं एक देखील पदार्थ त्यानें धडपणें खाल्ला नाहीं. विमला दरवाजाजवळच एखाद्या दोनवाण्याप्रमाणें उभी होती. पत्राबद्दल विचारावें किंवा नाहीं याचा बराच वेळ विचार केल्यावर तिनें मनाचा हिय्या करून शेवटीं विचारलें, " अशा अपरात्रीं आपण नरसिंगरावांना खोटेंच लिहून कातळावर कशाला बोलाविलें ? आपण खरोखरीच त्यांना तें पत्र पाठविलें आहे काय ? "

मनोहरानें उत्तर न देतां आपल्या चिरुटाच्या धुराकडे पहात तो स्तब्ध बसला होता. थोड्या वेळानें त्याच्यापुढें मेजावर असलेलें जेवणाचें ताट उचलतांना पुनः विमलेनें तोच प्रश्न केला. तरी देखील त्यानें उत्तर दिलें नाहीं. विमला उत्तराची अपेक्षा करीत दरवाजांतच उभी होती. इतक्यांत घड्याळांत आठाचे ठोके पडले. तेव्हां मनोहर स्वगत म्हणाला, ' अद्यापि हा पिऱ्या कसा येत नाहीं ?—गाढवाच्या लेकानें मला थाप दिली ! बरं आहे म्हणावं बेरडा, माझ्याशीं गांठ आहे. नाहीं आलास तर मी एकटाच जाऊन त्या नरसिंगाची खबर घेतों.—पण त्या मूर्खानें तें पत्र तरी त्याला नेऊन दिलें असेल किंवा नाहीं हें तरी मला कसें कळावें ?—' अशा रीतीनें तो विचार करीत असता हळूच दरवाजा उघडला आणि पिऱ्या आंत आला. त्याला पाहतांच मनोहर म्हणाला, " किती वेळ केलास पिऱ्या ?—मी समजलों कीं तूं मला चांगलेंच फसविलेंस ? "

" असं कसं होईल मास्तरसाहेब! आम्हीं एकदां शब्द दिल्यावर कोणाला आजपर्यंत फसविलं आहे काय? मी यापूर्वीच येणार होतों. पण नाईकाला दारू नेऊन दिल्यावर मी परत येण्याची त्याची परवानगी मागितली तेव्हां 'कशाला जायचें आहे?—कां जायचें आहे?--कोणी बोलावलें आहे?—तुझें आतां काय काम आहे?—' असें नाईकानें मला पुष्कळ प्रश्न विचारले. शेवटीं त्यानें मला परवानगी दिली. परंतु माझा त्याला संशय आला असें मला वाटतें. बरं आतां चला, उठा मास्तरसाहेब!—पण त्या बाटलींत कांहीं आहे का शिल्लक?" पिऱ्यानें हात पुढें करतांच मनोहर म्हणाला, "यांत आहे थोडीशी! तूं बाहेर चल मग देतों तुला दुकानांत."

" बर चला बक्षिसीचे रुपये घ्या बरोबर."

" अरे, अगोदर काम होऊं दे. बक्षिसी कुठें पळून जाते?"

" काम तर होणार. त्याची कशाला आतां काळजी! मी पत्र दिलें तें नेमकें त्याच्याच हातांत दिलें. तो आतां नेमक्या वेळीं तेथें खात्रीनें येणार.—हं—उठा—"

विमला दरवाजांत उभी राहून हा सर्व संवाद ऐकत होती. आतां पुढें काय होणार हें तिला कळून चुकलें. मनोहर उठतांच ती एकदम पुढें झाली आणि पुढल्या दरवाजांत जाऊन उभी राहिली. मनोहराला आतां बाहेर जाऊं द्यावयाचें नाहीं असा तिनें निश्चय केला. ती म्हणाली, "आतां तुम्ही कुठें जातां?—मी तुम्हांला आतां बाहेर जाऊं द्यावयाची नाहीं. तुम्ही मजकडून पत्र लिहवून नरसिंगरावांना खऱ्याचें खोटें भासवून कातळावर बोलाविलें आहे. तुम्ही आतां तिकडे जाऊन त्याच्यावर कांहींतरी संकट आणाल. पण हें करणें चागलें नाहीं. यांत पाप आहे. तुम्ही नरसिंगरावाविषयीं कां उगाच भलताच संशय घेतां? मी तुमच्या पायांची शपथ घेऊन सांगतें कीं, मी अद्यापि निर्मल आहें. नरसिंगराव मला बंधुसमान आहेत. तुम्ही आतां ह्या बेरडाला बरोबर घेऊन जें कांहीं कृत्य करणार आहांत तें अविचाराचें आहे. मी आपल्या पायां पडतें, पण आपण हा अविचार सोडून द्या."

" कां—झालं तुझं बोलून? कीं आणखी कांहीं बोलायचं आहे?" असें म्हणून त्यानें पुढें होऊन एकदम विमलेचा हात धरला आणि एक हिसका देऊन तिला दरवाजातून आंत ओढली. परंतु विमलेनें तसाच त्याचा उलट हात धरला आणि ती म्हणाली, "मी तुम्हांला आतां जाऊं द्यावयाची नाहीं.

तुम्ही खात्रीनें कांहींतरी वाईट कृत्य करण्याकरितां जात आहांत. तुम्हाला प्रभु येशु ख्रिस्ताची शपथ—" इतकें वाक्य तिच्या मुखांतून बाहेर पडतें न पडतें तोंच मनोहरानें खाडकन् तिच्या कानशिलांत भडकावली. " × × तुला नरसिंगराव पाहिजे काय ?—हा घे—देऊं का आणखी ?—" पूर्वीच सुजलेल्या विमलेच्या गालावर एकामागून एक असे तीन प्राणांतिक वेदना करणारे फटके बसले. बिचारी दीन गाय हताश होऊन तेथेंच पडली ! परंतु त्या चांडाळानें तिच्याकडे लक्षच दिलें नाहीं. मात्र पिऱ्याकडे वळून तो म्हणाला, " पण पिऱ्या, तूं बरोबर काय घेऊन आला आहेस ? आतां कातळावर जाऊन त्याला मारणार कसा तूं ?—हें पहा, तुला अगोदर सांगून ठेवतो, मग कटकट लावशील तें मी ऐकणार नाहीं. काम बिनचुक झालें तरच तुला रुपये देईन. मग काय, आतांच बोल ? होईल कीं नाहीं हें काम तुझ्याकडून ? नाहींतर मला एकट्यालाच जाऊं दे. "

" काय मास्तरसाहेब तुम्ही !—ह्या पिऱ्याकडून हें क्षुल्लक काम व्हाव-याचं नाहीं असं तुम्हांला वाटतं काय ? द्या तो कोपऱ्यांतला लठ्ठ माझ्या हातीं. एका फटक्यांत जर नाहीं काम केलं तर थू ह्या पिऱ्या भिल्लाच्या तोंडावर ! " असें म्हणून पिऱ्यानें कोंपऱ्यांत ठेवलेला मोठा सोटा हातांत घेतला, आणि तो बाहेर पडला. त्याच्या मागून मनोहरहि दरवाजापर्यंत आला. इतक्यांत त्याला काय वाटलें असेल तें असो. त्यानें एकदां मागें वळून पाहिलें. विमला तेथेंच जमिनीवर पडून रडत होती. मनोहराच्या मारा-मुळें तिच्या कपाळाला कांचेमुळें झालेल्या जखमेंतून पुनः रक्त वाहूं लागलें होतें. तिच्याकडे पहात मनोहर म्हणाला, " बस × × आतां रडत ! तुझ्या × × ला आतां मी स्वर्गाला पोंचवून येतों तुझा समाचार घेण्याकरीतां. पण आतां येथून जर हाललीस तर याद राखून ठेव—पण नको ! तुझा आतां भरवंसा धरून उपयोगी नाहीं. तूं पक्की × × आहेस ! तुझा पक्का बंदोबस्तच केला पाहिजे. " असें म्हणून त्यानें कपाटावर ठेवलेलें कुलूप घेतलें आणि बाहेर जाऊन दरवाजा बंद केला. विमला तेथें पडली होती. ती आतां अगदीं निःशक्त झाली होती. सकाळपासून तिच्या पोटांत अन्न नव्हतें आणि सर्व दिवस मनोहराच्या माराशिवाय तिला दुसरा खुराकच मिळाला नव्हता. मनोहरानें बाहेर जाऊन दरवाजा बंद केलां, परंतु तो आपणास आंत कोंडून ठेवील अशी तिला कल्पनाहि झाली नाहीं. ती जवळजवळ हताश होऊनच

पडली होती. परंतु बाहेरून जेव्हां कुलूप लावल्याचा तिला आवाज ऐकूं आला तेव्हां ती ताडकन् उठली. आणि दरवाजाजवळ जाऊन तिनें दरवाजाला जोरानें धक्का दिला.

आपण आंत कैदी होऊन पडलों, ही कल्पना मनांत येतांच विमलेची छाती धडाडली. तिला आतां खोलीच्या बाहेर जाण्यास दुसरा मार्गच नव्हता. कारण सर्व खिडक्यांना लोखंडाचे उभे बार लावलेले होते. विमला वेड्या-सारखी बाहेरून आंत आणि आंतून बाहेर अशी दोनदां फिरली. घटकेंत तीं एका खिडकीजवळ जाई, घटकेंत दुसऱ्या खिडकींत जाई, घटकेंत बार हाल-वून पाही. अशा रीतीनें बाहेर पडण्यास एखादा मार्ग आहे किंवा काय म्हणून ती इकडे तिकडे नजर फेकी. परंतु खोलीच्या बाहेर जाण्यास तिला मार्गच नव्हता. शेवटीं हताश होऊन ती दरवाजांतच बसली आणि रडूं लागली. तिच्या मनांत अनेक विचार येऊं लागले. मनोहर आपल्याबरोबर पिऱ्या भिल्लाला घेऊन गेला आहे आणि त्याच्याजवळ भली जाड काठी दिलेली आहे, तेव्हां पुढें काय अनर्थ ओढवणार याचें भेसूर चित्र तिच्या डोळ्यापुढें उभें राहिलें. आपणाविषयीं भलताच संशय घेऊन मनोहर पिऱ्याच्या सहाय्यानें आतां खात्रीनें नरसिंगरावाला मारणार अशी तिची पक्की खात्री होऊन चुकली. आणि हा भयंकर प्रसंग टाळण्याकरितां आप-णास कांहींच करतां येत नाहीं म्हणून ती अगदीं वेड्यासारखी झाली. पुनः ती उठली आणि खिडकीचे गज जोराजोरानें हालवूं लागली. दरवाजाजवळ जाऊन मोठमोठ्यानें धक्के देऊं लागली. खिडकीवर चढण्याचा प्रयत्न करूं लागली. परंतु कोणत्याच रीतीनें तिचा इलाज चालेना. तेव्हां ती मोठमोठ्यानें हुंदके देऊं लागली. हताश होऊन घटकेंत ती हाताच्या मुठी वळी, घटकेंत ती दांत ओठ खाई, तर घटकेंत आपलेच केस तडातड तोडी. पुनः हताश होऊन रडूं लागे. जसजसा वेळ जाऊं लागला तसतशी तिची स्थिति अधिकाधिक शोचनीय होऊं लागली. ‘ देवा, मी लिहिलेलें पत्र खोटें आहे असा नरसिंग-रावांना संशय येऊं दे–देवा, नरसिंगरावावर आलेलें हें संकट टाळ–देवा, मी तुला शरण आलें आहे—माझ्याकरितां नरसिंगरावावर कोणतेंहि संकट येऊं देऊं नको. ’ वगैरे नानाप्रकारें ती परमेश्वराला आळवूं लागली. इतक्यांत तिचें लक्ष घड्याळाकडे गेलें. त्यावेळीं पावणे नऊ वाजले होते. तिच्या छातींत धडधडाट सुरू झाला. तिच्या कोमल हृदयाचे शतशः तुकडे करून टाकणारे

अनेक विचार तिच्या मनांत येऊं लागले. ‘ आपलें पत्र खरें मानून नरसिंगराव मोठ्या उत्सुकतेनें कातळावर जावयास निघाले आहेत. ’ हा विचार तिच्या मनांत येतांच जणूं काय हा खरोखरीच घडत असलेला प्रकार आहे असें वाटून ती दीनवाण्या स्वरानें म्हणाली, “ फिरा—फिरा—मागें फिरा ! तुम्ही माझं पत्र खरं समजून कातळावर जाण्याकरितां निघालां आहांत पण हें सर्व कपट आहे. माझ्या पतीनें भलताच संशय घेऊन तें पत्र बळजबरीनें मजकडून लिहून घेतलें–नका हो नका जाऊं तुम्ही कातळावर ! त्यांच्याबरोबर एक भिल्ल आहे, तो तुम्हाला मारील—नका जाऊं ! अरे देवा, आतां काय करूं ? हे तर ऐकत नाहींत ! ” असें म्हणून हताशवाणीनें ती पुनः स्फुरून हुंदके देऊं लागली. इतक्यांत एक अकल्पित प्रकार घडला. ती बसली होती त्या समोरच्या खिडकीचें तावदान फुटलें. कांचा जमिनीवर पडून खळकन् आवाज होतांच विमलेनें चटकन् खिडकीकडे पाहिलें तों त्या फुटलेल्या तावदानांतून एक हात आंत आला. तें पाहतांच तिची भीतीनें गाळण उडाली. तिनें ओरडण्याचा प्रयत्न केला परंतु तिची जीभ आडवी पडली. भीतीमुळें तिच्या तोंडांतून शब्दोच्चार होईना. इकडे त्या आंत आलेल्या हातानें हळूच खिडकीची कडी काढिली आणि ती उघडली. तेव्हां गजाच्या बाहेर असलेली भयाण व्यक्ति दिव्याच्या प्रकाशांत तिला स्पष्ट दिसली. तेव्हां तर भीतीनें तिची अधिकच गाळण उडाली. तिच्या सर्वांगाला कंप सुटून घामाच्या धारा वाहूं लागल्या. तोंच त्या व्यक्तीनें सहज लीलेनें खिडकीचे चार गज भराभर वांकविले. आणि आंत येण्याकरितां त्या व्यक्तीनें आपलें डोकें आंत घुसविलें. तें पाहतांच विमलेनें दोन्ही हातांनीं आपले डोळे घट्ट मिटून घेतले आणि क्षणार्धांत ती बेशुद्ध होऊन मागें पडली !

“ अरेरे ! घाबरली पोर ! ” असें म्हणत ती व्यक्ति खोलींत आली. तेथें जवळच मेजावर पाण्याचा लोटा होता. तो घेऊन त्या व्यक्तीनें विमलेच्या तोंडावर थोडें पाणी शिंपडलें. त्यावेळीं तिच्या कपाळाला झालेली जखम आणि रक्ताचे पडलेलें डाग त्या व्यक्तीला दिसले. तेव्हां ती व्यक्ति म्हणाली, “ मी अंदाज केल्याप्रमाणेंच पिऱ्यानें येथें येऊन कांहींतरी गडबड केली आहे खास ! अरे मांगा, असें काम करण्याकरितां परत आलास काय ? ”

क्षणभरानें विमलेनें डोळे उघडले. तें पाहून ती व्यक्ति म्हणाली, “ मुली, तूं अगदीं भिऊं नकोस. माझ्याकडून तुला कांहींच अपाय होणार नाहीं. मी

मुद्दाम इकडे आलों आहें. तुझ्यावर कोणतें संकट आलें आहे तें मला सांग ? तुला कोणीं मारलें ? कां मारलें ?—सांग. मला तूं ओळखलंस काय ? मी कान्ह्या भिल्ल आहें. आमच्यापैकीं पिऱ्या नांवाचा एक बेरड इकडे आला होता, त्यानें तुला मारलं काय, सांग—अशी भिऊं नकोस ! आतां मी आलों आहें. आतां तुझ्या एका केसालाहि धक्का लावण्याचें कोणांत सामर्थ्य नाहीं.—बोल."

तो कान्ह्या भिल्लच होता. पिऱ्या दारू घेऊन गेल्यावर त्यानें आपल्या नाईकाजवळ—कान्ह्याभिल्लाजवळ पुनः गांवांत जाण्याची परवानगी मागूं लागला तेव्हां कान्ह्यानें संशय येऊन त्याला विचारलेले प्रश्न त्यानें मनोहराला सांगतांना वर दिलेच आहेत. त्या प्रश्नांचीं समाधानकारक उत्तरें त्यास देतां आलीं नाहींत. तेव्हां कान्ह्याभिल्लाला जास्तच संशय आला. परंतु त्यानें कांहींएक न बोलतां पिऱ्याला जाण्याची परवानगी दिली. आणि तो निघून गेल्यावर थोड्या वेळानें कान्ह्याभिल्ल त्याच्या मागोमाग पाळत ठेवून तो कुठें जातो, काय करतो हें पाहण्याकरितां निघाला. पिऱ्या पुढें आणि तो मागें अशा रीतीनें ते दोघेजण डेपोपर्यंत आले. कान्ह्या दूर एका बाजूला उभा होता. बराच वेळ पिऱ्या डेपोच्या कंपौंडांतून आला नाहीं. तेव्हां तो कुठें गेला हें पाहण्याकरितां कान्ह्या पुढें झाला. तो मनोहराच्या घराजवळ आला त्यापूर्वीच पिऱ्या आणि मनोहर निघून गेले होते. कान्ह्या भिल्लानें बराच वेळ इकडे तिकडे शोध केला परंतु पिऱ्या कुठें गेला हें त्याला समजलें नाहीं. तेव्हां तो विचार करूं लागला कदाचित् जास्त दारू पिण्याच्या हेतूनेंच पिऱ्या डेपोंत परत आला असावा असें वाटून त्याचा दुकानांत जाऊन शोध करावा अशा उद्देशानें तो मागें वळला तोंच बाजूच्या मनोहराच्या घरांतून त्याला हुंदके ऐकूं आले. त्याबरोबर तो तेथेंच थबकला आणि कान देऊन ऐकूं लागला. त्यावेळीं विमला आंत हताश स्थितींत रडत होती. तें रडणें ऐकून येथेंच कांहींतरी गडबड असावी, असा संशय येऊन कान्ह्या जास्त चौकस वृत्तीनें शोध करूं लागला. त्यानें पुढें होऊन पाहिलें तों खोलीला बाहेरून कुलूप असून आंत कोणीतरी स्त्री रडत आहे असें त्याला कळलें. त्यानें सर्व बाजूंनीं तें घर टेहळून पाहिलें. नंतर तो एका खिडकीवर चढला. त्या खिडक्यांना कांचेचीं तावदानें असल्यामुळें आंतील सर्व प्रकार त्याला दिसला. तेथें कोपऱ्यांत एक स्त्री रडत बसली आहे हें पाहून तो आंत कसा आला तें वर दिलेंच आहे.

कान्ह्या भिल्लाचें भाषण ऐकून विमलेनें त्याच्या काळ्या पण भयाण चेह-

त्याकडे पाहिलें. परंतु त्याची चर्या अगदीं शांत आणि गंभीर दिसत होती. तेव्हां तिला धैर्य आलें. ती हळूच म्हणाली, " तुझें नांव मला ऐकून माहित आहे. तूं दरोडेखोर आहेस पण मी तुला शरण आलें आहें. मी आतां मोठ्या संकटांत आहें. "

" मुली, तुझ्यावर कोणतें संकट आलें आहे तें मला सांग. भिऊं नकोस. मी दरोडेखोर असलों तरी गरिबांचा आणि संकटांत पडलेल्या दीनांचा मित्र आहें. तूं माझी धर्मकन्या आहेस. बोल—तुझ्या कपाळावर ही कोणी जखम केली ? माझ्या पिऱ्यानें तुला मारलें काय ? "

" पिऱ्या आला आहे. पण त्यानें मला मारलें नाहीं. तो एका निरपराधी मनुष्याला मारण्याकरितां मोठी काठी घेऊन माझ्या नवऱ्याबरोबर गेला आहे. ! "

" कुठें गेला आहे तें सांग म्हणजे मी जातों तिकडे—पण त्या मनुष्यानें तुझ्या नवऱ्याचं असं काय घोडं मारलं आहे ? "

कांहीं नाहीं. उगाच संशय घेऊन ते गेले आहेत, पण तुम्हाला तें घर कसं सांपडेल—आतां नऊ वाजतील—आतां काय करूं ? ते घरून निघाले देखील असतील ! देवा ! देवा ! आतां कसं होईल !—"

" तूंहि चल मजबरोबर. आपण दोघेंहि झटकन जाऊं. "

विमला ताडकन् उठली. कान्ह्यानें तिला खिडकींतून बाहेर उतरविलें. जमिनीवर पाय ठेवतांच कैदेंतून पळून जाणाऱ्या कैद्याप्रमाणें ती पळतच सुटली. कान्ह्या तिच्या मागून निघाला. विमला मोठ्या सडकेवरून न जातां मागच्या गल्लीनें बाहेर पडली. आणि तेथून ती सरळ बापुसाहेबांच्या घराजवळ आली. त्यावेळीं रस्त्यांत बिलकूल रहदारी नव्हती. सर्वत्र सामसूम होतें. शिवाय ती काळोखी रात्र असल्यामुळें रस्ता अगदीं भयाण दिसत होता. त्यांतून त्या दिवशीं वाराहि फार जोरानें वहात होता. विमला बापुसाहेबांच्या घराजवळ येतांच थांबली आणि मागें वळून पाहूं लागली. कान्ह्या तिच्या मागेंच होता. त्याला उद्देशून ती म्हणाली, " तें पलिकडे दिसतें तें घर. तुम्ही थोडा वेळ येथें उभे रहा. मी तेथें जाऊन चौकशी करतें. आणि ते जर गेले असले तर मग आपण असेच कातळावर जाऊं ! "

कान्ह्यानें ' बरं आहे, ' म्हणतांच विमला पुढें निघाली. ती घराजवळ आली त्या वेळीं दरवाजावर कोणी नव्हतें ती दरवाजांतून आंत जातांच जिन्याजवळच्या आपल्या खोलींत नरसिंगराव कपडे करीत असलेला तिला

खिडकींतून दिसला. त्याबरोबर तिला कितीतरी आनंद झाला. ती तडक पुढें झाली आणि दरवाजांतून एकदम आंत शिरली. तिला पाहतांच नरसिंगरावाला आश्चर्य वाटलें. तो एकदम म्हणाला, " कोण विमला !—तूंच आलीस !— हा मी आतां निघालोंच होतों. "

" पण गेलां नाहींत हें मोठं सुदैवच म्हणायचं ! " इतकें बोलून ती थांबली, ' मनोहरानें तें पत्र आपणाकडून जबरदस्तीनें लिहवून घेतलें असें आपण सांगितल्यास नरसिंगराव ' असें बळजबरीनें पत्र लिहून कां घेतलें ! ' म्हणून प्रश्न विचारणार आणि आपणास त्याचें उत्तर द्यावें लागणार. अर्थात् सर्व गोष्टी त्यांना सांगाव्या लागणार आणि त्यामुळें आपल्या पतीचें वर्तन आपणाबरोबर कोणत्या प्रकाराचें आहे हें कळल्यावर त्यांना अत्यंत वाईट वाटणार. ' इत्यादि विचार तिच्या मनांत येऊन ती गप्प राहिली. नरसिंगराव तिच्यातडे पहात होता. इतक्यांत त्याचें लक्ष तिच्या कपाळाकडे गेलें, त्याबरोबर त्यानें एकदम विचारलें, " आणि विमला, हें काय ? तुझ्या कपाळावर हें रक्त—ही मोठी जखम कसली ?—पाहूं पाहूं—"

" कांहीं नाहीं. आतां मघां मी—मी घरीं पडलें. तेव्हां तें—तें— खुर्चीचा कोंपरा लागला. पण—पण मी आतां मुद्दाम येथें आलें आहे. आतां तुम्हाला कातळावर जाण्याची आवश्यकता नाहीं. मी आतां जातें. पण तुमच्याजवळ माझी एक विनंति आहे. ह्यापुढें केव्हांहि तुम्हाला कांहीं कळवायाचें असल्यास मी त्या जिवापोराबरोबर पत्र देईन त्या पोराशिवाय दुसरा जर कोणी माझ्या नांवाचें पत्र घेऊन आला किंवा आपणास कांहीं निरोप कळविला तर तो खोटा आहे असें आपण समजावें. "

" पण असें का ? आजच्या पत्राबद्दल तशी कांहीं भानगड झाली आहे काय ? कारण आज सायंकाळीं मला मिळालेलें पत्र एका शेतकऱ्यानें आणून दिलें होतें—"

" तो शेतकरी नव्हता पण भिल्ल —" पुनः विमलेनें आपली जीभ चावली !

" कोण ? भिल्ल होता ? " इतकें बोलून नरसिंगराव तिच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागला. " मग कांहींतरी गडबड असली पाहिजे. विमला, खरं सांग ? — आज तूं माझ्यापासून कांहींतरी लपवून ठेवीत आहेस ! सांग—ही तुझ्या कपाळाला झालेली जखम तूं पडल्यामुळें झालेली दिसत नाहीं. आणि ती अशी उघडी टाकून तूं इतक्या रात्री मजकडे आलीस, व तुझी चर्या अगदीं उतरलेली दिसते,

यांत कांहींतरी गूढ आहे खास ! सांग—विमला, आतां मी तुझा भाऊ आणि तूं माझी बहिण ना ? मग मजपासून तूं आपलें दुःख कां बरें लपवून ठेवतेस ? माझें तुझ्यावर किती उच्च प्रेम आहे हें तूं जाणत नाहींस का ? " म्हणून त्यानें शुद्ध बंधुप्रेमानें तिच्या खांद्यावर हात ठेविला आणि पुनः विचारलें, " सांग, विमला, तूं आज खास दुःखी आहेस. "

नरसिंगरावाचा तिच्या अंगाला स्पर्श होतांच आणि त्याचे सहानुभूतीपर निर्मल बंधुप्रेमाचे शब्द ऐकतांच तिला एक जबरदस्त हुंदका आला. तिनें आपलें दुःख दाबण्याचा शक्य तितका प्रयत्न केला, परंतु त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. एक हुंदका बाहेर येतांच, ज्याप्रमाणें पाण्याला एकदां वाट मिळाली म्हणजे तात्काळ ओहोळ सुरू होतो, त्याप्रमाणें तिला हुंदक्यावर हुंदके येऊं लागले. तें पाहून नरसिंगरावानें तिला आपणाजवळ ओढलें आणि तिचे डोळे पुसून शांतवन करण्याचा प्रयत्न केला. बराच वेळ अश्रु गाळल्यावर तिला हलकें वाटूं लागलें. तेव्हां ती म्हणाली, " तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें थोडासा प्रकार आहे. पण त्याबद्दल मला आतां दुःख वाटत नाहीं. त्या पत्राप्रमाणें तुम्ही कातळावर जाण्यापूर्वी मी येथें येऊन तुम्हाला भेटलें. आतां मला कितीहि दुःख भोगावें लागलें तरी त्याची मी क्षिती बाळगणार नाहीं. कारण तुम्हाला थोडेसेंहि झालेलें दुःख मला सहन होणार नाहीं. "

अहाहा ! विमले, तुझा हा नरसिंगरावावर किती अलौकिक भाव आहे ? तुला इतकें दुःख भोगावें लागलें, सकाळपासून तुझा इतका अमानुष रीतीनें छळ झाला तरी त्याबद्दल तूं विचार न करता फक्त नरसिंगरावाबद्दल तुझ्या मनांत विचार यावे यावरून नरसिंगरावावर असलेली तुझी अढळ निष्ठा दिसून येते. अहारे ! राक्षसी मनोहरा, तुझ्यासारख्या अधम वृत्तीच्या मनुष्याला विमले-सारख्या अद्वितीय रत्नाची काय पारख !

" पण आतां जाऊं द्या. मी फार वेळ येथें राहिल्यापासून तुम्हाला दुःख होईल. मी जातें--"

" पण थांब—मला थोडी तरी हकीकत कळूं दे !—हा काय प्रकार आहे !—सांग तूं आतां मला कांहींच न सांगतां निघून गेलीस तर माझी अहो-रात्र विचारांत जाईल. "

" आतां आपण मला अडवूं नका. मी पुनः लवकरच तुम्हाला भेटण्याचा योग जुळवून आणीन आणि मग—"

" मग तूं आतां जाणारच ! पण थांब, हा माझा थंडीचा लांब कोट सर्व हा अंगावर घे. आणि ती कपाळाची जखम उघडी आहे ती हें उपरणें गुंडाळून झांक." असें म्हणून नरसिंगरावानें कोट आणि उपरणें पुढें केलें आणि तो पुढें म्हणाला, " हं चल—मीहि येतों तुला घरापर्यंत पोंचविण्याकरितां—"

" छे—छे—नको नको ! " एकदम दोन्ही हात पुढें करून विमला म्हणाली, " तुम्ही तर आतां निदान आज रात्रीं तरी घराबाहेर पाऊलसुद्धां टाकतां कामा नये. मग मी इतक्या तातडीनें येथें कशाला आलें असतें. "

" हें काय बुवा गूढ आहे तें कांहींच कळत नाहीं. " किंचित् त्रासिक स्वरानें नरसिंगराव म्हणाला. " बरं मग मी नाहीं येत पण हा कोट मात्र तूं अंगावर घेतला पाहिजे. बाहेर कोण भयंकर थंडी पडली आहे. हं—घे—"

आतां आपण नाहीं म्हटलें तर नरसिंगरावाला वाईट वाटेल म्हणूनच तिनें तो कोट आपल्या इच्छेविरुद्ध आपल्या अंगासभोंवतीं घेतला. तेव्हां उपरणें पुढें करून नरसिंगराव म्हणाला, " हं—आतां त्या जखमेवरून हें गुंडाळून घे. "

" इश्श !—"

" विमला, हें चांगलें किंवा वाईट दिसण्याकरितां नव्हे तर बाहेर पडलेली कडाक्याची थंडी आणि त्यांतून ही तुझ्या कपाळावरील बोटभर लांब उघडी जखम ! तींत वारा शिरला तर उद्यां भलताच प्रसंग यायचा ! " नाइलाजास्तव नरसिंगरावाचें म्हणणें विमलेला मान्य करावें लागलें. तिनें उपरणें आपल्या कपाळाभोंवतीं गुंडाळलें. तेव्हां नरसिंगराव म्हणाला, " विमला, तूं हें जें केलें आहेस त्यांत तुला सुख नाहीं. तूं दुःखी आहेस.

" नाहीं. मी आहें त्या स्थितींत सुखीच आहें. माझ्यासारख्या जन्मदरिद्री अभागिनीनें ह्यापेक्षां जास्त सुखाची इच्छा करणें मूर्खपणाचें आहे. "

" तूं कितीहि मनाचें समाधान करून घेण्याचे प्रयत्न केलेस तरी—"

" पण आतां त्या गोष्टीची वाटाघाट कशाला ?—मी आतां जातें. तुम्ही स्वस्थ झोंपा. "

" मग आतां तुझी भेट केव्हां होईल ? तुझी सर्व हकीकत मला कळल्याशिवाय माझ्या मनाची तळमळ शांत होणार नाहीं. "

" तुम्ही माझा आतां विचार करूं नका. बरं मी आतां जातें. "

" पण भेट केव्हां होईल तें नाहीं सांगितलेंस ? "

" लवकरच मी तुम्हाला कळवीन. " असें म्हणून विमला बाहेर पडली.

तिचें मन आतां बरेंच शांत झालें होतें. नरसिंगरावावरील संकट आपणास टाळतां आलें म्हणून तिला किती तरी आनंद झाला. आतां घरीं गेल्यावर मनोहरानें वाटेल तितका छळ केला तरी तो सहन करण्यास तिचें मन तयार झालें. ती झपझप पावलें टाकीत निघाली. कान्ह्या भिल्ल आपली वाट पहात वाटेंत उभा आहे हें देखील ती विसरली. ती थोडी पुढें गेल्यावर आपणा-मागून कोणी तरी येत आहे असा तिला भास झाला. परंतु त्याकडे तिनें लक्ष दिलें नाहीं. थंडी मनस्वी पडल्यामुळें नरसिंगरावानें दिलेला लांब कोट तिनें अंगाभोवतीं अगदीं घट्ट गुरफटून घेतला होता. अशा रीतीनें ती आप-ल्याच आनंदांत झरझर चालली असतां तिच्या मागून झपाझप पावलें टाकीत दोन व्यक्ति जाऊं लागल्या. बिचाऱ्या विमलेला त्या दोन व्यक्ति कोण आहेत याची कल्पना देखील नव्हती. पुढें ते या भयाण रस्त्याच्या अगदीं एका बाजूला येतांच ' हरामखोरा, नरसिंगा थांब—कातळावर विमलेला भेटायला चाललास का ? तुला त्या × × ला इकडेच भेटवतों ' अशीं रागाचीं वाक्यें विमलेला ऐकू आलीं. तिनें तो मनोहराचा आवाज तात्काळ ओळखला आणि ती मागें वळून उभी राहिली. आतां आपला पति जवळ येतांच ती बोलणार तोंच खाडकन् तिच्या कपाळावर काठीचा जबरदस्त टोला बसला !



## ३१ कोडें उकललें

विमला धाडकन् जमिनीवर पडली. तोंच तिच्या पाठीवर दुसरा टोला बसला ! ती खालीं पडतांच तिच्या हातांतील बांगड्या खळदिशीं वाजल्या. त्याबरोबर मनोहर म्हणाला, " हें काय ? हा नरसिंग नाहीं वाटतं ? " चटकन् त्यानें आपल्या खिशांतील काड्यांची पेटी काढिली आणि एक काडी ओढली. अरे ही विमला ! आणि ही कशी येथें आली ? " इतक्यांत मागून कान्ह्या भिल्लानें ' पिऱ्या ! ' अशी मोठ्यानें हांक मारिली. नाईकाचा आवाज ऐकतांच पिऱ्याची गाळण उडाली. त्याच्या हातांतील काठी गळून खालीं पडली !

कान्ह्या त्यांच्या मागेंच होता. विमलेला सोडल्यानंतर तो रस्त्याच्या बाजूला थोडा वेळ उभा होता. आणि त्याच्याच पलीकडे मनोहर आणि पिऱ्या हे दोघे होते. थोड्या वेळानें त्यांच्या हालचालीवरून तिकडे कोणी तरी आहे

असा संशय घेऊन कान्ह्या आपल्या लपलेल्या जागेवरून दूर गेला. इकडे ते दोघे नरसिंगराव घरांतून बाहेर पडण्याचीच वाट पहात होते. जातांना विमला त्यांच्या बाजूनें गेली परंतु काळोख असल्यामुळें मनोहरानें तिला ओळखलें नाहीं. शिवाय घराला कुलूप लावून तिला आंत ठेवलें आहे तेव्हां ती बाहेर येईल अशी त्याला कल्पनाहि नसल्यामुळें ती जातांना कोणीतरी रस्त्यानें जाणारी ती स्त्री आहे असेंच त्या दोघांना वाटलें. पुढें विमला नरसिंगरावाची भेट घेऊन बापुसाहेबांच्या घरांतून बाहेर पडली तेव्हां त्यांनीं तिला पाहिलें. परंतु त्या वेळीं विमलेच्या पोषाखांत रूपांतर झालें होतें. अंगाभोंवतीं कोट आणि डोक्याला उपरणें गुंडाळलेलें असल्यामुळें ती पुरुषवेषांत होती. अर्थात् नरसिंगरावच पत्रांत लिहिल्याप्रमाणें कातळावर जाण्याकरीतां निघाला आहे असें त्यांना वाटलें आणि ते दोघे तिच्या मागून तयारीनें निघाले. त्यांच्या पुढेंच कान्ह्या भिल्ल एका बाजूला उभा राहून विमलेची परत येण्याची वाट पहात होता. हे तिघेहि त्याच्यापुढून गेले परंतु त्यानें कोणालाच ओळखलें नाहीं. पुढें पिऱ्यानें विमलेच्या कपळावर काठीचा फटका हाणून ती पडल्यानंतर मनोहरानें जेव्हां काडी ओडली तेव्हा त्या उजेडांत मागें असलेल्या कान्ह्या भिल्लानें पिऱ्याला ओळखलें आणि मोठ्यानें हांक मारिली.

"बदमाष, हें काम करण्यासाठीं तूं परत आला होतास काय?" कान्ह्या दांत खाऊन म्हणाला, "ही कोण आहे?—तिकडे कोंडून ठेविली होती तीच ना ही मुलगी?—बोल—हरामखोर—" असें म्हणून कान्ह्यानें पिऱ्याच्या हातांतील काठी हिसकावून घेतली आणि मनोहराच्या पाठीवर एक जोरानें सपाटा हाणून म्हटलें, "हा कोण? हिचा नवरा वाटतं! सुव्वर, बायकोला मारतो काय? भागुबाई—हरामजादा, आतां तुला जन्माची आठवण राहील असें करतों," असें म्हणून कान्ह्यानें चटकन् मनोहराचें नाक धरलें आणि झटक्यांत आपल्या नखानें तें तोडलें! मनोहरानें ओरडण्याचा प्रयत्न केला, परंतु नाक तोडून कान्ह्यानें त्याचें तोंड अशा तऱ्हेनें धरून ठेवलें कीं, त्याला तोंडच उघडतां आलें नाहीं. नाक तोडण्याची कान्ह्याची प्रतिज्ञाच होती; त्याबद्दल मागें उल्लेख केलेला आहे. ह्या कामासाठीं त्यानें आपल्या आंगठ्याचें नख लांब अणकुचिदार वाढविलें होतें. आणि तो नेहमींच्या सरावानें नाक इतक्या सफाईदार रीतीनें त्या नखानें कापीत असे.

" पिऱ्या, ह्या कामाबद्दल तुला काय दिलं—बोल ? "

" नाईकसाहेब चुकलों—मला वाटेल ती शिक्षा करा पण—"

" ठीक आहे, मुक्कामावर गेल्यावर त्याचा विचार !—चल उचल या पोरीला—ए बदमाष. चल—मुकट्यानें चल. वाटेंत ओरडशील—आरडशील तर मुडदाच पाडीन, लक्षांत ठेव. "

न्यायान्यायाचा निवाडा करण्याकरितां तो न्यायी प्रभू कोणाला तरी पुढें करीत असतो. मनोहराला त्याच्या सर्व अपराधांची शिक्षा लावण्याकरितां कान्ह्याला त्यानें पुढें केलें. त्यानें नाक तोडतांच त्याचें सर्व तोंड रक्तबंबाळ झालें. ओरडण्याची त्याला छाती होईना. प्रत्यक्ष कान्ह्या भिल्ल आपणाजवळ उभा आहे या भीतीमुळें त्याला नाक कापल्याच्या दुःखाची जाणीव देखील झाली नाहीं. इतका कन्ह्या भिल्लाचा दरारा वाटत असे. त्याच्या हुकुमाप्रमाणें पिऱ्यानें विमलेला उचललें, आणि ती मंडळी मुकाट्यानें निघाली. सर्वत्र अगदीं शांत होतें. वाटेंत त्यांना कोणीहि भेटलें नाहीं. घरीं येतांच विमलेला बिछान्यावर निजविलें. पिऱ्यानें काठीचा मारलेला फटका तिच्या पूर्वीच्या जखमेवरच नेमका बसून ती जखम मोठी झाली. बहुतेक तिचें कपाळ फुटलें. रक्तानें तिचें तोंड अगदीं विद्रुप दिसूं लागलें. तिला भयंकर मूर्च्छा आली होती. मनोहर स्वतःच्या दुःखांत हाय हाय करीत एका बाजूला चोरासारखा उभा होता. नाकांतून वाहणाऱ्या रक्तानें त्याचा हातरुमाल ओलाचिंब झाला होता. कान्ह्यानें विमलेच्या तोंडावर रक्ताचे आलेले ओहोळ ओल्या फडक्यानें पुसून घेतले आणि जखमेची तपासणी केली. जखम फार मोठी आहे असें पाहून तो क्षणभर स्तब्ध उभा राहिला. नंतर म्हणाला, " पिऱ्या, चांडाळा, पहा—पहा हें तूं काय केलें आहेस ! ही पोर आतां खात्रीनें मरणार, जा—आतां पळत जाऊन आपलें जखमेचें औषध घेऊन ये.—पळ. वाऱ्यासारखा पळत जा—"

नाईकाच्या हुकूमाप्रमाणें एखाद्या शिकारी कुत्र्याप्रमाणें पिऱ्या निघाला. कान्ह्या विमलेच्या उशाजवळ बसून तिला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करीत होता. तो बाजूला उभा असलेल्या मनोहराबरोबर एक शब्दहि बोलला नाहीं किंवा त्याच्याकडे त्यानें पाहिलेंहि नाहीं. आणि मनोहरालाहि जागेवरून हालण्याची छाती होईना. कान्ह्यानें पुष्कळ प्रयत्न केला परंतु विमला शुद्धीवर येईना. मध्यरात्रीच्या सुमारास पिऱ्या औषध घेऊन परत आला. तें

झाडपाल्याचें बनविलेलें जखमेवरील रामबाण औषध होतें. कन्ह्यानें तें औषध विमलेच्या सर्व कपाळाला लाविलें आणि त्यावर पट्टा बांधला. अद्यापि तिला शुद्धीवर आणण्याचा त्याचा प्रयत्न चालूच होता. शेवटीं मध्यरात्र उलटून गेल्यावर विमला हालचाल करूं लागली. यावेळीं कान्ह्यानें आपले रानटी पण रामबाण उपचार केले म्हणूनच ती इतक्या लवकर शुद्धीवर आली, नाहींतर त्याच स्थितींत तिचा अंत व्हावयाचा होता. विमलेनें हळुच डोळे उघडले आणि आजुबाजूला पाहून अत्यंत क्षीणस्वरानें विचारलें, " नरसिंगरावांना मारलं काय ? —ते सुरक्षित आहेत ना ? अग आई—ई—देवा, आतां मी मरतें—मनोहरराव हें काय ?—तुमच्या नाकांतून रक्त—! "

" तुला मारल्याबद्दल त्याला मी जन्माची आठवण करून ठेविली आहे. पक्का हरामखोर आहे. त्याचें नाक तोडलें आहे. सुव्वर बदमाष, बायकोला मारतो काय ? " असें म्हणून त्या रागाच्या भरांत कान्ह्या पुनः मनोहरावर घसरला, तेव्हां विमला म्हणाली, " नका—नका. त्यांना मारूं नका. त्यांनीं माझा छळ केला पण मी त्यांना क्षमा करतें—अरे देवा ! आतां मी जगत नाहीं. आई—ई—काय करूं ?—मनोहरराव, तुम्ही माझा व्यर्थ संशय घेतला—मी निर्मल आहें—माझी आतां एक इच्छा आहे. मी आतां मरतें. पण—पण—मनोहरराव—मी आतां मरणार—अग आई—काय करूं ?—माझं डोकं फुटलं—मी :मरतें—देवा—! "

" बोल—तुझी काय इच्छा आहे ?—बोल, तुझी वाटेल ती इच्छा आतां पूर्ण करतों. " कान्ह्या म्हणाला.

" नरसिंगराव—माझा भाऊ—एकदां मला भेटवा—शेवटचं एकदां त्यांना पाहूं द्या—" असें म्हणून दुःखानें आणि भयंकर वेदनानीं विव्हळणाऱ्या विमलेनें आपले डोळे मिटले. क्षणभर ती निचेष्टित पडली. वरील दोन वाक्यें उच्चारण्याचे तिला किती तरी श्रम झाले.

" ए हरामखोर, हा नरसिंगराव कोण ? " कान्ह्यानें मनोहराला विचारलें, " सांग—हा कोण ?—तूं ज्याला मारायला गेला होतास तोच का हा नरसिंगराव ? "

मनोहरानें भीत भीत फक्त मान हालविली. तेव्हां कान्ह्या पुढें म्हणाला, " पिऱ्या, तूं येथें हिच्याजवळ बैस. आणि ही शुद्धीवर आली तर म्हणावं कीं, मी नरसिंगरावाला आणण्याकरितां गेलों आहे. तिला धीर दे आणि ह्या

बदमाष मनुष्याला हिच्याजवळ बिलकूल येऊं देऊं नको." असें म्हणून पिऱ्याला विमलेजवळ पहाऱ्याला बसवून कान्ह्या भिल्ल बाहेर पडला. तो थेट बापुसाहेबांच्या घरीं आला. त्यावेळीं दोन वाजून गेले होते. रस्त्यांत मधून मधून कुत्र्यांचा भुंकण्याचा आवाज ऐकूं येत होता. बाकी सर्वत्र अगदीं निःशब्द होतें. कान्ह्या दरवाजाजवळ येतांच त्यानें देवडीचा दरवाजा इतक्या मोठ्यानें वाजविला कीं त्या आवाजानें घरांतील एकूण एक माणसें जागीं झालीं. बापुसाहेबांची प्रकृति गेल्या दोन दिवसांपासून थोडी बरी होती आणि त्याचें कारण दुसरें तिसरें कांहीं नसून दोन दिवसांपासून नरसिंगरावाच्या वर्तनांत फरक पडला होता हेंच होय. देवडीचा दरवाजा वाजतांच ते आपल्या शय्येवरून उठले आणि खिडकीजवळ येऊन विचारूं लागले, " कोण आहेरे ?—काय गडबड आहे ? गोविंदा, कोणरे दरवाजा खडखडवितोय् ?

" मी आहें—मी कान्ह्या भिल्ल. दरवाजा उघडा पहिल्यानें ! "

" अरे बापरे !—कान्ह्या भिल्ल ! " इतकेच भीतियुक्त उद्गार बापुसाहेबांच्या तोंडून एकदम बाहेर पडले आणि ते तेथेंच मटकन् खालीं बसले. त्यांचे हातपाय लटपटूं लागले. छातींत धडकी भरली. कान्ह्या भिल्लाची संक्रांत आज आपल्या घरावर आली आहे; आतां आपली धडगत नाहीं, हा विचार मनांत येतांच त्यांचा घसा कोरडा पडूं लागला. इतक्यांत कान्ह्या दरवाजा उघडण्याची वाट न पाहतां दरवाजावरून चढून आंत आला आणि जिना चढून तडक वर आला. दिवाणखान्याचा दरवाजा उघडा असल्यामुळें त्याला आंत येण्यास कसलाच प्रतिबंध झाला नाहीं. तो तडक आंत येऊन बापुसाहेबांच्या पुढें उभा राहिला.

" मी सर्व कांहीं खुषीनें देतों. सर्व किल्ल्या तुझ्या स्वाधीन करतों पण—पण आम्हाला मारूं नको. " थरथर कांपत हात जोडून बापुसाहेब म्हणाले.

" उठ म्हाताऱ्या, मी तुझ्या घरावर दरोडा घालण्याकरितां आलों नाहीं. ऊठ —भिऊं नकोस. तुझं नांव काय ?—नरसिंगराव कुणाचं नांव ! "

" नको—नको—माझ्या नरसिंगाला नको मारूं—मी—मी—"

" अरे बाबा ! मी कुणाला मारण्याकरितां आलों नाहीं. तूं ऊठ आणि नरसिंगराव कुठें आहे त्याला बोलावून आण—ऊठ—"

इतक्यांत नरसिंगराव आला व त्याच्या मागून कमला दिवाणखान्यांत शिरली.

" माझं नांव नरसिंगराव. तुला काय पाहिजे ? कशासाठीं तूं माझी

इतक्या रात्रीं चौकशी करण्याकरतां आलास ? ”

“ तूं विमलेला ओळखतोस ना ?—चल, तुला भेटण्याची तिची इच्छा आहे. तिचीं घटकापळं भरलीं आहेत—चल, लवकर येशील तर तुझी भेट होईल आणि तुला भेटण्याची तिची शेवटची इच्छाहि पूर्ण होईल. ”

विमलेची घटकापळें भरत आलीं आहेत. हें ऐकून ती सर्व मंडळी एकदम स्तब्ध झाली. नरसिंगराव कांहीं प्रश्न विचारणार तोंच बापुसाहेबांनीं ‘ विमला—विमला ? ’ म्हणून मोठ्यानें हंबरडा फोडला ! नरसिंगराव, कमला आणि दिवाणखान्यांत गोळा झालेले नोकर आश्चर्यानें बापुसाहेबांकडे पाहूं लागले.

“ ए नरसिंगराव, तूं येतोस कीं नाहीं बोल ? ” कान्ह्यानें जरा दरडावूनच विचारलें.

एकटा नरसिंगरावच जाण्याकरितां तयार झाला नाहीं. त्याच्या बरोबर बापुसाहेब, कमला आणि एकदोन नोकरहि तयार झाले. आपण अशक्त आहोंत, आपणास अशा थंडींतून इतक्या लांब कसें जातां येईल ही शंकाही बापुसाहेबांच्या मनाला त्यावेळीं शिवली नाहीं. ते इतर मंडळीबरोबर झपझप चालत होते. वाटेंत नरसिंगरावानें विचारल्यावरून कान्ह्या भिल्लानें त्याला माहित असलेला सर्व वृत्तांत त्यांना सांगितला. केवळ आपणाकरितां विमलेची ही अशी भयंकर स्थिति झाली, हें कळतांच नरसिंगरावाला भडभडून आलें. आज नरसिंगरावाचा मृत्यू होता पण तो टळून विमला त्याला बळी पडली म्हणून कमलेला समाधान झालें तरी अलीकडे तिच्या पालटलेल्या वृत्तीमुळें तिच्या डोळ्यांत अश्रु आले. बापुसाहेब ही सर्व हकीकत एखाद्या जडमूढा-प्रमाणें ऐकत होते. ती सर्व मंडळी मनोहराच्या घरीं आली त्याचवेळीं विमलेनें आपले डोळे उघडले होते. तिला पहातांच बापुसाहेब एखाद्या वेड्यासारखे एकदम आंत घुसले आणि विमलेच्या हनुवटीला हात लावून अगदीं दीन हताश स्वरानें म्हणाले, “ पोरी, हें तूं काय करून घेतलेंस !—विमले—माझ्या विमले—माझ्या लाडके विमले—” आपलें डोकें तिच्या छातीवर ठेवून बापुसाहेब एखाद्या लहान मुलाप्रमाणें हुंदके देऊं लागले. ह्या त्यांच्या चमत्कारिक कृतीचा नरसिंगरावाला किंवा कमलेला कांहींच बोध होईना. तीं दोघेंहि त्यांच्याकडे वेड्यासारखीं पाहूं लागलीं.

" बापुसाहेब, तुम्हीं देखील आलांत—बरें झालें!—ह्या कोण?—कमलाबाई! वा:—बसा सर्वजण बसा. मग आतां संतोबा बाबांनाहि कोणी बोलवा." अगदीं आर्तस्वरानें विमला बोलत होती. " नरसिंगराव, बसा—मी आतां मरत आहें—बापुसाहेब, आतां तरी सांगा—मी कोण? माझे आईबाप कोण?—मरतांना तरी मला कळूं द्या—आई—ई—देवा!"

" विमले, हे माझ्या दुर्दैवी पोरी! तुला मी आतां कोणत्या तोंडानें सांगूं?—पोरी, मीच—मीच—तुझा बाप!"

" काय?—तुम्हीं—बापुसाहेब, तुम्हीच माझे वडील?"

" होय. मीच चांडाळ, तुझ्या सर्व दु:खांना कारणीभूत असलेला मीच तुझा चांडाळ बाप! विमले, मला तूं क्षमा कर—"

" उठा—बापुसाहेब—बाबा, उठा!"

दुर्दैवी विमलेच्या आयुष्यांतील अर्धें कोडें उकललें!



## ३२ ग्रहदशेचा अंत

आतां बाकी राहिलेलें अर्धें कोडें—विमलेच्या आईसंबंधानें जी माहिती विमलेनें बापुसाहेबांना विचारली आणि त्यांनीं सांगितली तीच आम्ही येथें वाचकांकरितां देत आहोंत. पहिल्या दोन आणि तीन या प्रकरणांत संतोबा-बरोबर विमलेविषयीं बोलत असतांना बापुसाहेबांनीं काढलेले उद्गार आणि एकांतांत असतांना वेळोवेळीं त्यांची होत असलेली मन:स्थिती वाचकांच्या लक्षांत असेलच. बापुसाहेबांनीं आपल्या वडिलांच्या अत्यंत आग्रहास्तव लग्न केलें आणि त्या पत्नीपासून त्यांना कमला ही मुलगी झाली. परंतु त्यापूर्वीचें त्यांचें वर्तन बहकलेलें होतें. त्यांचा मित्र भालेराव म्हणजे नरसिंगरावाचा बाप, ज्यानें शर्यतीच्या नादानें आपला सर्वस्वी नाश करून घेतला, त्याच्या नादानें बापुसाहेबांनीं आपल्या तारुण्यांत बराच बाहेरख्यालीपणा केला. पुढें नगराजवळच असलेल्या पारनेर गांवांत भालेरावांच्या शेतासंबंधानें कांहीं भानगड उपस्थित झाली. तेव्हां हे दोघे मित्र तिकडे गेले. त्यावेळीं त्यांना तेथें प्रथम चार दिवस रहावें लागलें. तेव्हां त्यांनीं तो चार दिवसांचा मुक्काम एका म्हातार्‍या बाईकडे केला होता. ह्या म्हातारीला चंचला नांवाची तेरा

चौदा वर्षांची एक नात होती. चंचलेचे आईबाप ती लहान असतांच मरण पावले होते. ह्या म्हातारीला आपल्या नातीशिवाय मायेचें किंवा इतर कोणी जवळचें आप्तसंबंधी नव्हतें. बिचारी म्हातारी आपल्या एका शेतावर आपल्या नातीसह कसाबसा निर्वाह करीत होती. नाहीं म्हणायला भालेरावाचा आणि त्या म्हातारीचा फार दूरचा कांहीं संबंध होता. आणि त्याच संबंधावर ते दोघे मित्र त्या म्हातारीकडे उतरले होते.

चंचल ही नांवाप्रमाणेंच चंचल होती. मुळांत तिचा वर्ण गोरा होता. त्यांतून ती नुकतीच तारुण्यांत प्रवेश करीत होती त्यामुळें तिच्या मूळ चंचल वृत्तीला तो तारुण्याचा मोहकपणा अतिशय खुलून दिसत होता. ती दृष्टीस पडतांच बापुसाहेबांच्या मनाची चलबिचल झाली. आणि त्या चार दिवसांच्या सहवासांत उभयतांची चांगली ओळख झाली. पुढें बापुसाहेब आपल्या मित्राच्या नकळत मधून मधून पारनेरास जाऊं येऊं लागले. त्यांचें मन चंचलेनें आपणांकडे ओढून घेतल्यामुळेंच बापुसाहेबांना आपल्या मित्राप्रमाणें पुण्याच्या घोड्याच्या शर्यतीचा मोह पडला नाहीं. शर्यतीच्या दिवशीं प्रत्येक वेळीं भालेराव त्यांना आग्रह करून आपल्याबरोबर येण्यास सांगत. परंतु बापुसाहेबांना चंचलेशिवाय दुसरें कांहीं सुचत नसे. ते आठचार दिवसांनीं चंचेलेच्या भेटीकरितां जाऊं लागले. त्यांच्या येण्याजाण्यामुळें म्हातारीला आपल्या नातीच्या सुखाबद्दल आशा वाटूं लागली. बापुसाहेब कोण, त्यांची घरची स्थिति काय आहे, हें सर्व म्हातारीला कळलें असल्यामुळें आपल्या नातीबरोबर त्यांनीं लग्न केल्यास ती मोठ्या सुखांत पडेल अशी तिची खात्री होती म्हणून तिनें चंचला आणि बापुसाहेब यांच्या वाढत्या भेटींना कोणत्याहि प्रकारचा अडथळा केला नाहीं. हळुहळू त्या दोघांचें प्रेम वाढत जाऊन ' मी तुझ्याशींच विवाह करीन ' असें एके दिवशीं बापुसाहेबांनीं म्हातारीच्या समक्ष चंचलेला वचन दिलें.

परंतु वचन देऊन स्वतःच्या आवडीनिवडीप्रमाणें लग्न करण्यास बापुसाहेब मुखत्यार नव्हते. त्यांचे वडील हयात होते आणि ते स्वभावानें रागीट होते. आपल्या एकुलत्या एका मुलानें आपल्या योग्यतेप्रमाणें, आपल्या दर्जाला कुलशीलाला आणि श्रीमंतीला साजेशी मुलगी करावी अशी त्यांची इच्छा बापुसाहेबांना माहित होती. त्यामुळें चंचलेबरोबर असलेला आपला प्रेमसंबंध बापुसाहेबांना आपल्या वडिलांच्या कानावर घालण्याचें धैर्य होईना. त्यांनीं

आपल्या मित्राकडून—भालेरावाकडून ती गोष्ट आपल्या वडिलांना सांगण्याचा पुष्कळदां विचार केला परंतु भालेरावाच्या संगतीमुळेंच आपला मुलगा बिघडला आहे अशी त्यांची ठाम समजूत होऊन ते भालेरावाला आपल्या दृष्टीसमोरहि उभा करीत नसत.

अशा रीतीनें एक वर्ष लोटलें. बापुसाहेब कांहीं तरी निमित्त काढून, पुण्यास जातों असें सांगून दोन दोन चार चार दिवस पारनेरास येऊन राहूं लागले. आतां म्हातारीला खर्चाचीहि विशेष ओढाताण भासेनाशी झाली होती. बापुसाहेब प्रत्येक वेळीं तिला पैसे देत असत. शिवाय चंचलेकरितां प्रत्येक वेळीं ते कांहींना कांहीं नवीन जिन्नस घेऊन जात असत. असें होतां होतां बापुसाहेबांचे वडील अत्यंत आजारी पडले. तेव्हां त्यांचा शेवटचा शब्द राखण्याकरितां वडिलांच्या इच्छेप्रमाणें लग्न करण्यास बापुसाहेबांनीं आपली संमति दिली. आणि त्या झटक्यांतच त्यांचें लग्न झालें. इकडे त्यांच्या लग्नाची गोष्ट पारनेरास चंचलेला आणि तिच्या आजीला कळली तेव्हां म्हातारीला मोठा धक्का बसला. आपली नात मोठ्या श्रीमंतीची मालकीण होईल ही तिची मोठी आशा रसातळाला गेली आणि त्या निराशेच्या धक्क्यामुळें बिचारीचें देहावसान झालें. परंतु ही गोष्ट बापुसाहेबांना कांहीं दिवस कळली नाहीं. लग्नाच्या गडबडीमुळें दोन महिने त्यांना पारनेरास जातां आलें नाहीं.

चंचलेला कांहीं दिवस लोटले होते. आणि तिनें ती गोष्ट आपल्या आजी-पासून लपवून ठेविली होती. पुढें तिला आपल्या प्रियकरानें आपलें वचन मोडून लग्न केले असें कळतांच त्याच्याविषयीं तिच्या मनांत एकदम तिरस्कार उत्पन्न झाला. आपणास त्यानें फसविलें आणि आपल्या भोळ्या स्वभावाचा फायदा घेऊन आपणास वाईट मार्गांत ओढलें याशिवाय तिच्या मनांत दुसरा विचार येईनासा झाला. नंतर आठदहा दिवसतांच तिच्या आजीचा एकाएकीं मृत्यू झाला. आपली आजी केवळ बापुसाहेबांनीं आपणास फसविलें ह्या धक्क्यामुळेंच मेली हें पाहून तिच्या मनांत बापुसाहेबाविषयीं उत्पन्न झालेल्या तिरस्काराचें रूपांतर सूडांत झालें.

दोन महिन्यांनीं बापुसाहेब पारनेरास आले. आपण चंचलेची आणि तिच्या आजीची कशीतरी समजूत करूं, अशी त्यांना खात्री वाटत होती. परंतु पारनेरास आल्यावर सर्व गोष्टी विचरांत झालेल्या त्यांना दिसून आल्या.

" तुमच्यासारख्या बेइमान मनुष्याचें ह्यापुढें मी तोंडहि पाहूं इच्छित नाहीं. मोठमोठ्या आशा दाखवून, प्रेम दाखवून तुम्ही मला फसविलें, माझें कौमार्य भ्रष्ट केलें, माझें वांकडें पाऊल पाडलें, इतकेंच नव्हे तर माझ्या प्रियकर आजीच्या मृत्यूला तुम्हीच सर्वस्वी कारणीभूत झाला. तुमच्यासारखा पाषाण हृदयी मनुष्य जगांत दुसरा कोणीहि नसेल. जा—इतःपर तुम्ही मला तोंडहि दाखवूं नका. मी आतां जगांतून उठलेंच आहें, आतां मला कोणाचीच जरूरी नाहीं. " अशा तऱ्हेनें दरवाजांतच चंचलेनें त्यांचें स्वागत केलें. बापुसाहेबांनीं तिची समजूत करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला परंतु त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. नंतर त्यांनीं भालेरावाला मध्यस्ती घातला परंतु चंचला वळली नाहीं. पुढें योग्य महिने भरतांच ती प्रसूत होऊन विमलेचा जन्म झाला.

चंचला बाळंत झाली ही गोष्ट आजुबाजूला कळतांच गांवांतील बायका तिला नांवें ठेवूं लागल्या. तिच्याशीं असलेला संबंधहि त्यांनीं तोडला. बिचारी कलंक लागलेली चंचला एकटीच पडली. परंतु भालेरावांनीं तिचा योग्य परामर्ष घेतला. पुढें बाळंतपणांतील हयगयीमुळें चंचला आजारी पडून तिला क्षय झाला आणि त्यांतच सहा महिन्यांनीं तिचा अंत झाला. विमला मातृहीन झाली. नंतर एका गरीब बाईजवळ त्या सहा महिन्याच्या अर्भकाला ठेवून आपल्या मित्राकरितां भालेरावांनीं विमलेची व्यवस्था केली. पुढें दीड वर्षांनीं ती बाई मेली आणि भालेरावाचाही अकल्पित रीतीनें मृत्यु झाला. अर्थात् विमलेची कांहींतरी व्यवस्था करणें बापुसाहेबांना भाग पडलें. त्याचवेळीं त्यांची विवाहित पत्नी बाळंत होऊन कमलेचा जन्म झाला.

बापुसाहेबांचे वडील कोष्ट्यांकडून माल तयार करून घेऊन तो विकत असत. तोच धंदा बापुसाहेबांनींहि, पुढें चालविला होता. त्या कोष्ट्यांत संतोबा कोष्टी हा त्यांच्या विशेष सलगीचा आणि विश्वासाचा होता. त्याला एके दिवशीं बोलावून बापुसाहेब म्हणाले, " पारनेरास एक अनाथ मुलगी माझ्या पाहण्यांत आली आहे. तिला आईबाप कोणी नाहींत. त्या मुलीची मला दया उत्पन्न झाली आहे. तूं जर तिला आपल्या घरीं आणून तिचें पालन करशील तर मी तुला खर्चाकरितां दरमहा दहा रुपये देत जाईन. " ह्या गोष्टीला संतोबा कबूल झाला आणि तो विमलेचा पालक बनला. नंतर बापुसाहेबांच्याच सांगण्यावरून त्यानें तिला मिशनमध्यें घातलें. पुढला प्रकार वाचकांना अवगत आहेच.

नरसिंगरावाला बापुसाहेबांनीं आपल्याजवळ बाळगला होता याचें कारण दुसरें तिसरें कांहीं नसून त्याच्या बापानें—भालेरावांनीं चंचलेच्या बाबतींत केलेले उपकार हेंच होय. तो मोठा झाल्यावर त्याला त्यांनीं अलाहाबादेस पाठविलें. आणि तेथून तो परत आल्यावर त्याचें आणि कमलेचें लग्न करून टाकावें अशी त्यांची इच्छा होती. असो.

ही सर्व हकीकत सांगितल्यावर विमला आर्तस्वरानें म्हणाली, " मग मला तुम्ही आजपर्यंत अशा रीतीनें कां वागविलें ? "

" केवळ लोकोपवादाकरितां. जगाला ही गोष्ट कळली असतां ते मला नांवें ठेवतील ह्या भीतीनें मी तुझ्याशीं असा निष्ठुरपणानें वागलों. पण मला त्याचा आतां पश्चात्ताप होतो. "

" आतां होऊन गेलेल्या गोष्टीबद्दल वाईट वाटून घेण्यांत काय अर्थ आहे !"

" बापुसाहेब, तुम्ही ही गोष्ट पूर्वींच सांगितली असती तर विमलेला इतके हाल, दुःख आणि आपत्ति सोसावी लागलीच नसती. तिच्या नांवाला कलंक लागला नसता, तिला धर्मांतर करावें लागलें नसतें, अशा चांडाळ मनुष्याबरोबर लग्न करावें लागलें नसतें, आणि आज तिची अशी स्थिति होती ना ? अरेरे ! बापुसाहेब, तुम्ही आपल्या प्रत्यक्ष मुलीचा हा केवढा घात केलात ? " संतोबा म्हणाले.

" तुम्हीं कोणीहि त्यांना दोष देऊं नका. मी हें माझ्या दैवानुसार दुःख भोगीत आहें. पण माझ्या ह्या सर्व दुःखांचा शेवट व्हावा, माझ्या ग्रहदशेचा अंत व्हावा अशी जर तुमची इच्छा असेल तर नरसिंगराव, माझी शेवटची इच्छा पूर्ण करा. मी आतां थोड्या कालाची सोबतीण आहे—"

" बोल—विमला—बोल, तुझी कोणती इच्छा आहे ? " तिचा हात धरून नरसिंगराव म्हणाला.

" कमला ही माझी धाकटी बहीण आहे. तिच्याशीं तुमचा विवाह व्हावा, अशी बापुसाहेबांची इच्छा आहे. आणि माझीहि इच्छा तीच आहे. तुमचें मजवर निस्सीम प्रेम आहे हें मी जाणून आहे. पण त्यावेळीं तुम्ही माझ्याशीं विवाह केला असता तर तुम्ही दुःखी झाला असतां आणि तें मला केव्हांहि सहन झालें नसतें. तुम्ही मला देवाप्रमाणें पूज्य आहांत. तुम्ही सुखी व्हावें हीच माझी इच्छा आहे आणि तेवढ्याचकरितां तुमचा मार्ग मोकळा करून

देण्याकरितां मी स्वसंतोषानें हा दुःखाचा आणि कष्टाचा मार्ग स्वीकारला. आतां तरी माझ्या अंतकाळीं तुम्ही ' हो ' म्हणा. तुमच्यासारखा परिस जवळ असल्यामुळें कमलाबाईचा स्वभाव पूर्ण पालटला आहे. आणि ह्यापुढें तुमच्या सहवासानें तो माझ्यापेक्षां कांकणभर जास्तच सुख तुम्हाला देईल. बोला—माझी ही इच्छा पूर्ण कराल तर मी सुखानें मरेन. मी आज जें हें भयंकर दुःख भोगीत आहें, ह्या यमयातना सहन करीत आहें, त्याचें मला कांहींच वाईट वाटत नाहीं. माझ्या दुःखाचा अंत जर केव्हां होणार असेल–माझ्या ग्रहदशेचा अंत जर केव्हां होणार असेल तर तुम्ही—नरसिंगराव, तुम्ही सुखीं झालां हें पाहूनच होणार आहे. "

बोलवत नव्हतें तरी विमलेनें हें लांबलचक केलेलें भाषण ऐकून आणि नरसिंगाच्या सुखाकरितां तिचा भयंकर स्वार्थत्याग पाहून बापुसाहेब सद्गदित स्वरानें म्हणाले, " अहाहा ! पोरी, काय हें तुझें प्रेम ! किती विलक्षण तुझी ही नरसिंगरावावर निष्ठा ! अरेरे ! मला मूर्खाला तुझी किंमत कळली नाहीं· किती मी अभागी ! देवा, आतां तरी मला हें रत्न लाभूं दे. मी जिवापलीकडे या रत्नाचें जतन करून ठेवीन. "

" बापुसाहेब, आतां कशाला उगाच माझी आशा करतां ? ही मी आतां चाललें. पण नरसिंगराव—"

" विमला—विमला, " डोळ्यांत अश्रु आणून नरसिंगराव म्हणाला. " तुझी शेवटची इच्छा मला शिरसावंद्य आहे. "

" अहाहा ! आतां मी खरी खरी सुखी झालें ! " असें म्हणून ती खोल आवाजांत कमलेकडे पहात म्हणाली, " ये – कमला, माझ्या लाडक्या बहिणी ये—तुझा हात मला नरसिंगरावाच्या हातीं देऊं दे—ते देवपुरुष आहेत. त्यांच्या सुखाला जप—तूं खरी सुखी होशील—" असें म्हणून तिनें पुढें केलेला हात विमलेनें आपल्या हातानें नरसिंगरावाच्या हातांत दिला. आणि क्षणभर तिनें नरसिंगरावाच्या मुखाकडे आपली अचल दृष्टी लावली. तिच्या चर्येवर हास्य विलसूं लागलें.

" आतां मी सुखी झालें ! "

हें एकच शेवटचें वाक्य उच्चारून विमलेनें आपला ग्रहदशेचा अंत केला.



## उपसंहार

विमलेच्या शेवटच्या इच्छेप्रमाणें नरसिंगराव आणि कमला यांचें लग्न झालें. कमलेच्या स्वभावांत आतां इतका विलक्षण फरक पडला कीं, ती केवळ आपल्या वडील बहिणीची—विमलेचीच प्रतिमा आहे असें नरसिंगरावाला वाटे. बापुसाहेबांच्या मनासारखें झालें, तरी ज्या ज्या वेळीं त्यांना विमलेची आठवण होई त्या त्या वेळीं ते क्षणभर अश्रू गाळीत असत.

साध्वी विमलेला छळल्याबद्दल मनोहरला कान्ह्या भिल्लानें योग्य प्रायश्चित्त दिलें होतें. त्याच्या नाकाची जखम दोन महिन्यांनीं बरी झाली. परंतु आतां तो सर्व मिशनमध्यें नकटा मनोहर या नांवानें ओळखला जाऊं लागला.

